॥ ॐ ॥

# श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय पांचवा

[ मूळ ओव्या, अन्वय, अर्थ, उपोद्घात, टीपा,
विस्तृत निरूपण, व्याकरण, शब्दकोश,
वगैरेसह ]

संपादक :
लक्ष्मण विश्वनाथ कर्वे, बी. ए.
व
गोपाळ पुरुषोत्तम रिसबूड

१९४८

किंमत ३॥ रुपये

# अर्पणपत्रिका

ज्ञान्यांचे चक्रवर्ती राजे, योग्यांतील योगी,
अनुभवियांचे शिरोमणि व साधकांचे
मायबाप अशा
**श्रीज्ञानदेवांचे चरणीं**
भक्तिपुरस्सर समर्पण.

— संपादक

ारायण,

श्रीज्ञानेश्वरी अध्याय पांचवा

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

> फिटो विवेकाचो वाणी । हो काना मनाची जिणी ।
> देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येचो ॥ ज्ञा.–१३–११६०.

श्रीज्ञानेश्वरी अध्याय १२ वा, अन्वय, अर्थ, टीपा, विस्तृत निरूपण, व्याकरण व ज्ञानेश्वरींतील नामांची व धातूंची रूपावली यांसह गतवर्षी प्रसिद्ध केल्यानंतर तीच पद्धति अनुसरून 'ज्ञानेश्वरी अध्याय पांचवा' हें पुस्तक वाचकांच्या हातीं देण्याचा सुयोग या वर्षी श्रीज्ञानेश्वरांच्या कृपेनें आज आम्हांस लाभत आहे, यासाठीं त्यांचे चरणीं अनंत प्रणाम असोत. ज्ञानेश्वरींतील एक एक अध्याय स्वतंत्रपणें विस्तृत निरूपणासह लिहिण्यांत आमचा काय उद्देश आहे याचें स्पष्टीकरण आम्हीं प्रसिद्ध केलेल्या श्रीज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायाच्या प्रस्तावनेंत संपूर्णपणें केलेलें आहे. अशीं पुस्तकें प्रसिद्ध करण्यांत आमचा मुख्य उद्देश ज्ञानेश्वरींतील प्रत्येक ओवीचा अर्थ व तिचें स्वारस्य हीं सामान्य वाचकांस सुगम व्हावीत असा आहे.

मराठी वाङ्मयांत श्रेष्ठतम असे जे धर्मग्रंथ आहेत त्यांत तत्त्वज्ञान आणि काव्य या दोन्ही दृष्टींनीं ज्ञानेश्वरी या ग्रंथाची योग्यता विशेष आहे. परंतु ज्ञानेश्वरींतील भाषा, तिचें व्याकरण व घाटणी ही प्राचीन असल्यामुळें ती समजण्यास आज दुर्बोध झाली आहे. तिच्या दुर्बोधत्वाबद्दल कै. साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकर हे आपल्या 'ज्ञानेश्वरी–सर्वस्व' ह्या ग्रंथांत म्हणतात कीं, "ज्ञानेश्वरीची भाषा प्रौढ, जुनी आणि इतकी दुर्गम आहे कीं, आज अत्युच्च शिक्षण घेतलेल्या मराठी वाचकालाही केवळ स्वतः वाचून ती समजणार नाहीं. ती समजून सांगणारा कोणीतरी हवाच. मग तो गुरु असो वा टिप्पणीकार असो. कांहीं ओव्या अशा आहेत कीं, त्यांचा अर्थ सांगणारा न भेटला तर आज मराठी घेऊन एम्. ए. झालेल्या व त्याहून विद्वानालाही त्या आपणहोऊन समजणार नाहींत." तात्पर्य, जो ग्रंथ विद्वानांनाही सहजगत्या समजत नाहीं तो ग्रंथ मराठी पांच अथवा सहा इयत्तेपर्यंतच ज्यांचें शिक्षण झालेलें आहे अशा आबालवृद्ध–स्त्री-पुरुषांनाही समजण्यास ओवीचा केवळ

अन्वयार्थ दिल्यानें भागणारें नसल्यामुळें आम्हीं प्रस्तुत अध्यायांतही प्रत्येक ओवीवर विस्तृत निरूपण दिलें आहे. अशाच प्रकारचा आमचा प्रयत्न लोकांस पसंत पडला याची साक्ष आम्हीं प्रसिद्ध केलेल्या १२ व्या अध्यायावर जे कांहीं विद्वानांनीं व वर्तमानपत्रकारांनीं अभिप्राय दिलेले आहेत यावरून पटणारी आहे. त्यांपैकीं कांहींचा सारांश प्रस्तुत पुस्तकाच्या शेवटीं दिला आहे.

## प्रस्तुत पुस्तक–विशेष

( १ ) **श्रीज्ञानेश्वरी अध्याय पांचवा मूळ**:— प्रस्तुत प्रत तयार करतांना आम्हीं ह. भ. प. बंकटस्वामी यांच्या 'सार्थ ज्ञानेश्वरी'चा उपयोग केला आहे. त्यांच्या पाठांत प्रायः बदल न करतां या पुस्तकांत मूळ ओव्या बहुशः बंकटस्वामींच्या प्रतीप्रमाणेंच छापलेल्या आहेत. परंतु मुद्रणदोषामुळें बंकटस्वामींच्या ज्ञानेश्वरींतील पांचव्या अध्यायाच्या ओव्यांच्या पाठांत ज्या ऱ्हस्व, दीर्घ किंवा अनुस्वार यांच्यासंबंधीं चुका झालेल्या आहेत त्या दुरुस्त करून ( व्याकरण–परिशिष्ट पहा ) प्रस्तुत प्रतींतील मूळ ओव्या व्याकरणशुद्ध अशा छापलेल्या आहेत.

( २ ) **अन्वय व अर्थ**:— प्रत्येक ओवीचा गोळाबेरीज अर्थ न देतां ओवीचा व्याकरणाला धरून अन्वय दिला आहे व त्या अन्वयाला अनुसरून व्याकरणशुद्ध अर्थ दिला आहे. ओव्यांचा अर्थ निर्दोष व्हावा एवढ्याकरितां आम्ही पुण्यांतील सेवानिवृत्त सुप्रसिद्ध संस्कृतशिक्षक व व्याकरणतज्ज्ञ गुरुवर्य रा. रा. **गो. कृ. मोडक** याजकडे गेलों व त्यांच्या मुखांतून प्रत्येक ओवीचा अन्वय व अर्थ ऐकला व तो टिपून घेतला व असा टिपून घेतलेला अन्वय व अर्थ या प्रतींत आम्हीं छापलेला आहे. श्री. मोडकांचा व्याकरणाचा अभ्यास दीर्घकालीन व सखोल असा असल्यामुळें या पुस्तकाचें एक वैशिष्ट्य असें सांगतां येईल कीं, या पुस्तकांतील अन्वय सर्वथा व्याकरणानुसारी व अर्थ अन्वयानुसारी असा झाला आहे.

( ३ ) **पांचव्या अध्यायांतील व्याकरण ( व्याकरण–परिशिष्ट )**— आम्हीं प्रसिद्ध केलेल्या श्रीज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायांत ज्ञानेश्वरींतील नामांची धातूंची जी संक्षिप्त रूपावली छापलेली आहे, तदनुसार या अध्यायांतील व्याकरण ' लिहिलेलें आहे. हें व्याकरण वर निर्दिष्ट केलेल्या रूपावलीची

उजळणी करण्यास व तसेंच प्रत्येक ओवींत आलेल्या नामाची, सर्वनामाची व विशेषणाची विभक्ति कोणती आहे, क्रियापदाचें रूप कोणच्या काळाचें आहे व आलेले अविकारी शब्द कोणच्या जातीचे आहेत हें समजण्यास उपयुक्त होईल. गुरुवर्य रा. मोडक यांच्या सान्निध्यानें आम्हांस ज्ञानेश्वरीच्या व्याकरणाचा परिचय झाला व त्यांनीं आम्हांस आपुलकीच्या भावनेनें प्रत्येक ओवीचा अन्वय व अर्थ सांगितला, म्हणूनच प्रस्तुत पुस्तक वाचकांच्या उपयोगासाठीं आम्हांस सादर करतां आलें याबद्दल आम्ही त्याचे अत्यंत आभारी आहों.

(४) टीपा व विस्तृत निरूपण:—**गुरुवर्य प्राचार्य ह. भ. प. शंकर वामन** उर्फ **सोनोपंत दांडेकर**, एम्. ए., यांची श्रीज्ञानेश्वरीच्या पांचव्या अध्यायावर अथपासून इतिपर्यंत जीं प्रगट प्रवचनें झालीं, तीं ऐकत असतांना अभ्यासू वृत्तीनें त्यांचीं जीं त्रोटक टिपणें आम्हीं लिहून घेतलीं त्या टिपणांवरूनच प्रस्तुत अध्यायाचें विस्तृत निरूपण आम्हीं लिहून काढलें व तेंच या पुस्तकांत छापलें आहे. परंतु हें निरूपण प्राचार्य दांडेकर यांच्या निरूपणाचा यथातथ्य अनुवाद नव्हे, हें सुज्ञ वाचकांस सांगावयास नको. प्राचार्य दांडेकरांच्या निरूपणाचा अनुवाद करण्यास निरूपणांत किमानपक्षीं किती गोष्टी यावयास पाहिजेत याचें दिग्दर्शन आम्हीं १२ व्या अध्यायाच्या प्रस्तावनेंत केलेंच आहे. तथापि आम्हीं छापलेल्या निरूपणांत जो कांहीं थोडाबहुत ज्ञानाचा प्रकाश असेल तो त्यांचा आहे व त्यांतील दोष व विसंगतपणा हे आमचे आहेत ही गोष्ट या ठिकाणीं सांगणें अवश्य आहे. त्यांचें निरूपण आम्हांस ऐकावयास न मिळतें तर प्रस्तुत निरूपण लिहितां आलें असतें कीं नाहीं याची वानवाच असल्यानें त्यांचे उपकार जितके मानावे तितके थोडेच आहेत.

उपनिषदामध्यें आत्म्याचें यथार्थ स्वरूप सांगणारा आत्मानुभवी वक्ता अतिशय दुर्लभ होय असें म्हटलें आहे ( 'आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धा।'). आधुनिक कालांत तर भौतिकशास्त्रांच्या प्रगतीमुळें व पाश्चिमात्य शिक्षणाच्या संस्कारामुळें आचारसंपन्न, संप्रदायपूर्वक ज्ञानेश्वरादि महाराष्ट्रीय संतांच्या वाङ्मयाचा अभ्यास केलेला, पौर्वात्य वेदान्तांत व पाश्चिमात्य तत्त्वज्ञानांतही पारंगत, असा वक्ता मिळणें फारच दुर्लभ आहे. परंतु प्राचार्य दांडेकरांच्या ठिकाणीं या तिन्हीही गोष्टींचा संयोग झालेला आहे ही गोष्ट सर्वश्रुत आहे.

तेव्हां त्यांच्यासारख्या अधिकारयुक्त वाणींतून जें निरूपण आम्हांस ऐकावयास मिळालें, त्या निरूपणाचा उपयोग, ज्ञानेश्वरीचा अभ्यास करण्यास, आमच्या-इतकी संधि किंवा साधनें नसणाऱ्या इतरांना व्हावा, या हेतूनें आम्हीं हें निरूपण प्रस्तुत पुस्तकांत छापून प्रसिद्ध केलें आहे. यामुळें ज्ञानेश्वरींतील प्रत्येक ओवीचें रहस्य अथवा मर्म समजणें सुलभ झालें आहे. याशिवाय प्रत्येक ओवीचा अर्थ अधिक सुबोध व्हावा एवढ्याकरतां तदर्थबोधक इतर संतांचीं जीं समर्पक वचनें निरूपणांत दिलीं आहेत, तीं वचनें अवतरणचिन्हांत न देतां मुद्दाम तीं आम्हीं कंसांत दिलीं आहेत; हेतु असा कीं, तीं वगळून निरूपण वाचलें असतां निरूपणाला केवळ स्पष्टीकरणाचें स्वरूप प्राप्त व्हावें व संतवचनांसह तें वाचलें असतां तें 'सांप्रदायिक निरूपण' व्हावें. केवळ ओव्यांचा शब्दशः अर्थ वाचीत गेलें असता ज्ञानेश्वरीविषयीं खरी गोडी उत्पन्न होत नाहीं व त्यांतील अध्यात्महि समजत नाहीं. खरी गोडी उत्पन्न होण्यास व अध्यात्म समजण्यास प्रस्तुत निरूपणाचा वाचकांस चांगला उपयोग होईल असा आम्हांस भरंवसा आहे.

(५) **वेदान्तपरिशिष्ट**:—वेदान्त हें एक शास्त्र आहे. ज्याप्रमाणें पदार्थ-विज्ञानशास्त्र किंवा रसायनशास्त्र नीट समजण्याकरतां त्यांतील विशिष्ट पारि-भाषिक शब्द व मूलतत्त्वें यांच्या व्याख्या व त्यांच्याविषयीं माहिती प्रथमतः असणें आवश्यक असतें, त्याचप्रमाणें वेदान्तशास्त्र समजण्याकरतां त्यांतील तत्त्वें व पारिभाषिक शब्द यांच्या व्याख्या व त्यांचें स्वरूप माहीत असणें आवश्यक आहे. वेदांतशास्त्राची परिभाषा चांगली समजल्यावांचून ज्ञानेश्वरी यथार्थ समजत नाहीं; म्हणून ५ व्या अध्यायांतील ओव्या समजण्यास जेवढी वेदान्त-प्रक्रिया माहीत असणें आवश्यक आहे तेवढीच प्रक्रिया या परिशिष्टांत दिली आहे. ही प्रक्रिया ज्ञानेश्वरीच्या अभ्यासूंनीं वारंवार मननपूर्वक वाचावी. ही वाचल्यानें वेदान्तशास्त्राचा परिचय होऊन भलभलतीं विधानें करणाऱ्या लोकांच्या भाषणांतील व लेखनांतील दोष ध्यानांत येतील व त्यामुळें दिशाभूल होणार नाहीं.

(६) **प्रश्न व उत्तरें**:—या परिशिष्टांत गीतेचें श्रेष्ठत्व, गीतेवरील टीका-कार, श्रीज्ञानेश्वरकालीन राजकीय, धार्मिक व सामाजिक परिस्थिति, श्रीज्ञाने-श्वरीचें वैशिष्ट्य, ज्ञानेश्वरांची लेखनशैली, ज्ञानेश्वरींतील काव्य, श्रीज्ञानेश्वर-

महाराजांचा जीवनवृत्तान्त व गुरुपरंपरा, इत्यादिकांची माहिती दिली आहे. तसेंच ५ व्या अध्यायाच्या निरूपणांत आलेल्या मुख्य विषयांची प्रश्नोत्तररूपानें सूची दिली आहे. ही माहिती व सूची दिल्यानें प्रस्तुत पुस्तक शालोपयोगी झालें आहे.

(७) **ओव्या व अभंगांची सूचीः—** ५ व्या अध्यायांतील ओव्यांच्या निरूपणांत श्रीज्ञानेश्वरमहाराज, श्रीतुकाराममहाराज, इत्यादि संतांच्या अभंगांतील कडवीं व श्रीज्ञानेश्वरी व एकनाथी भागवतांतील ओव्या, प्रमाणें म्हणून ज्या दिल्या आहेत, त्या सर्वांची सूची या परिशिष्टांत दिली आहे. प्रस्तुत कडवीं व ओव्या ह्या त्या त्या ग्रंथांतील निवडक वेंचेच होत व ते पाठ केल्यास प्रवचनास त्यांचा चांगलाच उपयोग होईल. यांत अभंगांचीं कडवीं सुमारें ३०० व ओव्या जवळजवळ ७०० पर्यंत दिलेल्या आहेत.

प्रस्तुत पुस्तकाची मांडणी, शिक्षक, विद्यार्थी, कीर्तनकार, प्रवचनकार, व्याख्यानकार व सांप्रदायिक अशा सर्व प्रकारच्या व सर्व स्थितींतील वाचकांस उपयोगी पडेल, अशी केली असल्यामुळें प्रस्तुत पुस्तक सर्व आबालवृद्धांस उपयुक्त होईल असा आम्हांस भरंवसा आहे. तात्पर्य, कोणींही ओणत्याही बुद्धीनें प्रस्तुत पुस्तकाचें वाचन केल्यास त्यांत त्याला पुनः पुनः अवगाहन करावें असेंच वाटावें व श्रीज्ञानेश्वरी हा ग्रंथ त्याच्या नित्य जीवनाचा विषय व्हावा, अशा रीतीनें प्रस्तुत पुस्तकाची रचना केली असल्यामुळें श्रीज्ञानेश्वरीवर आजपर्यंत जरी मोठमोठ्या विद्वानांनीं बहुत परिश्रम करून सर्वमान्य ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत, तरी हेंही एक पुस्तक संग्रहीं ठेवावें असें त्या वाचकास वाटेल अशी आम्हांस उमेद वाटत आहे.

प्रस्तुत काल हा वैदिक कर्माचरणास अनुकूल नाहीं व प्रायः सर्वत्र कर्माचरणाचा लोप झाल्यासारखाच आहे. अशा स्थितींत व सांप्रतच्या मतमतांतरांच्या गलबल्यांत महाराष्ट्रांतील शाळांतून धार्मिक शिक्षण देण्यास योग्य असा मराठी धर्मग्रंथ जर कोणचा असेल तर तो ‘ ज्ञानेश्वरी ’ हाच होय. शिवाय तत्त्वज्ञान, वाङ्मय, साहित्य व अनुभव या दृष्टीनेंही ज्ञानेश्वरीचें महत्त्व अधिक आहे. अलीकडे मुंबई विद्यापीठांत वरच्या परीक्षांना ज्ञानेश्वरींतील कांहीं अध्याय मराठी भाषेच्या अभ्यासाकरतां नेमण्यांत येऊं लागले आहेत. तसेंच ज्ञानेश्वरींतील प्रस्तुत अध्यायासारखे लहान अध्याय शाळांतून मराठी भाषेच्या

अभ्यासक्रमांत नेमल्यास धार्मिक शिक्षणाची उणीव दूर होऊन विद्यार्थ्यांच्या शीलवर्धनासही त्यांचा चांगला उपयोग होईल. तेव्हां अशा प्रकारचा प्रयत्न शाळांच्या चालकानीं अवश्य करावा अशी आमची त्यांना अत्यंत नम्र विनंति आहे. शेवटीं आमची ही 'आबालसुबोध' अल्पकृति श्रीज्ञानेश्वरांच्या चरणकमलीं अनन्यभावानें समर्पण करून ही प्रस्तावना संपवितों.

प्रस्तुत पुस्तकांतील निरूपण लिहिण्यास ह. भ. प. शांतारामबुवा, शिक्षक वारकरी शिक्षण–संस्था, श्रीक्षेत्र आळंदी, यांनीं मदत केली व आम्हीं दिलेल्या संत–प्रमाणांत आणखी समर्पक प्रमाणांची भर ह. भ. प. विश्वनाथबुवा पाटील यांनीं टाकली, याबद्दल आम्ही या उभयतांचे आभारी आहोंत. तसेंच रा. रा. गंगाधर पुरुषोत्तम रिसबूड यांनीं प्रस्तुत पुस्तकाची मुद्रणप्रत तयार करण्यांत आम्हांस मदत केली व बऱ्याच उपयुक्त व मार्मिक सूचना केल्या, त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत.

त्याचप्रमाणें प्रस्तुत पुस्तक तयार होत असतांना रा. रा. सदाशिव केशव नेऊरगांवकर, बी. ई., म्यु. पल इंजिनियर, पुणें, व डॉ. नारायण महादेव देशपांडे, एल्. सी. पी. एस्., पुणें, यांनीं जें सहाय्य केलें, त्याबद्दल त्यांचेही आभार मानणें जरूर आहे. तसेंच शेवटीं चालू काळांत कागदाची दुर्मिळता व अन्य नियंत्रणें असतांनाही प्रस्तुत प्रकाशनाचें कार्य शिरावर घेऊन तें सुलभतेनें पार पाडल्याबद्दल आमचे स्नेही श्री. रामकृष्ण पांडुरंग बर्वे यांचे आभार मानणें, हें त्यांचे–आमचे संबंध विचारांत घेतां औपचारिक ठरेल. तथापि त्यांनीं हें काम अंगीकारून उत्तम प्रकारें शेवटास नेलें याबद्दल त्यांचा रोप पत्करूनही आम्ही त्यांचे आभार मानतों.

प्रस्तुत पुस्तक–छपाईचें काम अल्पावधींत व सुबक तऱ्हेनें करून दिल्याबद्दल **राजगुरु प्रेस**, पुणें, चे कर्तृत्ववान् व्यवस्थापक श्री. **श्री. ज. गानू** यांचे आम्ही आभारी आहोंत.

पुणें, कार्तिक शुद्ध ११
शके १८७०.
ता. १२–११–१९४८.

**लक्ष्मण विश्वनाथ कर्वे**
**गोपाळ पुरुषोत्तम रिसबूड**

## श्रीज्ञानेश्वरी ५ व्या अध्यायांतील विषयांची

# अनुक्रमणिका



**पांचव्या अध्यायांतील विशेष महत्त्वाच्या गोष्टी :—** (१) 'कर्मयोगो विशिष्यते'—श्लोक २. (२) 'नित्यसंन्यासाची' व्याख्या—ओवी २०. (३) 'सर्वभूतात्मभूतात्मा' होण्याचा मार्ग—ओ. ३४. (४) 'नैष्कर्म्याची' व्याख्या—ओ. ६३. (५) सृष्टि हा 'वस्तुस्वभाव' आहे—ओ. ७८. (६) भेदप्रतीतीचें कारण—ओ. ९५. (७) समदृष्टीचें वर्म—ओ. ९६. (८) विषयांकडे पाहण्याची यथार्थ दृष्टि—ओ. ११९. (९) ब्रह्मसुख हें वेगळेपणानें भोगतां येत नाहीं.—१३१. (१०) मनोनाशानें संसाराचा निरास होतो—ओ. १५६.

## श्रीज्ञानेश्वरीच्या पांचव्या अध्यायाचा मथितार्थ

या अध्यायाच्या आरंभीं अर्जुनानें भगवंतास प्रश्न केला आहे. अर्जुन म्हणाला-हे श्रीअनंता, एकदां तुम्ही कर्मसंन्यासाची प्रशंसा करतां व पुन्हा

कर्मयोगावर भर देतां, तर या दोहोंपैकीं आचरण्यास सोपा, निश्चित फलदायी व परिणामीं श्रेयस्कर असा कोणचा मार्ग आहे, तो मला निश्चितपणें सांगा.

नंतर श्रीकृष्ण म्हणाले—कर्मसंन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग मोक्ष प्राप्त करून देणारे आहेत; परंतु कर्मयोग हा सर्वसंग्राहक (म्ह. जाणते व नेणते अशा सर्वांना आचरणीय) व सोपा मार्ग असल्यामुळें तो कर्मसंन्यासापेक्षां अधिक चांगला आहे. आतां हे दोन मार्ग अभिन्न कसे आहेत, हें समजण्या-कारितां मी तुला कर्मसंन्यास करणाराचें लक्षण सांगतों. ज्याच्या ठिकाणीं 'मी व माझें' हें स्मरण नाहींसें झालेलें आहे व ज्याच्या बुद्धींतून संकल्प गेलेला आहे तो पुरुष जरी संसारी असला तरी तो नित्य संन्यासीच होय. अशा पुरुषाचें मन निःसंग असल्यामुळें तो उपाधीनें लिप्त होत नाहीं.

अविवेकी पुरुष कर्मसंन्यास (म्ह० सांख्यमार्ग) व कर्मयोग (म्ह. निष्काम-कर्मयोग) हे दोन मार्ग भिन्न आहेत, असें म्हणतात; पण ज्यांनीं एका मार्गाचेंच चांगलें अवलंबन करून संपूर्ण तत्त्व अनुभवलें असतें, ते दोन्ही मार्ग सारखेच मोक्षप्रद असल्यामुळें त्यांना एकरूपच समजतात.

योगयुक्त पुरुष पाहणें, ऐकणें, चालणें, बोलणें, इत्यादि क्रिया करीत असतां चैतन्याच्या सत्तेनें इंद्रियें आपआपल्या विषयांमध्यें प्रवृत्त होत आहेत, आपण कांहींच करीत नाहीं असें तो समजतो; संग सोडून तो सर्व कर्मे ब्रह्मार्पण करितो, म्हणून तो पाण्यांतील कमलपत्राप्रमाणें अलिप्त असतो. सर्वेश्वर सृष्टि निर्माण करूनही जसा निर्व्यापार असतो तसा आत्मयोगसंपन्न पुरुष सर्व कर्मे करूनही 'अकर्ता' असतो. तो समदर्शी असतो म्हणून प्राणिमात्राचे ठिकाणीं त्याला भेद दिसत नाहीं. त्याचें अंतःकरण प्राप्त झालेल्या इष्टानिष्ट गोष्टींनीं हर्षविषादाला पावत नाहीं. अक्षय्य व अनंत असें जें आत्म-सुख तें त्याला स्वतःच्याच ठिकाणीं प्राप्त झाल्यामुळें तो इंद्रियरूपी गांवावरच येत नाहीं, म्हणून त्याच्याकडून विषयांचें सेवन घडत नाहीं. उलट आत्म-विन्मुख पुरुष विषयांमध्यें रममाण होतात व विषयरूपी दुःख संवयीनें त्यांना सुखच वाटूं लागतें, जसें नरकांतील किड्याना आपली आहे तीच स्थिति सुखावह वाटते. परंतु ज्यांना विषयांच्या ठिकाणीं दोषदृष्टि प्राप्त झाली आहे असे विरक्त पुरुष ह्या विषयसुखाचा विषाप्रमाणें त्याग करतात.

ज्ञानी पुरुषांनीं कामक्रोधादि विकार आपल्या ताब्यांत ठेवल्यामुळें त्यांच्या

ठिकाणीं विषयांची वार्ताही नसते. ते सदा आत्मसुखांत निमग्न असतात व तद्रूप होऊन राहतात. त्या ठिकाणीं भोक्ता, भोग्य व भोग ही त्रिपुटी शिल्लक राहत नाहीं, तर केवळ एक ब्रह्मसुखच स्वरूपानें राहतें. अशा ब्रह्मसुखाशीं समरस झाल्यामुळें ते जिवंतपणींच ब्रह्म होतात. ही ब्रह्मस्थिति प्राणापानाच्या निरोधानें मूर्ध्न्याकाशांत मनाचा लय केल्यानें या शरिरांतच त्वरित प्राप्त होते.

भगवंतांनीं थोडक्यांत सांगितलेला हठयोगाचा मार्ग ऐकून अर्जुन प्रसन्न झाला. पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां पायउतारानें जाणें जसें सोपें, तसा हा योगमार्ग अर्जुनाला सांख्यमार्गाहून सोपा वाटला. अर्जुनाची ती प्रसन्नता पाहून भगवंतांनीं अर्जुनाचें मनोगत जाणलें व म्हणाले, " ऐक, तुझ्या मनोगताप्रमाणें मी तुला आतां हठयोगाचा मार्ग विस्तृतपणें सांगतों. " श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, " या वेळीं भगवंतांनीं अर्जुनाकडे ज्या कृपादृष्टीनें पाहिलें त्या कृपादृष्टीचें वर्णन शब्दांनीं करणें शक्य नाहीं. परंतु एवढें मात्र निश्चित म्हणतां येतें कीं, भगवंत अर्जुनावर मोहित झाले आहेत, कारण ते त्याला आग्रहानें ' ऐक ' असें म्हणत होते.

# विशेष खुलासा

**( १ ) अन्वय व अर्थ यांतील आंकड्यांचा खुलासा :**—प्रस्तुत अध्यायाच्या ओंव्यांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ समजण्याकरतां अन्वयांत ज्या अनुक्रमानें शब्द आलेले आहेत, त्याच अनुक्रमानें अर्थामध्यें त्या शब्दांचा अर्थ दिला आहे. जेथें अन्वयांतील एका शब्दाचा अर्थ, अर्थामध्यें दोन शब्दांनीं व्यक्त केलेला आहे, त्या ठिकाणीं अन्वयांतील शब्दावर जो आंकडा दिलेला आहे तोच आंकडा अर्थामध्यें त्या शब्दाचा अर्थ व्यक्त करणाऱ्या दोन शब्दांवर दिलेला आहे. अन्वयांतील एका शब्दाचा अर्थ दोनपेक्षां अधिक शब्दांनीं अर्थामध्यें व्यक्त केलेला असेल, तर त्या अन्वयांतील शब्दावर जो आंकडा दिला आहे तोच आंकडा त्याच्या अर्थाच्या शब्दांच्या दोन्ही बाजूला दोन रेघा मारून त्यांतील कोणत्याही एका शब्दावर दिला आहे. याशिवाय पद्यांतील अर्थ गद्यांत देतांना जे शब्द अध्याहृत घ्यावे लागतात ते शब्द अर्थामध्यें कंसांत दिलेले आहेत. त्यामुळें अन्वयांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ काय केला आहे हें वाचकांस सहज कळून येईल.

**( २ ) नकारार्थी अव्यय :**—'न' हें नकारार्थी अव्यय अन्वयामध्यें क्रियापदाच्या पूर्वी अनेक वेळां या अध्यायांत आलेलें आहे. त्याचा अर्थ अर्थामध्यें 'नाहीं' या शब्दानें क्रियापदाच्या पूर्वी व्यक्त न करतां प्रत्येक वेळीं तो क्रियापदानंतर ( धातुसाधित अव्ययानंतर ) व्यक्त केलेला आहे. जसें–ओ. ३३–अन्वय–न घडे. अर्थ—घडत नाहीं.

**( ३ ) पादपूरणार्थक अव्ययें :**—मूळ ओंव्यांत असलेलीं—हां ( १ ), पैं ( २८ ), हन ( १२९ ), कां ( १७६ ), इत्यादि अर्थशून्य पादपूरणार्थक अव्ययें अन्वयार्थांतून वगळलीं आहेत.

**( ४ ) भूतविशेषणांचा उपयोग :**—ज्ञानेश्वरींत कित्येक वेळां सामान्य गोष्ट, त्रैकालिक सिद्धान्त, शाश्वत सत्य, इत्यादि सांगतांना भूतविशेषणांचा उपयोग केलेला आढळतो. म्हणून ओंव्यांतून अशा भूतविशेषणांचा अर्थ, अर्थामध्यें वर्तमानकालीन क्रियापदांनीं व्यक्त केला आहे. जसें–ओंव्या ४७, ६२, ,७१ इत्यादि ( यासंबंधीं व्याकरण–परिशिष्टांतील शेवटची 'टीप' पहा ).

# ग्रंथसंक्षेप सूची

संक्षेप ग्रंथनाम संपादक, प्रकाशक इ० आंकड्यांचा खुलासा.

**ज्ञा.**—सार्थ ज्ञानेश्वरी—ह. भ. प. बंकटस्वामी—अध्याय, ओवी.

**ज्ञा. गा.**–ज्ञानदेवाची गाथा—रा. तात्या नेमिनाथ पांगळ—अभंग–आकडा.

**तुका**—तुकारामाची गाथा—रा. पांडुरंग जावजी, मुंबई—अभंग–आंकडा.

**अमृ**—अमृतानुभव—ह. भ. प. प्रल्हाद सीताराम सुबंध—प्रकरण–ओवी.

**एभा.** / **ए. भा.** } एकनाथी भागवत—रा. माधव कृष्ण देशमुख—अध्याय–ओवी.

**एक. चिरं.**—एकनाथकृत चिरंजीवपद—रा. मा. कृ. देशमुख—ओवी.

**निवृत्ति**—निवृत्तिनाथाची गाथा—रा. तात्या नेमिनाथ पांगळ—अभंग–आंकडा.

**भानु.**—भानुदासमहाराज—गाथापंचक—रा. त्र्यंबक हरी आवटे—अभंग–आंकडा.

**नामा.**—नामदेवमहाराज—गाथापंचक—रा. त्र्यंबक हरी आवटे—अभंग–आंकडा.

**नाथ.**—एकनाथमहाराज—गाथापंचक—रा. त्र्यंबक हरी आवटे—अभंग–आंकडा.

**निळा.**—निळोबाची गाथा—ह. भ. प. विष्णु नरसिंह जोग—अभंग–आकडा.

**चतुभा.**—चतुःश्लोकी भागवत—रा. मा. कृ. देशमुख—ओवी.

**ना. भ.**—नारद भक्तिसूत्रें—रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.–सूत्र

**गीता.**—भगवद्गीता—गीताप्रेस, गोरखपूर—अध्याय, श्लोक.

**हस्तामलक**—एकनाथी भागवत—रा. माधव कृष्ण देशमुख—ओवी.

| | | |
|---|---|---|
| **ईश. उप.**–ईशावास्योपनिषत्– | ——— | सार्थ उपनिषत्संग्रह संपादक— रा. हरि रघुनाथ भागवत. |
| **कठ. उप.**–कठोपनिषत्– | अध्याय, वल्ली, मंत्र. | |
| **केन. उप.**–केनोपनिषत्– | खंड, मंत्र. | |
| **छां. उप.**–छांदोग्योपनिषत्– | अध्याय, खंड, मंत्र. | |
| **तै. उप.**–तैत्तिरीय उपनिषत्– | वल्ली, अनुवाद, मंत्र. | |
| **बृह. उप.**–बृहदारण्यकोपनिषत्– | अध्याय, ब्राह्मण, मंत्र. | |

## संक्षेपाची सूची

( १ ) **ओ.** ओवी. ( २ ) **उ.**–उत्तर. **प्र.**–प्रश्न. **म्ह.** म्हणजे.

'म्हणोनि जाणतेन गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होईजे ।
जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती' ॥ ज्ञानेश्वरी



गुरुवर्य प्राचार्य ह. भ. प. शंकर वामन दांडेकर, एम्. ए.

॥ ॐ ॥

# ज्ञानेश्वरी

## ॥ अध्याय पांचवा ॥

[ **टीप** —प्रत्येक ओवीचा अर्थ वाचल्यानंतर लगेच त्या ओवीवर प्रकरण १ मध्यें दिलेलें विस्तृत निरूपण वाचावें. ]

**अर्जुन उवाच**—अर्जुन ( भगवंतास ) म्हणाला :—

संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥

**अन्वय** —( हे ) कृष्ण, कर्मणां संन्यासं च पुनः कर्मणां[1] योगं[1] शंससि, एतयोः[2] एकं यत् श्रेयः तत् सुनिश्चितं मे ब्रूहि ।

**अर्थ** —( हे ) श्रीकृष्णा, कर्मांचा ( ज्ञानपूर्वक ) त्याग ( एकदां प्रशंसितोस) आणि पुनः ( निष्काम ) कर्मानुष्ठान[1] प्रशंसितोस, ( म्हणून ) या[2] दोहोंपैकीं[2] एक जें श्रेयस्कर ( म्ह. अधिक चांगलें ) तें निश्चितपणें मला सांग.

मग पार्थु श्रीकृष्णातें म्हणे । हां हो हें कैसें तुमचें बोलणें ।
एक होय तरी अंतःकरणें । विचारूं ये ॥ १ ॥

**अन्वय** —मग पार्थु श्रीकृष्णातें म्हणे, हो हें तुमचें बोलणें कैसें एक[1] होय तरी अंतःकरणें विचारूं[2] ये.[3]

**अर्थ** —नंतर, अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला : अहो, हें तुमचें सांगणें कसलें ? ( जर ह्या सांगण्याचा ) एक[1] निश्चित[1] अर्थ[1] असता तर ( त्याचा ) बुद्धीनें विचार[2] करतां[2] आला[3] असता.[3]

मागां सकळ कर्मांचा संन्यासु । तुम्हींचि निरोपिला होता बहुवसु ।
तरी कर्मयोगीं केवीं अतिरसु । पोखीतसां पुढती ॥ २ ॥

**अन्वय** —मागां सकळ कर्मांचा संन्यासु तुम्हींचि बहुवसु निरोपिला होता, तरी[1] पुढती कर्मयोगीं[2] अतिरसु केवीं पोखीतसां.

**अर्थ**—मागें सर्व कर्मांचा त्याग तुम्हींच विस्तारानें सांगितला होता, असें[१] असतां,[१] आतां कर्मयोगाचे[२] ठिकाणीं[२] भर कां वाढवितां ? ( म्ह० कर्मयोगाची अधिक प्रशंसा कां करतां ? )

ऐसें द्व्यर्थ हें बोलतां । आम्हां नेणतेयांचिया चित्ता ।
आपुलिये चाडे श्रीअनंता । उमजु नोहे ॥ ३ ॥

**अन्वय**—श्रीअनंता ऐसें हें द्व्यर्थ बोलतां,[१] आम्हां नेणतेयांचिया[२] चित्ता आपुलीये चाडे उमजु नोहे.[३]

**अर्थ**—श्रीकृष्णा, असें हें दुटप्पी ( तुम्ही ) बोलत[१] असल्यामुळें,[१] आमच्या ( सारख्या ) अजाण[२] लोकांच्या[२] मनाला, आपल्या इच्छेप्रमाणें ( पुरेसा ) उलगडा होत[३] नाहीं[३].

ऐकें एकसारातें बोधिजे । तरी एकनिष्ठचि बोलिजे ।
हें आणिकीं काय सांगिजे । तुम्हांप्रति ॥ ४ ॥

**अन्वय**—ऐकें एकसारातें बोधिजे[१] तरी एकनिष्ठाचि बोलिजे हें तुम्हांप्रति आणिकीं काय सांगिजे.

**अर्थ**—ऐक, ( जर ) एकतत्त्व ( निश्चित ) सांगावयाचें[१] असेल,[१] तर निश्चयात्मक ( तुम्हीं ) बोलावें, हें तुम्हांला दुसऱ्यांनीं काय सांगावें ?

तरी याचिलागीं तुमतें । म्यां राउळासि विनविलें होतें ।
जे हा परमार्थु ध्वनितें । न बोलावा ॥ ५ ॥

**अन्वय**—तरी याचिलागीं म्यां तुमतें राउळासि विनविलें[१] होतें जे हा परमार्थु ध्वनितें[२] न बोलावा.

**अर्थ**—म्हणून, एवढ्याकरितांच मीं तुम्हां महाराजांना विनंती[१] केली[१] होती कीं, हें तत्त्वज्ञान ( आपण ) लाक्षणिक[२] ( म्ह. सांकेतिक ) अर्थानें[२] सांगूं नये.

परी मागील असो देवा । आतां प्रस्तुतीं उकलु देखावा ।
सांगें दोहींमाजि बरवा । मार्गु कवण ॥ ६ ॥

**अन्वय**—परी देवा मागील असो,[१] आतां प्रस्तुतीं[२] उकलु देखावा, दोहींमाजि बरवा मार्गु कवण सांगें.

**अर्थ**—परंतु महाराज, मागचें राहूं[1] द्या[1]. आतां प्रस्तुत[2] विषयाचा[2] उलगडा करा; दोहोंमध्यें चांगला मार्ग कोणता ( हें ) सांगा.

जो परिणामींचा निर्वाळा । अचुंबितु ये फळा ।
आणि अनुष्ठितां प्रांजळा । सावियाचि ॥ ७ ॥

**अन्वय**—जो परिणामींचा निर्वाळा ( असे ), अचुंबितु फळा ये आणि अनुष्ठितां[1] सावियाचि प्रांजळा ( असे ).

**अर्थ**—जो परिणामीं शुद्ध ( म्ह. हितकर असतो ) ( आणि ) पूर्णतः सिद्धीला येतो ( म्ह. पूर्ण फल देतो ) आणि आचरण[1] करतांना[1] सहजच सोपा ( असतो ).

जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहुसाल सांडे ।
तैसें सोकासना सांगडें । सोहपें होय ॥ ८ ॥

**अन्वय**—जैसें ( सोकासनें ) निद्रेचें सुख न[1] मोडे[1] आणि मार्गु तरी बहुसाल सांडे[2] तैसें सोकासना[3] सांगडें[3] सोहपें होय.

**अर्थ**—ज्याप्रमाणें ( मेण्यासारख्या वाहनामुळें ) झोपेच्या सुखाला धक्का[1] लागत[1] नाहीं[1] आणि रस्ता तर पुष्कळ काटला[2] जातो[2]; त्याप्रमाणें ( त्या ) सुखकारक[3] वाहनासारखें[3] ( हें साधन ) सोपें असावें.

येणें अर्जुनाचेनि बोलें । देवो मनीं रिझले ।
मग होईल ऐकें म्हणितलें । संतोषोनियां ॥ ९ ॥

**अन्वय**—येणें अर्जुनाचेनि बोलें देवो मनीं रिझले[1] मग ( देवीं ) संतोषोनियां[2] म्हणितलें ऐकें, होईल.

**अर्थ**—ह्या अर्जुनाच्या बोलण्यानें देव मनांत संतुष्ट[1] झाले[1] आणि ( त्यांनीं ) प्रसन्न[2] होऊन[2] म्हटलें, " ऐक, ( तुझ्या मनाप्रमाणें ) होईल."

देखा कामधेनुऐसी माये । सदैवा जया होये ।
तो चंद्रुही परी लाहे । खेळावया ॥ १० ॥

**अन्वय**—देखा कामधेनुऐसी माये जया सदैवा होये तो चंद्रुही ( परी ) खेळावया लाहे.

**अर्थ**—पहा, कामधेनूसारखी आई ज्या भाग्यवानाला लाभेल, त्याला चंद्रसुद्धां ( पण ) खेळण्यास मिळेल.

पाहें पां श्रीशंभूची प्रसन्नता । तया उपमन्यूचिया आर्ता ।
काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचिना ॥ ११ ॥

**अन्वय**—पां श्रीशंभूची प्रसन्नता[१] पाहें, तया उपयन्यूचिया आर्ता दूधभाता क्षीराब्धि देइजेचिना[२] काय.

**अर्थ**—अहो, श्रीशंकराच्या कृपेचें[१] सामर्थ्य[१] पहा त्या उपमन्यूच्या इच्छे-नुसार दुधभातासाठीं ( श्रीशंकरांनीं ) क्षीरसमुद्र ( त्याला ) दिला[२] नाहीं[२] काय ?

तैसा औदार्याचा कुरुठा । श्रीकुष्ण आपु जाहलिया सुभटा ।
कां सर्व सुखांचा वसौटा । तोचि नोहावा ॥ १२ ॥

**अन्वय**—तैसा औदार्याचा कुरुठा श्रीकृष्ण सुभटा[१] आपु जाहलिया[२] तोचि सर्व सुखांचा वसौटा कां नोहावा.[३]

**अर्थ**—त्याप्रमाणें उदारपणाचें घर ( असलेला ) श्रीकृष्ण, वीर[१] अर्जु-नाच्या[१] स्वाधीन झाला[२] असतांना[२] तो ( अर्जुन ) सर्व सुखांचें वसतिस्थान कां होणार[३] नाहीं[३] ?

एथ चमत्कारु कायसा । गोसावी श्रीलक्ष्मीकांताऐसा ।
आतां आपुलिया सवेसा । मागावा कीं ॥ १३ ॥

**अन्वय**—एथ चमत्कारु कायसा श्रीलक्ष्मीकांताऐसा गोसावी आतां आपु-लिया सवेसा मागावा[१] कीं.[१]

**अर्थ**—यांत आश्चर्य कसलें ? श्रीलक्ष्मीनाथासारखा धनी असतां (भक्तानें) आपल्या इच्छेप्रमाणें ( त्याच्याजवळ ) मागणी[१] केलीच[१] पाहिजे.[१]

म्हणोनि अर्जुनें म्हाणितलें । तें हांसोनि येरें दिधलें ।
तेंचि सांगेन बोलिलें । काय कृष्णें ॥ १४ ॥

**अन्वय**—म्हणोनि अर्जुनें म्हणितलें तें हांसोनि[१] येरें दिधलें कृष्णें काय बोलिलें तेंचि सांगेन.

**अर्थ**—म्हणून अर्जुनानें म्हटलें तें प्रसन्न[१] होऊन[१] दुसऱ्यानें (श्रीकृष्णानें) दिलें; कृष्णानें काय म्हटलें तेंच (मी) सांगेन. (असें ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात ).

**श्रीभगवान् उवाच**—श्रीकृष्ण बोलले--

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**

**अन्वयः**—संन्यासः च कर्मयोगः उभौ निःश्रेयसकरौ, तु तयोः,[१] कर्मसंन्यासात् कर्मयोगः विशिष्यते[२] ॥

**अर्थ**—(ज्ञानपूर्वक) कर्मत्याग व (निष्काम) कर्मानुष्ठान (हे) दोन्ही (मार्ग) मोक्षदायक (आहेत), परंतु या[१] दोहोंत[१] कर्मत्यागापेक्षां कर्मानुष्ठान अधिक[२] चांगलें[२] आहे.[२]

तो म्हणे गा कुंतीसुता । हे संन्यास योग विचारितां ।
मोक्षकर तत्त्वता । दोनीहि होती ॥ १५ ॥

**अन्वय**—तो म्हणे, गा कुंतीसुता, हे संन्यास योग विचारितां[१] तत्त्वता[२] दोनीही मोक्षकर[३] होती.

**अर्थ**—तो (श्रीकृष्ण) म्हणाला, अरे अर्जुना, हे कर्मसंन्यास (व) कर्मयोग, विचार[१] केला[१] असतां[१], तात्त्विक[२] दृष्टया[२] दोन्हीहि मोक्षाला[३] देणारे[३] आहेत.

तरी जाणां नेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा ।
जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणीं ॥ १६ ॥

**अन्वय**—तरी जाणां नेणां सकळां हा कर्मयोगु कीर प्रांजला जैसी नाव स्त्रियां बाळां तोयतरणीं[१] (प्रांजला असे).

**अर्थ**—तथापि ज्ञानी (व) अज्ञानी (या) सगळ्यांना हा कर्मयोग खरोखर (तितका) सोपा (जातो), जितकी होडी बायकांना (व) मुलांना पाण्यांतून[१] तरून[१] जाण्यास[१] (सोपी असते).

तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे ।
येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥ १७ ॥

**अन्वय**—तैसें सारासार पाहिजे[1] हाचि सोहपा देखिजे येणें संन्यासफळ[2] अनायासें लाहिजे.

**अर्थ**—त्याप्रमाणें सरसनिरस ( ह्यांचा ) विचार[1] केला[1] असतां[1] हाच ( कर्मयोग ) सोपा दिसतो ; यानें कर्मसंन्यासाचें[2] फल[2] कष्टांवांचून मिळतें.

आतां याचिलागीं सांगेन । तुज संन्यासियाचें चिन्ह ।
मग सहजें हे अभिन्न । जाणसी तूं ॥ १८ ॥

**अन्वय**—आतां याचिलागीं तुज संन्यासियाचें[1] चिन्ह सांगेन मग सहजें तूं हे अभिन्न जाणसी.

**अर्थ**—आतां याचकरितां तुला कर्मसंन्यास[1] करणाराचें[1] लक्षण सांगतों म्हणजे सहजच तुला हे ( दोन्ही मार्ग ) एकरूप ( आहेत ) ( हें ) कळेल.

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

**अन्वय**—यः न[1] द्वेष्टि[1], न[2] कांक्षति,[2] सः नित्यसंन्यासी ज्ञेयः, हि महाबाहो निर्द्वंद्वः सुखं बन्धात् प्रमुच्यते[3] ॥

**अर्थ**—जो द्वेष[1] करीत[1] नाहीं[1] ( व कशाचीही ) इच्छा[2] करीत[2] नाहीं[2], तो नित्यसंन्यासी जाणावा ; कारण ( हे ) अर्जुना, द्वंद्वरहित ( पुरुष ) अनायासें बंधांपासून मुक्त[3] होतो.[3]

तरी गेलियाची से न करी । न पवतां चाड न धरी ।
जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा ॥ १९ ॥

**अन्वय**—तरी जो गेलियाची[1] से न करी, न पवतां चाड न धरी अंतरीं ( जैसा ) मेरु[2] ( तैसा[2] ) सुनिश्चळु[3] ( असे ).

**अर्थ**—तरी जो ( इष्टवस्तु ) नष्ट[1] झाली[1] असतां[1] ( तिची ) आठवण करीत नाहीं, ( अशी वस्तु ) न मिळाल्यास ( त्याचीही ) पर्वा करीत नाहीं ( आणि ) अंतःकरणामध्यें मेरुपर्वताप्रमाणें[2] सर्वथा[3] स्थिर[3] ( असतो ).

**आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण ।**
**पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥ २० ॥**

**अन्वय**—आणि पार्थो मी माझें ऐसी आठवण जयाचें अंतःकरण विसरलें[१] तो निरंतर संन्यासी जाण.

**अर्थ**—आणखी अर्जुना, ( हा ) मी ( व ही वस्तु ) माझी अशी जाणीव ज्याच्या मनांतून निघून[१] गेलेली[१] असते[१], तो कायमचा संन्यासी समज.

जो मनें ऐसा जाहला । संगीं तो चि सांडिला ।
म्हणोनि सुखें सुख पावला अखंडित ॥ २१ ॥

**अन्वय**—जो मनें ऐसा जाहला तो संगीं[१] चि[१] सांडिला[१] म्हणोनि सुखें अखंडित सुख पावला.[२]

**अर्थ**—जो मनानें असा ( म्ह. अहंममरहित ) झाला त्याला विषयांची[१] आसक्तिच[१] सोडून[१] जाते[१] म्हणून ( त्याला ) अनायासें सतत सुख प्राप्त[२] होतें.[२]

आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें ।
जे घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणऊनि ॥ २२ ॥

**अन्वय**—आतां[१] गृहादिक[२] आघवें[३] तें कांहीं त्यजावें नलगे[४] जे घेतें[५] ( तेंचि ) स्वभावें निःसंगु जाहलें[६] म्हणऊनि.

**अर्थ**—अशा[१] स्थितींत[१] घर[२] व[२] इतर[२] सर्व[३] वस्तु[३] ह्यांपैकीं कांहींच टाकावें लागत[४] नाहीं,[४] कारण ( ह्यांची ) इच्छा[५] करणारें[५] ( जें मन ), ( तेंच ) सहजगत्या आसक्तिरहित झालेलें[६] असतें[६] म्हणून.

देखें अग्नि विझोनि जाये । मग जे राखोंडी केवळु होये ।
तैं ते कापुसें गिंवसूं ये । जियापरी ॥ २३ ॥

**अन्वय**—देखें अग्नि विझोनि जाये मग जे केवळु राखोंडी होये तैं जियापरी ते कापुसें गिंवसूं ये.

**अर्थ**—पहा, ( जेव्हां ) विस्तव विझून जातो ( आणि ) मग जी केवळ राखुंडी बनते तेव्हां ज्याप्रमाणें ती ( राखुंडी ) कापसानें ( सुद्धां ) गुंडाळतां येते.

तैसा असतेनि उपाधी । नाकळिजे तो कर्मबंधीं ।
जयाचिये बुद्धी । संकल्पु नाहीं ॥ २४ ॥

**अन्वय**—तैसा जयाचिये बुद्धी संकल्पु नाहीं, तो असतेनि[२] उपाधी[१] कर्मबंधीं नाकळिजे[३].

**अर्थ**—त्याप्रमाणें ज्याच्या मनांत संकल्प नसतो, तो (हा) संसार[१] असतांही[२] कर्मपाशांनीं बद्ध[३] होत[३] नाहीं.[३]

म्हणोनि कल्पना जैं सांडे। तैंचि गा संन्यासु घडे।
या कारणें दोनी सांगडे। संन्यासयोगु ॥ २५ ॥

**अन्वय**—गा, म्हणोनि जैं कल्पना सांडे तैंचि संन्यासु घडे या[१] कारणें[१] संन्यासयोगु[२] दोनी सांगडे.

**अर्थ**—अरे (अर्जुना), म्हणून ज्या वेळीं संकल्प सुटतो त्याच वेळीं कर्म-संन्यास घडतो. एवढ्याकरितां[१] कर्मसंन्यास[२] (व) कर्मयोग[२] (हे) दोन्ही सारखे (ठरतात).

**सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पंडिताः।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥**

**अन्वय**—बालाः[१] सांख्ययोगौ पृथक् प्रवदन्ति, न[३] पंडिताः[२] एकं[४] अपि[४] सम्यक् आस्थितः[५] उभयोः फलं विन्दते[६] ॥

**अर्थ**—मूर्ख[१] लोक[१] सांख्य (म्ह. ज्ञानपूर्वक कर्मसंन्यास) (व) योग (म्ह. निष्काम कर्मयोग) भिन्न (फल देणारे) म्हणतात, ज्ञानी[२] म्हणत[३] नाहींत.[३] (त्यांपैकीं) एकाचा[४] चागला आश्रय[५] केलेला[५] पुरुष[५], दोहोंचें फल संपादन[६] करतो[६].

एऱ्हवीं तरी पार्था। जे मूर्ख होती सर्वथा।
ते सांख्यकर्मसंस्था। जाणती केवीं ॥ २६ ॥

**अन्वय**—पार्था, एऱ्हवीं तरी (जे) सर्वथा मूर्ख[१] होती ते सांख्यकर्म-संस्था[२] केवीं जाणती.

**अर्थ**—अर्जुना, एऱ्हवीं सुद्धां (जे) पूर्णपणें अज्ञानी[१] पुरुष[१] असतात ते ज्ञानयोग[२] (व) कर्मयोग[२] (हे) मार्ग[२] कसें जाणतील.

सहजें तें अज्ञान। म्हणोनि म्हणती हे भिन्न।
एऱ्हवीं दीपाप्रति काई आनान। प्रकाशु आहाती ॥ २७ ॥

**अन्वय**—ते अज्ञान, म्हणोनि सहजें हे भिन्न म्हणती, एऱ्हवीं[1] दीपाप्रति प्रकाशु काई आनान आहाती.

**अर्थ**—ते ( पुरुष ) अजाणते ( असतात ) म्हणून सहजच हे ( मार्ग ) वेगवेगळे म्हणतात; वास्तविक[1] पाहिलें[1] तर[1] दिव्यागणिक प्रकाश काय भिन्न भिन्न असतात ?

पैं सम्यक् एकानुभवें । जिहीं देखिलें तत्त्व आघवें ।
ते दोहींतेंही ऐक्यभावें ॥ मानिती गा ॥ २८ ॥

**अन्वय**—गा जिहीं एकानुभवें[1] आघवें तत्त्व सम्यक् देखिलें ते दोहीं-तेंही ऐक्यभावें मानिती.

**अर्थ**--अरे, ज्यांनीं एकाच्या[1] ( म्ह. एका मार्गाच्या ) अनुभवानें[1] संपूर्ण सत्य यथार्थ जाणलें ते दोघांनाही ( म्ह. दोन्ही मार्गांनाही ) अभेदानें पाहतात ( म्ह. एकच मानतात ).

**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥**

**अन्वय**--यत् स्थानं सांख्यैः प्राप्यते[1] तत् योगैः अपि गम्यते,[2] यः सांख्यं च योगं च एकं पश्यति स पश्यति ॥

**अर्थ**--जें ( मोक्षरूपी ) स्थान ज्ञानयोग्यांकडून मिळविलें[1] जातें[1], तें ( स्थान ) कर्मयोग्यांकडून देखील मिळविलें[2] जातें[2]. ( म्हणून ) जो सांख्य व योग हे ( दोन मार्ग ) एक पाहतो, तो ( यथार्थ ) पाहतो.

आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे
म्हणोनि ऐक्यता दोहींतें सहजें । इयापरी ॥ २९ ॥

**अन्वय**--आणि जें सांख्यीं पाविजे तेंचि योगीं गमिजे म्हणोनि सहजें इयापरी दोहींतें ऐक्यता ( असे ).

**अर्थ**--आणि जेथें ज्ञानयोगी जातात ( म्ह. पोहोंचतात ) तेथें कर्मयोगीही जातात. म्हणून सहजच याही रीतीनें दोघांचा अभेद ( आहे ).

देखें आकाशा आणि अवकाशा । भेदु नाहीं जैसा ।
तैसें ऐक्य योगसंन्यासा । वोळखे जो ॥ ३० ॥

**अन्वय**---देखें जैसा आकाशा आणि अवकाशा भेदु नाहीं तैसें जो योगसंन्यासा[1] ऐक्य वोळखे.

**अर्थ**--पहा, ज्याप्रमाणें आकाश आणि पोकळी (यांत) भेद नाहीं त्याप्रमाणें जो कर्मयोग[1] (आणि) कर्मसंन्यास[1] यांची[1] एकता जाणतो.

तयासींचि जगीं पाहलें । आपणपें तेणेंचि देखिलें ।
जया सांख्ययोग जाणवले । भेदेंविण ॥ ३१ ॥

**अन्वय**—जया साख्ययोग[1] भेदेंविण जाणवलें[1] तयासींचि जगीं पाहलें, आपणपें तेणेंचि देखिलें.

**अर्थ**—ज्याला ज्ञानमार्ग[1] (व) कर्ममार्ग[1] अभिन्नपणानें जाणतां[1] आले[1] (म्ह. जो जाणूं शकला) त्यालाच जगतांत उजाडलें (म्ह. त्याच्याच ठिकाणीं ज्ञानाचा उदय झाला) (व) आत्मस्वरूप त्यानेंच पाहिलें (असें समजावें).

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥**

**अन्वय**—(हे) महाबाहो, तु संन्यासः अयोगतः आप्तुं[1] दुःखं, योगयुक्तः[2] मुनिः ब्रह्म न[3] चिरेण[3] अधिगच्छति[4] ॥

**अर्थ**—(हे) अर्जुना, परंतु संन्यास, कर्मानुष्ठानावांचून प्राप्त[1] होणें[1] दुर्घट (होय), निष्काम[2] कर्मयोगी[2] मुनि (म्ह. भगवंताच्या स्वरूपाचें मनन करणारा) ब्रह्मप्रत लवकरच[3] प्राप्त[4] होतो[4] (म्ह. त्याला ब्रह्मप्राप्ति अल्प काळांत होते).

जो युक्तिपंथें पार्था । चढे मोक्षपर्वता ।
तो महासुखाचा निमथा । वाहिला पावे ॥ ३२ ॥

**अन्वय**—पार्था, जो युक्तिपंथें मोक्षपर्वता[1] चढे तो महासुखाचा निमथा वाहिला पावे.

**अर्थ**—अर्जुना, जो कर्मयोगानें (म्ह. कर्मयोगाच्या मार्गानें), मोक्षरूपी[1] पर्वतावर[1] चढतो तो ब्रह्मानंदाचें शिखर लवकर गांठतो.

येरा योगस्थिति जया सांडे । तो वायांचि गा हव्यासीं पडे ।
परि प्राप्ति कहीं न घडे । संन्यासाची ॥ ३३ ॥

**अन्वय**—गा, जया येरा योगस्थिति[१] सांडे,[२] तो वायांचि हव्यासीं पडे, परी ( तेया ) संन्यासाची प्राप्ति कहीं न घडे.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ), ज्या दुसऱ्याला ( म्ह. साधकाला ) कर्मयोगाचें[१] अनुष्ठान[१] घडत[२] नाहीं,[२] तो व्यर्थच ( मोक्षप्राप्तीच्या ) छंदांत पडतो. कारण ( त्याला ) कर्मसंन्यासाचा लाभ कधींही होत नाहीं ( म्हणजे कर्मसंन्यास त्याच्याकडून घडत नाहीं ).

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥**

**अन्वय**—योगयुक्तः विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः सर्व भूतात्मभूतात्मा[१] कुर्वन्[२] अपि[२] न लिप्यते ॥

**अर्थ**—कर्मयोगयुक्त, शुद्धचित्त, जितदेह, जितेंद्रिय ( व )-ज्याचा आत्मा[१] सर्व भूतांच्या आत्मरूप झाला आहे-( असा ) ( पुरुष ) ( सर्व ) कर्में[२] करीत[२] असतांही[२] ( त्यापासून ) अलिप्त असतो.

जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें ।
मग आत्मस्वरूपीं घातलें । रोबूनियां ॥ ३४ ॥

**अन्वय**—जेणें मन भ्रांतीपासूनि हिरतलें[१], गुरुवाक्यें[२] धुतलें[३], मग आत्मस्वरूपीं रोवूनियां घातलें[४].

**अर्थ**—ज्यानें ( आपलें ) चित्त मिथ्याज्ञानापासून काढून[१] घेतलें[१] ( व ) गुरूच्या[२] उपदेशानें[२] शुद्ध[३] केलें[३] ( आणि ) नंतर आत्मस्वरूपामध्यें रोवून दृढ[४] बसविलें[४].

जैसें समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें अल्प आवडे ।
मग होय सिंधूचि एवढें । मिळे तेव्हां ॥ ३५ ॥

**अन्वय**—जैसें ( जंव ) लवण समुद्रीं न पडे तंव ( तें ) वेगळें अल्प आवडे मग ( जेव्हा तें सिंधु ) मिळे तेव्हां सिंधूचि एवढें होय.

**अर्थ**—ज्याप्रमाणें ( जोपर्यंत ) मीठ समुद्रांत पडलें नाहीं तोंपर्यंत ( तें ) वेगळें ( राहिल्यानें ) लहान दिसतें ( आणि ) मग ( जेव्हां तें समुद्रांत ) मिळतें. ( म्ह. समुद्रांत पडतें ) तेव्हां ( तें ) समुद्राएवढें ( मोठें ) होतें.

तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें ।
तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ॥ ३६ ॥

**अन्वय**—तैसें जयाचें मनचि संकल्पोनि काढिले[1] चैतन्य जाहलें तेणें एकदेशियें[2] परी[2] लोकत्रय[3] व्यापिलें[4].

**अर्थ**—त्याप्रमाणें ज्याचें चित्तच संकल्पापासून काढिलें[1] गेल्यामुळें[1] चैतन्य झालें तो परिमित[2] देश[2] व्यापीत[2] असूनही[2] तिन्ही[3] लोक[3] व्यापून[4] टाकतो[4].

आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें ।
आणि करी जऱ्ही आघवें । तऱ्ही अकर्ता तो ॥ ३७ ॥

**अन्वय**—आतां कर्ता कर्म करावें हें तया स्वभावें खुंटलें, आणि जऱ्ही ( तो ) आघवें करी तऱ्ही तो अकर्ता[1] ( होय ).

**अर्थ**—आतां कर्ता, कर्म, ( व ) करणें हें त्याचें सहजच थांबलें आणि जरी ( तो ) सर्व करितो तरी तो न[1] करणारा[1] ( ठरतो ).

**नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।**
**पश्यन्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ८ ॥**
**प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥ ९ ॥**

**अन्वय**—युक्तः तत्त्ववित्, पश्यन्, शृण्वन्, स्पृशन्[1], जिघ्रन्[2], अश्नन्, गच्छन्, स्वपन्, श्वसन्[3], प्रलपन्, विसृजन्[4], गृह्णन्, उन्मिषन्[5], निमिषन्, अपि, इंद्रियाणि इंद्रियार्थेषु[6] वर्तन्ते[7] इति धारयन्, किंचित् एव न करोमि इति मन्येत ॥

**अर्थ**—कर्मयोगी तत्त्वज्ञ ( पुरुषानें ) पहातांना, ऐकतांना, स्पर्श[1] करितांना[1], वास[2] घेतांना[2], खातांना, चालतांना, निजतांना, श्वासोच्छ्वास[3] करि-

तांना[3], बोलतांना, विसर्जन[४] करितांना[४], घेतांना,– ( डोळ्यांच्या ) पापण्या[५] उघडतांना[५] ( व ) मिटतांना – सुद्धां, इंद्रियें ( आपआपल्या ) विषयांचे[६] ठिकाणीं[६] वर्तत[७] आहेत[७], असें ( मनांत ) समजून ( मी ) कांहीं एक करीत नाहीं असें समजावें.

जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठऊ नाहीं ।
तरी कर्तृत्व कैचें काई । उरे सांगें ॥ ३८ ॥

**अन्वय**—जे पार्था ( जरी ) तया देहीं[१] मी ऐसा आठऊ नाहीं तरी कैचें काई कर्तृत्व उरे सांगें.

**अर्थ**–कारण अर्जुना ( जर ) त्याला देहाचे[१] ठिकाणीं[१] 'मी ( देह )' अशी जाणीव नाहीं तर ( त्याचे ठिकाणीं ) कसलें ( व ) कोणतें कर्तृत्व उरणार? ( तें ) सांग.

ऐसे तनुत्यागेंवीण । अमूर्ताचे गुण ।
दिसती संपूर्ण । योगयुक्ता ॥ ३९ ॥

**अन्वय**—ऐसे अमूर्ताचे[१] संपूर्ण गुण तनुत्यागेंवीण योगयुक्ता[२] दिसती.

**अर्थ**—याप्रमाणें अव्यक्त[१] परमात्म्याचे[१] सर्व धर्म शरीरत्यागापूर्वीच (कर्म) योगयुक्ताचे[२] ठिकाणीं[२] दिसतात.

एऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरी ।
अशेषींही व्यापारीं । वर्ततु दिसे ॥ ४० ॥

**अन्वय**—एऱ्हवीं आणिकांचिये परी तोही एक शरीरी अशेषींही व्यापारीं वर्ततु दिसे.

**अर्थ**—येऱ्हवीं दुसऱ्यांच्या-प्रमाणें तोसुद्धां एक, शरीर धारण करणारा ( असून ) सर्व व्यवहारांत व्यापृत दिसतो ( म्ह. सर्व व्यवहार करतो ).

तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकतु आहे ।
परी तेथींचा सर्वथा नोहे । नवल देखें ॥ ४१ ॥

**अन्वय**—तोही नेत्रीं पाहे, श्रवणीं ऐकतु आहे, परी नवल देखें तेथींचा[१] सर्वथा नोहे.

**अर्थ**—तोसुद्धां डोळ्यांनीं पाहतो, कानांनीं ऐकत असतो, परंतु आश्चर्य पहा ( कीं ) त्या[१] ठिकाणचा[१] ( तो ) मुळींच नसतो ( म्ह. पाहण्या–ऐकण्याच्या कर्मांनीं तो मुळींच लिप्त होत नाहीं ).

स्पर्शासि तरी जाणे । परिमळु सेवी घ्राणें ।
अवसरोचित बोलणें । तयाहि आथी ॥ ४२ ॥

**अन्वय**—( तो ) स्पर्शासि तरी जाणे, घ्राणें परिमळु सेवी, अवसरोचित बोलणें तयाहि आथी.

**अर्थ**—( तो ) स्पर्शाला तर जाणतो, नाकानें वास घेतो, समयोचित बोलणें त्याचेही ( ठिकाणीं ) असतें.

आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी ।
निद्रेचिया अवसरीं । निदैजे सुखें ॥ ४३ ॥

**अन्वय**—( तो ) आहारातें स्वीकारी[१] ( जें ) त्यजावें तें परिहरी, निद्रेचिया अवसरीं सुखें निदैजे.

**अर्थ**—( तो ) अन्नाचें ग्रहण[१] करतो[१], ( जें ) टाकावें तें टाकतो झोंपेच्या वेळीं सुखानें निजतो.

आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालतु दिसे ।
पैं सकळ कर्म ऐसें । राहाटे कीर ॥ ४४ ॥

**अन्वय**—गा तोही आपुलेनि इच्छावशें चालतु दिसे पैं[१] सकळ कर्म ऐसें कीर राहाटे.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ), तोसुद्धां आपुल्या इच्छेनुसार चालतांना दिसतो पहा[१] कीं,[१] ( तो ) सगळेच व्यापार असे खरोखर करतो.

हें सांगों काई एकैक । देखें श्वासोच्छ्वासादिक ।
आणि निमिषोन्निमिष । आदिकरूनि ॥ ४५ ॥

**अन्वय**—हें काई एकैक[१] सांगों देखें श्वासोच्छ्वासादिक[१] आणि निमिषोन्निमिष आदिकरूनि.

**अर्थ**—हें काय एक[१] एक[१] सांगूं, पहा,–श्वास घेणें व[१] सोडणें इत्यादि–आणि–डोळे मिटणें व[२] उघडणें––इत्यादि.

पार्था तयाचे ठायीं । हें आघवेंचि आथि पाहीं ।
परी तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें ॥ ४६ ॥

**अन्वय**—पार्था हें आघवेंचि तयाचे ठायीं आथि पाहीं परी तो प्रतीतिबळें[१] कर्ता कांहीं नव्हे.

**अर्थ**—अर्जुना, हें सर्वच त्याच्या ठिकाणीं असतें (असें) समज; परंतु तो अनुभवाच्या[१] बळानें[१] कर्ता मुळींच नसतो (कारण कर्तेपणाची जाणीव त्याच्या ठिकाणीं नसते).

जैं भ्रांतिसेजे सुतला । तैं स्वप्नसुखें भुतला ।
मग तो ज्ञानोदयीं चेइला । म्हणोनियां ॥ ४७ ॥

**अन्वय**—जैं (तो) भ्रांतिसेजे[१] सुतला तैं स्वप्नसुखें भुतला[२] मग तो ज्ञानोदयीं[३] चेइला[४] म्हणोनियां.

**अर्थ**—जेव्हां (तो) अज्ञानरूपी[१] अंथरुणावर[१] निजतो तेव्हां स्वप्नसुखानें भुलतो (म्ह. स्वप्नसुखाचा अनुभव घेतो.) नंतर तो ज्ञानाच्या[३] उदयकालीं[३] जागा[४] होतो[४] म्हणून (तो आपणांस कर्ता समजत नाहीं).

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥**

**अन्वय**—यः कर्माणि ब्रह्मणि[१] आधाय[२] संगं त्यक्त्वा करोति, सः अंभसा-पद्मपत्रं[३] इव पापेन न[४] लिप्यते[४] ॥

**अर्थ**—जो कर्मे, ब्रह्माचें[१] ठायीं[१] अर्पण[२] करून[२] (व) फलासक्ति टाकून करतो, तो पाण्यानें कमलाचें[३] पान[३] जसें (लिप्त होत नाहीं, तसा) पापानें लिप्त[४] होत[४] नाहीं[४].

आतां अधिष्ठानसंगती । अशेषाही इंद्रियवृत्ती ।
आपुलालिया अर्थीं । वर्तत आहाती ॥ ४८ ॥

**अन्वय**—आतां अशेषाही इंद्रियवृत्ती[१] अधिष्ठानसंगती[२] आपुलालिया अर्थीं[३] वर्तत आहाती.

**अर्थ**—आतां सर्व इंद्रियांचे[१] व्यापार[१] चैतन्याच्या[२] आश्रयानें[२] आप-आपल्या भोग्य[३] वस्तूंच्या[३] ( म्ह. विषयांच्या ) ठिकाणीं[३] होत असतात.

दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे ।
देहीं कर्मजात तैसें । योगयुक्ता ॥ ४९ ॥

**अन्वय**—जैसे गृहींचे व्यापार दीपाचेनि प्रकाशें ( घडती ) तैसें योगयुक्ता देहीं[१] कर्मजात[२] ( घडे ).

**अर्थ**—ज्याप्रमाणें घरांतील व्यवहार दिव्याच्या प्रकाशानें ( घडतात ) त्याप्रमाणें ( कर्म ) योगयुक्ताच्या शरिराचें[१] ठिकाणीं[१] ( इंद्रियांचे ) सर्व[२] व्यापार[२] ( ज्ञानाच्या आश्रयानें ) ( घडतात ).

तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे ।
जैसें न सिंपे जळीं जळें । पद्मपत्र ॥ ५० ॥

**अन्वय**—तो सकळें कर्में करी परी कर्मबंधा[१] नाकळे[२] जैसें पद्मपत्र[३] जळीं जळें न[४] सिंपे[४].

**अर्थ**—तो सर्व कर्में करतो, परंतु कर्माच्या[१] पाशानें[१] बद्ध[२] होत[२] नाहीं[२] ( म्ह. आकळला जात नाहीं ) ( कशाप्रमाणें तर ) ज्याप्रमाणें कमळाचें[३] पान[३] पाण्यांत ( असून ) पाण्यानें लिप्त[४] होत[४] नाहीं[४] ( म्ह. भिजत नाहीं ).

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥ ११ ।**

**अन्वय**—योगिनः आत्मशुद्धये संगं त्यक्त्वा कायेन मनसा बुद्ध्या केवलैः इंद्रियैः अपि कर्म कुर्वन्ति ॥

**अर्थ**—( निष्काम ) कर्मयोगी चित्तशुद्धीसाठीं फलासक्ति टाकून ( केवळ ) शरिरानें, ( केवळ ) मनानें, ( केवळ ) बुद्धीनें, ( आणि ) केवळ इंद्रियांनीं सुद्धां कर्में करितात.

देखें बुद्धीची भाष नेणिजे । मनाचा अंकुर नुदैजे ।
ऐसा व्यापारु तो बोलिजे । शारीरु गा ॥ ५१ ॥

**अन्वय**—गा देखें ( जेथें ) बुद्धीची भाष नेणिजे[१] ; मनाचा अंकुर नुदैजे[२] ऐसा व्यापारु तो शारीरु बोलिजे.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) पहा; ( ज्या क्रियेंत ) बुद्धीचें म्हणणें ऐकूं[१] येत[१] नाहीं[१] ( म्ह. बुद्धि सहभागी होत नाहीं ); मनाचा संकल्प (मुळींच) उत्पन्न[२] होत[२] नाहीं[२], अशी ( जी ) क्रिया, तिला 'शारीर' ( कर्म ) म्हणतात.

हेंच मराठें परियेसीं । तरी बाळकाचीं चेष्टा जैसी ।
योगिये कर्मे करिती तैसीं । केवळा तनू ॥ ५२ ॥

**अन्वय**—( जरी ) हेंच मराठें[१] परियेसीं[२] तरी ( ऐकें ) जैसी बाळकाची चेष्टा ( घडे ) तैसीं योगिये कर्मे केवळा तनू करिती.

**अर्थ** ( जर ) हेंच सोप्या[१] भाषेंत[१] (तुला) ऐकावयाचें[२] असेल[२] तर ( पुढील निरूपण ऐक ); ज्याप्रमाणें बालकाचें कर्म ( केवळ शरिरानें घडतें ) त्याप्रमाणें कर्मयोगी, कर्मे केवळ शरिरानें करितात.

मग पांचभौतिक संचलें । जेव्हां शरिर असे निदेलें ।
तेथ मनचि राहाटे एकलें । स्वप्नीं जेवीं ॥ ५३ ॥

**अन्वय**—मग जेव्हां पांचभौतिक संचलें शरीर निदेलें असे ( तेव्हां ) तेथ स्वप्नीं जेवीं मनाचि एकलें राहाटे[१].

**अर्थ**—मग जेव्हां पंचमहाभूतांचें बनलेलें शरीर निजलेलें असतें, ( तेव्हां ) तेथें स्वप्नांत ज्याप्रमाणें मनच एकटें व्यापार[१] करतें.[१]

नवल ऐकें धनुर्धरा । कैसा वासनेचा संसारा ।
देहा होऊं नेदी उजगरा । परी सुखदुःखें भोगी ॥ ५४ ॥

**अन्वय**—धनुर्धरा नवल ऐकें, वासनेचा संसारा कैसा, देहा उजगरा होऊं नेदी[१] परी सुखदुःखें भोगी[२].

**अर्थ**—अर्जुना ( हें ) आश्चर्य पहा, वासनेचें प्राबल्य केवढें ( आहे )? ( असें कीं, ही वासना ) देहाला ( तर ) जागें होऊं देत[१] नाहीं[१], परंतु सुखदुःखाचा अनुभव[२] घ्यावयास[२] लावते[२].

इंद्रियांच्या गांवीं नेणिजे । ऐसा व्यापारु जो निपजे
तो केवळ गा म्हाणिजे । मानसाचा ॥ ५५ ॥

**अन्वय**—गा, इंद्रियांच्या गांवीं नेणिजे[१] ऐसा जो व्यापारु निपजे तो केवळ मानसाचा म्हणिजे[२].

**अर्थ**—अरे ( अर्जुना ), इंद्रियांच्या क्षेत्रांत जाणलें[१] जात[१] नाहीं[१] असें जें कर्म घडतें, तें केवळ ' मानसिक ' ( कर्म ) म्हटलें[२] जातें[२].

योगिये तोही करिती । परी कर्में तेणें न बंधिजती ।
जे सांडिली आहे संगती । अहंभावाची ॥ ५६ ॥

**अन्वय**—योगिये तोही करिती परी तेणें कर्में न[१] बंधिजती[१] जे अहंभावाची संगती सांडिली आहे.

**अर्थ**—कर्मयोगी तेंही ( कर्म ) करतात, परंतु त्या कर्मानें बांधले[१] जात[१] नाहींत[१], कारण (त्यानीं ) अहंकाराचा संबंध टाकलेला असतो.

आतां जाहालिया भ्रमहत । जैसें पिशाचाचें चित्त ।
मग इंद्रियांचें चेष्टित । विकुळु दिसे ॥ ५७ ॥

**अन्वय**—आतां जैसें पिशाचाचें[१] चित्त भ्रमहत जाहालिया[२] मग ( तेया ) इंद्रियाचें चेष्टित विकुळ दिसे.

**अर्थ**—आतां ज्याप्रमाणें भूतानें[१] झपाटलेल्या[१] माणसाचें[१] मन भ्रमिष्ट झालें[२] असतां[२], मग ( त्याच्या ) इंद्रियांचें कर्म विसंगत दिसतें ( त्याप्रमाणें )—

स्वरूप तरी देखे । आळविलें आइके ।
शब्दु बोले मुखें । परी ज्ञान नाहीं ॥ ५८ ॥

**अन्वय**—स्वरूप तरी देखे, आळविलें आइके, मुखें शब्दु बोले परी ज्ञान नाहीं.

**अर्थ**—( तो ) रूप तर पहातो, बोललेलें ऐकतो, तोंडानें शब्दही बोलतो, परंतु ( या तिन्ही कर्मांची ) जाणीव ( त्याचे ठिकाणीं ) नसते.

हें असो काजेंविण । जें जें कांहीं कारण ।
तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें ॥ ५९ ॥

**अन्वय**—हें असो;[१] काजेंविण जें जें कांहीं कारण ( घडे ) तें कर्म केवळ इंद्रियांचें जाण.

**अर्थ**—हें राहूं[१] दे[१]; हेतूवांचून जें जें कांहीं कर्म ( घडतें ) तें ( तें ) कर्म केवळ इंद्रियांचें ( आहे असें तूं ) समज.

मग सर्वत्र जें जाणतें । तें बुद्धीचें कर्म निरुतें ।
वोळख अर्जुनातें । म्हणे हरी ॥ ६० ॥

**अन्वय**—मग सर्वत्र[१] जाणतें जें ( कर्म ) तें बुद्धीचें कर्म ( होय ) निरुतें वोळख; हरी अर्जुनातें म्हणे.

**अर्थ**—मग सर्व[१] ठिकाणीं[१] ( म्ह. शब्दस्पर्शादि विषयांत ) जाणण्याचें जें ( कर्म ), तें बुद्धीचें कर्म ( होय, असें तूं ) निश्चयानें जाण ( असें ) श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले.

ते बुद्धि धुरे करुनी । कर्म करिती चित्त देउनी ।
परी ते नैष्कर्म्यापासुनी । मुक्त दिसती ॥ ६१ ॥

**अन्वयः**—ते बुद्धि धुरे करुनी चित्त देउनी कर्म करिती, परी ते नैष्कर्म्यापासुनी[१] मुक्त दिसती.

**अर्थ**—ते ( निष्काम ) बुद्धीला प्राधान्य देऊन, मन लावून, कर्म करतात, तरीसुद्धां ते ज्ञानी[१] पुरुषाहूनही[१] मुक्त दिसतात.

जे बुद्धीचिये ठावूनि देहीं । तयां अहंकाराची सेचि नाहीं ।
म्हणोनि कर्मे चि करितां पाहीं । चोखाळले ॥ ६२ ॥

**अन्वय**—जे बुद्धीचिये ठावूनि देहीं तयां[१] अहंकाराची सेचि नाहीं म्हणोनि पाहीं कर्मे करितां[२] चि[२] चोखाळले.[३]

**अर्थ**—कारण, बुद्धीपासून तों देहापर्यंत त्यांच्या[१] ठिकाणीं[१] अहंबुद्धीची जाणीवच नसते, म्हणून ( तूं ) समज ( कीं ) ( ते ) कर्मे करीत[३] असतांनाही[२] शुद्ध[३] असतात.[३]

अगा करितेनवीण कर्म । तेंचि तें नैष्कर्म्य ।
हें जाणती सुवर्म । गुरुगम्य जें ॥ ६३ ॥

**अन्वय**—अगा '( जें ) कर्म करितेवीण ( घडे ) तेंचि तें नैष्कर्म्य[१] ( आथि ) हें जें गुरुगम्य[२] सुवर्म ( तें, ते ) जाणती.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ), ( जें ) कर्म कर्त्यावांचून ( म्हणजे मी कर्ता आहें ह्या जाणिवेवांचून ) ( घडतें ), तेंच तें निष्कर्मसंज्ञक[१] कर्म[१] ( होय ), हें जें गुरूपासून[२] कळणारें[२] रहस्य ( तें, प्राप्तपुरुष ) जाणतात.

आतां शांतरसाचें भरितें । सांडीत आहे पात्रातें ।
जें बोलणें बोलापरौतें । बोलवलें ॥ ६४ ॥

**अन्वय**—आतां शांतरसाचें भरितें पात्रातें[१] सांडीत[२] आहे जें बोलापरौतें[३] बोलणें बोलवलें[४].

**अर्थ**—आतां शांतरसाचा भर भांड्याच्या[१] कांठावरून[१] बाहेर[२] सांडत[२] आहे, कारण शब्दानें[३] न[३] सांगतां[३] येण्यासारिखा[३] अभिप्राय ( शब्दांनीं ) सांगतां[४] आला[४].

एथ इंद्रियांचा पांगु । जया फिटला आहे चांगु ।
तयासीचि आथि लागु । परिसावया ॥ ६५ ॥

**अन्वय**—एथ जया इंद्रियांचा पांगु चांगु फिटला[१] आहे तयासीचि परिसावया लागु आथि.

**अर्थ**—ह्या ठिकाणीं ज्याच्यावरील इंद्रियांची पकड संपूर्ण नाहींशी[१] झाली[१] आहे, त्यालाच ऐकण्याची योग्यता आहे.

हा असो अतिप्रसंगु । न संडीं पां कथालागु ।
होईल श्लोकसंगतिभंगु । म्हणऊनियां ॥ ६६ ॥

**अन्वय**—हा अतिप्रसंगु असो[१], श्लोकसंगतिभंगु[२] होईल[२] म्हणऊनियां कथालागु[३] न संडीं.

**अर्थ**—हें विषयांतर राहूं[१] दे[१]. श्लोकांच्या[२] अर्थाची[२] सुसंगतता[२] बिघडेल[२] म्हणून कथेचें[३] सूत्र[३] सोडूं नकोस.

जें मना आकळितां कुवाडें । घांघुसितां बुद्धी नातुडे ।
तें दैवाचेनि सुरवाडें । सांगवलें तुज ॥ ६७ ॥

**अन्वय**—जें आकळितां[१] मना कुवाडें[२], घांघुसितां[३] बुद्धी मातुडे[४] तें दैवाचेनि[५] सुरवाडें[५] तुज सांगवलें[६].

**अर्थ**—जें जाणूं[१] जातां[१] मनास बिकट[२] वाटतें[२], बारकाईनें[३] शोधूं[३] जातां[३] बुद्धीला सांपडत[४] नाहीं[४] तें, दैव[५] अनुकूल[५] असल्याकारणानें[५] तुला सांगतां[६] आलें[६].

जें शब्दातीत स्वभावें । तें बोलींचि जरी फावे ।
तरी आणिकें काय करावें । सांगें कथा ॥ ६८ ॥

**अन्वय**— जें स्वभावें शब्दातीत[१] तें जरी बोलींचि फावे[२] तरी आणिकें[३] काय करावें कथा सांगें.

**अर्थ**— जें स्वभावतः शब्दाला[१] अगोचर[१] तें जर शब्दांनींच सांगतां[२] आलें[२] तर याहून[३] दुसरें[३] ( आणखी ) काय पाहिजे, ( म्हणून ) कथा सांग.

हा आर्तिविशेषु श्रोतयांचा । जाणोनि दास निवृत्तीचा ।
म्हणे संवादु तया दोघांचा । परिसोनि परिसा ॥ ६९ ॥

**अन्वय**--हा श्रोतयाचा आर्तिविशेषु[१] जाणोनि निवृत्तीचा दास म्हणे तया दोघांचा संवादु परिसोनि[२] परिसा.

**अर्थ**--ही श्रोत्यांची तीव्र[१] उत्कंठा[१] जाणून निवृत्तिदासांचे शिष्य ( ज्ञानदेव ) म्हणाले, "त्या दोघांचें संभाषण ( जें आतांपर्यंत ) ऐकत[२] आलांत[२] ( तसेंच पुढें लक्ष देऊन ) ऐका."

मग श्रीकृष्ण म्हणे पार्थातें । आतां प्राप्ताचें चिन्ह पुरतें ।
सांगेन तुज निरुतें । चित्त देईं ॥ ७० ॥

**अन्वय**—मग श्रीकृष्ण पार्थातें म्हणे आतां प्राप्ताचें[१] चिन्ह तुज पुरतें सांगेन निरुतें चित्त देईं.

**अर्थ**—मग श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, आतां ब्रह्मानुभवी[१] पुरुषाचें[१] लक्षण तुला पूर्णपणें सांगतों, ( तूं ) चांगलें लक्ष दे.

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।
अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥**

**अन्वय**—युक्तः कर्मफलं त्यक्त्वा नैष्ठिकीम् शांतिं आप्नोति, अयुक्तः कामकारेण[1] फले[2] सक्तः[3] निबध्यते[4]॥

**अर्थ**—'कर्मयोगी कर्मफल सोडून नैष्ठिक (म्ह. परब्रह्मरूप) शांति (म्ह. मोक्ष) मिळवितो; कर्मयोगहीन (पुरुष) वासनेच्या[1] योगानें[1] फलाच्या[2] ठायीं[2] आसक्त[3] होत्साता[3] (पापपुण्यानें) बांधला[4] जातो[4].

तरी आत्मयोगें आथिला । जो कर्मफळासि विटला ।
तो घर रिघोनि वरिला । शांती जगीं ॥ ७१ ॥

**अन्वय**—तरी जो आत्मयोगें आथिला[1] कर्मफळासि विटला[2] तो जगीं शांती घर रिघोनी वरिला.

**अर्थ**—तरी जो आत्मज्ञानानें संपन्न[1] असतो[1] (आणि) (ज्याला) कर्मफलाचा वीट[2] आलेला[2] असतो[2], त्याला (याच) जगतामध्यें मुक्ति (त्याच्या) घरांत शिरून वरते.

येरु कर्मबंधें किरीटी । अभिलाषाचिया गांठी ।
कळासला खुंटीं । फळभोगाच्या ॥ ७२ ॥

**अन्वय**—किरीटी येरु कर्मबंधें[1] अभिलाषाचिया गांठी[2] फलभोगाच्या खुंटीं कळासला.[3]

**अर्थ**—(हे) अर्जुना, दुसरा (अनात्मज्ञानी) कर्मांच्या[1] दोरीनें[1] फलाशारूपी गांठ[2] मारून[2] फळभोगरूपी खुंट्याला बांधला[3] जातो.[3]

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥**

**अन्वय**—वशी देही सर्वकर्माणि[1] मनसा संन्यस्य नवद्वारे[2] पुरे न[4] एव[3] कुर्वन्[4] न कारयन् सुखं आस्ते ॥

**अर्थ**—जितेंद्रिय देहवान् (पुरुष) सर्व[1] कर्में[1] मनानें सोडून नऊ[2] द्वारांच्या[2] (देहरूपी) नगरात कांहींएक[3] न[4] करितां[4] (व) न करवितां सुखानें (म्ह. आनंदानें) राहतो.

जैसा फळाचिया हावे । ऐसें कर्म करी आघवें ।
मग न कीजेचि येणें भावें । उपेक्षी जो ॥ ७३ ॥

**अन्वय**—जैसा फळाचिया हावे[1] ऐसें आघवें कर्म करी मग न[2] कीजोचि[2] येणें भावें जो उपेक्षी[3].

**अर्थ**—ज्याप्रमाणें ( एखादा ) फळाच्या तीव्र[1] इच्छेनें[1] ( कर्म करितो ) त्याप्रमाणें ( जो ) सर्व कर्में करितो ( आणि ) नंतर ( मीं ) केलेंच[2] नाहीं[2] या भावनेनें जो ( त्या कर्मांचा ) त्याग[3] करितो[3].

तो जयाकडे वास पाहे । तेउती सुखाची सृष्टि होये ।
तो म्हणे तेथ राहे । महाबोधु ॥ ७४ ॥

**अन्वय** — तो जयाकडे[1] वास पाहे तेउती[3] सृष्टि सुखाची होये तो ( जेथ ) म्हणे तेथ महाबोधु राहे.

**अर्थ** — तो ज्या[1] क्षेत्रावर[1] ( थोडीसुद्धां ) दृष्टि फेंकतो तेवढें[3] सर्व[3] क्षेत्र सुखमय होतें, तो ( जेथें ) सांगेल तेथें ब्रह्मज्ञान राहतें.

नवद्वारें देहीं । तो असतुचि परी नाहीं ।
करितुचि न करी कांहीं । फलत्यागी ॥ ७५ ॥

**अन्वय**— तो. फलत्यागी[1] नवद्वारें[2] देहीं असतुचि[3] परी[3] नाहीं,[4] करितुचि[5] कांहीं न[6] करी[6].

**अर्थ**— तो फलेच्छा[1] टाकणारा[1] ( पुरुष ) नऊ[2] छिद्रांनीं[2] युक्त[2] ( अशा ) देहामध्यें राहत[3] असूनही[3] नसल्यासारखा[4] असतो,[4] करीत[5] असतांनाही[5] कांहींही न[6] केल्यासारखा[6] असतो.[6]

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥**

**अन्वय**—प्रभुः लोकस्य कर्तृत्वं, कर्माणि, कर्मफलसंयोगं[1] न[2] सृजति[2] तु स्वभावः प्रवर्तते ॥

**अर्थ**—परमेश्वर ( म्ह. परब्रह्म ) लोकांचें कर्तृत्व, ( त्यांचीं ) कर्में, ( किंवा त्यांना प्राप्त होणारी ) कर्मफलाची[1] जोड[1] उत्पन्न[2] करीत[2] नाहीं[2] परंतु प्रकृति ( च ) ( सर्व कांहीं ) करते.

जैसा का सर्वेश्वरु । पाहिजे तंव निर्व्यापारु ।
परि तोचि रची विस्तारु । त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥

**अन्वय** — जैसा सर्वेश्वरु पाहिजे[१] तंव[१] निर्व्यापारु ( दिसे ) परि तोचि त्रिभुवनाचा[२] विस्तारु रची[३].

**अर्थ** — ज्याप्रमाणें परमेश्वर ( हा ) पाहिला[१] गेला[१] असतां[१], क्रियाशून्य ( दिसतो ) परंतु तोच तिन्ही[२] लोकांचा[२] पसारा निर्माण[३] करितो[३].

आणि कर्ता ऐसें म्हणिपे । तरी कवणीं कर्मीं न शिंपे ।
जे हातुपावो न लिंपे । उदासवृत्तीचा ॥ ७७ ॥

**अन्वय** — आणि ( जरी तो ) कर्ता ऐसें म्हणिपे तरी ( तो ) कवणीं कर्मीं न[१] शिंपे[१] जे उदासवृत्तीचा हातुपावो न[२] लिंपे[२].

**अर्थ** — आणि ( जर तो ) कर्ता ( आहे ) असें म्हणावें तर ( तो ) कोणत्याही कर्मानें लिप्त[१] होत[१] नाहीं[१], कारण ( त्याच्या ) उदासीनतेच्या हातापायाला ( बिलकूल ) स्पर्श[२] होत[२] नाहीं[२] ( म्ह. त्याची उदासीनता तिळमात्रही बिघडत नाहीं ).

योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणा सळु न पडे ।
परी महाभूतांचें दळवाडें । उभारी भलें ॥ ७८ ॥

**अन्वय**—( तेयाची ) योगनिद्रा तरी न[१] मोडे[१] ( आणि ) अकर्तेपणा सळु न पडे परी ( तो ) महाभूतांचें भलें दळवाडें उभारी.[२]

**अर्थ**—( त्याची ) सहजस्वरूपस्थिति तर भग्न[१] होत[१] नाहीं[१] ( आणि ) अकर्तेपणालाही ( कांहीं ) न्यूनता येत नाहीं, तरीपण ( तो ) महाभूतांचा चांगला संच निर्माण[२] करतो.[२]

जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा कहीं नोहे ।
जगचि हें होय जाये । तो शुद्धीही नेणे ॥ ७९ ॥

**अन्वय**--( तो ) जगाच्या जीवीं[१] आहे परी कवणाचा कहीं नोहे,[२] हें जगचि होय[३] जाये[४] तो ( तेयाची ) शुद्धीही नेणे.

**अर्थ**--( तो ) जगांतील प्राणिमात्राच्या[१] ठिकाणीं[१] आहे, परंतु कोणाचा कधींच होत[२] नाहीं[२] ( म्ह. कोणाचीही आसक्ति धरीत नाहीं. ) हें जग उत्पन्न[३] होतें[३] ( व ) नष्ट[४] होतें[४] ( पण ) त्याला ( त्याची ) वार्ताही नसते.

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जंतवः ॥ १५ ॥**

**अन्वय**—विभुः कस्यचित् पापं च[१] एव[१] सुकृतं न आदत्ते, ज्ञानं अज्ञानेन आवृतं[२], तेन जंतवः मुह्यन्ति[३] ॥

**अर्थ**—विभु (सर्वव्यापी परब्रह्म) कोणाचेंहि पाप, त्याचप्रमाणें[१] (कोणाचेंही) पुण्य घेत नाहीं. ज्ञान अज्ञानानें आच्छादिलेलें[२] आहे[२] त्यामुळें जीव मोह[३] पावतात[३] ॥

पापपुण्यें अशेषें । पासींचि असतु न देखे ।
आणि साक्षीही होऊं न ठके । येरी गोठी कायसी ॥ ८० ॥

**अन्वय**—(तो) अशेषें पापपुण्यें पासींचि असतु न देखे आणि[१] साक्षीही होऊं न ठके, येरी गोठी कायसी.

**अर्थ**—(तो) (प्राणिमात्राकडून केलीं जाणारीं) सर्व पापपुण्यें (त्याच्या) सन्निध असतांना (त्यांकडे) पाहत नाहीं, एवढेंच[१] नव्हे[१] (तो त्यांचा) साक्षीही होऊन राहत नाहीं, (मग) दुसरी गोष्ट कशाला ! (म्ह. त्याचा अलिप्तपणा आणखी काय सांगावा ?).

पैं मूर्तीचेनि मेळें । तो मूर्तचि होऊनि खेळे ।
परि अमूर्तपण न मैळे । दादुलयाचें ॥ ८१ ॥

**अन्वय**—तो मूर्तीचेनि मेळें मूर्तचि होऊनि खेळे[१] परि (तेणें) दादुलयाचें[२] अमूर्तपण न[३] मैळे.[३]

**अर्थ**—तो शरिराच्या संयोगानें देहधारी (म्ह. सगुण) होऊन क्रीडा[१] करतो[१], परंतु (त्यामुळें) (त्या) समर्थ[२] पुरुषाच्या[२] निराकारपणांत न्यूनता[३] येत[३] नाहीं[३].

तो सृजी पाळी संहारी । ऐसें बोलती जें चराचरीं ।
तें अज्ञान गा अवधारीं । पंडुकुमरा ॥ ८२ ॥

**अन्वय**—गा पंडुकुमरा तो सृजी[१] पाळी[२] संहारी[३] ऐसें जें चराचरीं बोलती तें अज्ञान अवधारीं.

**अर्थ**—अरे अर्जुना, तो ( जगाची ) उत्पत्ति[१] करतो,[१] पालन[२] करतो[२] ( व ) संहार[3] करतो,[3] असें जें ( ह्या ) जगतांत ( लोक ) म्हणतात तें अज्ञान समज.

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥**

**अन्वय** — तु येषां तत् अज्ञानं आत्मनः ज्ञानेन नाशितं[१], तेषां तत् ज्ञानं आदित्यवत् परं प्रकाशयति ॥

**अर्थ** — पण ज्यांचें तें अज्ञान आत्म्याच्या ज्ञानानें नष्ट[१] झालें[१], त्यांचें तें ज्ञान सूर्याप्रमाणें परमात्म्याला ( सर्व वस्तूंचे ठिकाणीं ) प्रकाशित करतें.

तें अज्ञान जैं समूळ तुटे । तैं भ्रांतीचें मसैरें फिटे ।
मग अकर्तृत्व प्रगटे । ईश्वराचें ॥ ८३ ॥

**अन्वय**—जैं तें अज्ञान समूळ तुटे[१] तैं भ्रांतीचें मसैरें फिटे[२] मग ईश्वराचें अकर्तृत्व प्रगटे[3].

**अर्थ**—जेव्हां तें अज्ञान मुळासकट नाहींसें[१] होतें,[१] तेव्हां भ्रांतिरूप काजळी नष्ट[२] होते.[२] नंतर ईश्वराचा अकर्तेपणा दिसूं[3] लागतो.[3] ( म्ह. अनुभवास येतो ).

एथ ईश्वरु एकु अकर्ता । ऐसें मानलें जरी चित्ता ।
तरी तोचि मी हें स्वभावता । आदीचि आहे ॥ ८४ ॥

**अन्वय**—एथ[१] ईश्वरु एकु अकर्ता ( आथि ) ऐसें[२] जरी चित्ता मानलें तरी स्वभावता तोचि मी हें आदीचि आहे.

**अर्थ**—अशा[१] स्थितींत,[१] ईश्वर एक अकर्ता ( आहे ) ही[२] गोष्ट[२] जर मनाला पटली, तर स्वभावता तोच ( म्ह. ईश्वरच ) मी ( आहें व ) हें मूळ-चेंच ( सिद्ध ) आहें ( म्हणून मीही अकर्ता आहें ).

ऐसेनि विवेकें उदो चित्तीं । तयासि भेदु कैंचा त्रिजगतीं ।
देखे आपुलिया प्रतीती । जगचि मुक्त ॥ ८५ ॥

**अन्वय**—ऐसेनि विवेकें ( जेया ) चित्तीं उदो ( कीजे ) तयासि त्रिजगतीं[१] भेदु कैंचा; ( तो ) आपुलिया प्रतीती जगाचि मुक्त देखे.

**अर्थ**—अशा विचारानें ( ज्याच्या ) मनांत उदय ( केला जातो ) ( म्ह० असा विचार ज्याच्या मनांत उत्पन्न होतो ) त्याला ( या ) तिन्ही[१] लोकांत[१] द्वैत कोठलें ? ( तो ) आपुल्या अनुभवानें ( सर्व ) जगच ( आपल्याप्रमाणें ) मुक्त पाहतो.

जैसी पूर्वादिशेचिया राउळीं । उदया येतांचि सूर्यें दिवाळी ।
कीं येरींही दिशां तियेचि काळीं । काळिमा नाहीं ॥ ८६ ॥

**अन्वय**--जैसी पूर्वदिशेचिया राउळीं सूर्यें उदया येतांचि दिवाळी ( होये ) कीं तियेचि[१] काळीं[१] येरींही दिशां काळिमा नाहीं.[२]

**अर्थ**--ज्याप्रमाणें पूर्वदिशारूपी राजवाड्यात सूर्य उदय पावतांच ( सर्वत्र ) लखलखाट ( होतो ) आणि तत्क्षणींच[१] दुसऱ्याही दिशांतून अंधार नाहींसा[२] होतो.[२]

**तद्‌बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**
**गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥**

**अन्वय**—तद्‌बुद्धयः, तदात्मानः, तन्निष्ठाः तत्परायणाः, ज्ञाननिर्धूतकल्मषाः, अपुनरावृत्तिं, गच्छन्ति[१] ॥

**अर्थ**—( त्या परमार्थ तत्त्वांतच ) ज्यांची बुद्धि रंगली, त्याच्याशीं जे तद्रूप झाले, त्यांतच ज्यांची निष्ठा आहे, ( व ) जे तत्परायण झाले, ( ते ) ज्ञानानें पाप-मल धुऊन गेलेले पुरुष, पुनर्जन्मराहित्यास ( म्ह. मोक्षास ), प्राप्त[१] होतात[१].

बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी आपणा आपण ।
ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । तत्परायण अहर्निशीं ॥ ८७ ॥

**अन्वय**--( तेया ) बुद्धिनिश्चयें[१] आत्मज्ञान ( होये ) ( तो ) आपण आपणा ब्रह्मरूप भावी अहर्निशीं तत्परायण[२] ( सान्ता ) पूर्ण ब्रह्मनिष्ठा राखे.

**अर्थ**--( त्याला ) बुद्धीच्या[१] निश्चयानें[१] आत्मज्ञान ( होतें ) ( मग ) ( तो ) स्वतः आपणांस ब्रह्मरूप मानतो ( आणि ) रात्रंदिवस ब्रह्मांत[२] तल्लीन[२] ( असल्यामुळें ) पूर्ण ब्रह्मस्थिति राखतो.

ऐसें व्यापक ज्ञान भलें । जयांचिया हृदयातें गिंवसित आले ।
तयांचि समतादृष्टि बोलें । विशेषूं काई ॥ ८८ ॥

**अन्वय**--ऐसें भलें व्यापक ज्ञान जयांचिया हृदयातें गिंवसित आले तयांचि समतादृष्टि बोलें काई विशेषूं.

**अर्थ**--( त्याचप्रमाणें ) असें चागलें ( आपल्या ) व्यापकपणाचें ज्ञान ज्यांच्या हृदयाला शोधीत आलें ( म्ह. प्राप्त झालें ) त्यांची अभेददृष्टि ( मी ) शब्दांनीं काय वर्णूं ?

एक आपणपेंचि पां जैसें । ते देखती विश्व तैसें ।
हें बोलणें कायसें । नवलु एथ ॥ ८९ ॥

**अन्वय**—ते जैसें आपणपेंचि एक देखती तैसें विश्व देखती एथ[१] हें बोलणें कायसें नवलु ( असे ).

**अर्थ**—ते ज्याप्रमाणें आपणांस एक पाहतात ( म्ह. ब्रह्मरूप पाहतात ) त्याप्रमाणें जगालाहि पाहतात ( म्ह. ब्रह्मरूप पाहतात ), अशा[१] स्थितींत[१] हें सांगणें, काय आश्चर्यकारक ( आहे ) ?

परी दैव जैसें कवतिकें । कहींचि दैन्य न देखे ।
कां विवेकु हा नोळखे । भ्रांतीतें जेवीं ॥ ९० ॥

**अन्वय**--परी जैसें दैव कवतिकें कहींचि दैन्य न[१] देखे[१] कां जेवीं विवेकु हा भ्रांतीतें नोळखे.[२]

**अर्थ**--परंतु ज्याप्रमाणें भाग्य गमतीनेंहि केव्हांच दारिद्याला पाहूं[१] शकत[१] नाहीं[१] अथवा ज्याप्रमाणें विचार हा भ्रांतीला जाणत[२] नाहीं.[२]

नातरी अंधकाराची वानी । जैसा सूर्यो न देखे स्वप्नीं ।
अमृत नायके कानीं । मृत्युकथा ॥ ९१ ॥

**अन्वय**--नातरी जैसा सूर्यो अंधकाराची वानी स्वप्नीं न देखे ( कां ) अमृत मृत्युकथा[१] कानीं नायके[२].

**अर्थ**--अथवा ज्याप्रमाणें सूर्य ( हा ) अंधकाराचा मासला स्वप्नांत ( सुद्धां ) जाणत नाहीं ( म्ह. अंधकार ही काय चीज आहे हें स्वप्नांतही जाणत नाहीं ) ( किंवा ) अमृत मरणाची[१] वार्ता[१] कानांनीं ऐकूं[२] शकत[२] नाहीं.[२]

हें असो संतापु कैसा । चंद्रु न स्मरे जैसा ।
भूतीं भेदु नेणती तैसा । ज्ञानिये ते ॥ ९२ ॥

**अन्वय**—हें असो[१] जैसा चंद्रु संतापु कैसा[२] ( असे हें ) न स्मरे तैसा ते ज्ञानिये भूतीं भेदु नेणती.[२]

**अर्थ**—हें राहूं[१] दे[१]; ज्याप्रमाणें चंद्राला दाह म्हणजे[२] काय[२] ( असतो हें ) ( कधींच अनुभव नसल्यामुळें ) आठवत नाहीं, त्याप्रमाणें ते ज्ञानी ( पुरुष ) प्राण्यांमध्यें भिन्नभाव जाणत[२] नाहींत.[२]

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**

**अन्वय**—पंडिताः विद्याविनयसंपन्ने[१] ब्राह्मणे,[१] गवि, हस्तिनि, शुनि, च[२] एव[२] श्वपाके, समदर्शिनः ( सन्ति[३] ) ॥

**अर्थ**--ज्ञानी ( पुरुष ) विद्याविनययुक्त[१] ब्राह्मणामध्यें,[१] गायीमध्यें, हत्ती-मध्यें, कुत्र्यामध्यें त्याचप्रमाणें[२] चांडालामध्यें समदृष्टि ( म्ह. समब्रह्म पाहणारे ) ( असतात[३] ).

मग हा मशकु हा गजु । कीं हा श्वपचु हा द्विजु ।
पैल इतरु हा आत्मजु । हें उरेल कें ॥ ९३ ॥

**अन्वय**—मग[१] हा मशकु हा गजु; कीं हा श्वपचु हा द्विजु; पैल इतरु हा आत्मजु हें कें उरेल.

**अर्थ**—अशा[१] स्थितींत[१], हें चिलट, हा हत्ती; अथवा हा अंत्यज, हा ब्राह्मण; पलीकडचा परका, ( व ) हा ( माझा ) मुलगा; हा ( भेद त्याचे ठिकाणीं ) कोठून उरणार ?

नातरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन ।
हें असो कैचें स्वप्न । जागतया ॥ ९४ ॥

**अन्वय**—नातरी हे धेनु हें श्वान, एक गुरु एक हीन, हें असो[१] जागतया[२] स्वप्न कैचें.

**अर्थ**—अथवा ही गाय, हें कुत्रें; एक थोर, एक नीच; हें राहूं[१] दे[१], जागृत[२] पुरुषाला[२] स्वप्न कसलें ?

एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा ।
तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषम काई ॥९५॥

**अन्वय**—एथ[१] भेद तरी देखावा[२] जरी अहंभाव उरला होआवा तो आघवा आधींचि नाहीं[३] आतां विषम काई.

**अर्थ**—अशा[१] स्थितींत[१], भिन्नभाव तरच दिसणें[२] शक्य[२] होईल[२] जर अहंकार उरला असेल; ( पण ) तो ( तर ) सर्व अगोदरच ( समूळ ) नाहींसा[३] झाला[३] आहे[३], आतां भेदभाव कोठें ( राहणार ) ?

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्‌ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥**

**अन्वय**--येषां मनः साम्ये स्थितं[१] तैः इह[२] एव[३] सर्गः जितः हि ब्रह्म निर्दोषं समं[४] तस्मात् ते ब्रह्मणि स्थिताः[५] ॥

**अर्थ**--ज्यांचें मन साम्यावस्थेंत स्थिर[१] झालें,[१] त्यानीं याच[३] लोकीं[२] ( जन्ममरणरूपी ) संसार जिंकला; कारण ब्रह्म दोषशून्य ( व ) सर्वत्र[४] सम[४] ( आहे ) म्हणून ते ( साम्यबुद्धिपुरुष ) ब्रह्मामध्यें ( नेहमीं ) स्थिर[५] झालेले[५] ( असतात ).

म्हणोनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म ।
हें संपूर्ण जाणें वर्म । समदृष्टीचें ॥ ९६ ॥

**अन्वय**—म्हणोनि सर्वत्र[१] सदा[२] सम[३] तें अद्वय ब्रह्म आपणाचि (आथि) हें समदृष्टीचें[४] संपूर्ण वर्म ( तूं ) जाणें.

**अर्थ**—म्हणून सर्व[१] ठिकाणीं,[१] सर्व[२] काळीं,[२] सारखें[३] असणारें[३] तें अद्वितीय ब्रह्म, आपणच ( आहोंत ) ( असें मानणें ) हें ( जें ) समदृष्टि[४] पुरुषाचें[४] समग्र रहस्य ( तें ) ( तूं ) जाण.

जिहीं विषयसंगु न सांडितां । इंद्रियांतें न दंडितां ।
परि भोगिली निःसंगता । कामेंविण ॥ ९७ ॥

**अन्वय**—जिहीं विषयसंगु[१] न सांडितां, इंद्रियांतें न[२] दंडितां[२] कामेंविण[३] निःसंगता भोगिली.

**अर्थ**—जे विषयांचा[१] संबंध[१] न टाकतां ( व ) इंद्रियांचा निग्रह[२] न[२] करितां[२] ( विषयसुखाच्या ) वासनेच्या[३] अभावामुळें[३] अलिप्तता अनुभवतात.

जिहीं लोकांचेनि आधारें । लौकिकेंचि व्यापारें ।
पण सांडिलें निदसुरें । लौकिकु हें ॥ ९८ ॥

**अन्वय**--जिहीं लोकांचेनि[१] आधारें,[१] लौकिकेंचि[२] व्यापारें[२] पण[२] लौकिकु[३] हें निदसुरें सांडिलें.[४]

**अर्थ**--जे लोकांतील[१] रीतीस[१] अनुसरून[१] व्यवहारांतील[२] कृत्यें[२] करीत[२] असतांही[२] ( संसारी ) लोकांच्या[३] ठिकाणीं[३] असलेलें[३] हें अज्ञान टाकून[४] देतात[४].

जैसा जनामाजि खेचरु । असतुचि जना नोहे गोचरु ।
तैसा शरीरी परि संसारु । नोळखे तयातें ॥ ९९ ॥

**अन्वय**—जैसा खेचरु जनामाजि असतुचि जना गोचरु नोहे[१] तैसा शरीरी ( असतेया ) तयातें संसारु नोळखे.[२]

**अर्थ**—ज्याप्रमाणें भूत लोकांमध्यें असूनसुद्धां लोकांना दृश्य होत[१] नाहीं[१] त्याप्रमाणें देहधारी ( असणाऱ्या ) त्याला लोक ( समदृष्टि म्हणून) ओळखत[२] नाहींत[२].

हें असो पवनाचेनि मेळें । जैसें जळींचि जळ लोळे ।
ते आणिक म्हणती वेगळे । कल्लोळ हे ॥ १०० ॥

**अन्वय**—हें असो[१], जैसें पवनाचेनि मेळें जळींचि जळ लोळे ( परी लोक ) म्हणती ते हे कल्लोळ आणिक वेगळे ( आथि ).

**अर्थ**—हें राहूं[१] दे[१]; ज्याप्रमाणें वाऱ्याच्या संगतीनें पाण्यावरच पाणी लोळतें, ( परंतु अज्ञ लोक ) म्हणतात ( कीं, ) त्या ह्या लाटा ( पाण्याहून ) निराळ्या ( म्हणून ) भिन्न ( आहेत ).

तैसें नाम रूप तयाचें । एऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें ।
मन साम्या आलें जयाचें । सर्वत्र गा ॥ १०१ ॥

**अन्वय**—गा ( अर्जुना ), तैसें जयाचें मन सर्वत्र साम्या आलें तयाचें ( जगीं ) नाम रूप ( आथि ) एऱ्हवीं साचें[1] तो ब्रह्मचि ( आथि ).

**अर्थ**—अरे ( अर्जुना ), त्याप्रमाणें ज्याचें मन सर्वत्र अद्वैत पाहतें, त्याला ( जगाच्या दृष्टीनें ) नामरूप ( असतें ), एऱ्हवीं खरें[1] पाहतां[1] तो ब्रह्मच ( आहे ).

ऐसेनि समदृष्टी जो होये । तया पुरुषा लक्षण हि आहे ।
अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें । अच्युत म्हणे ॥ १०२ ॥

**अन्वय**—जो ऐसेनि समदृष्टी होये तयाहि पुरुषा लक्षण आहे, संक्षेपें सांगेन, पाहें ( ऐसें ) अच्युत अर्जुना म्हणे.

**अर्थ**—जो अशा प्रकारें समदृष्टि असतो, अशाही पुरुषाचें चिन्ह आहे, ( तुला ) थोडक्यांत सांगतों, ऐक ( असें ) श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले.

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥**

**अन्वय**—प्रियं[1] प्राप्य[2] न[3] प्रहृष्येत्[3] च अप्रियं प्राप्य[4] न उद्विजेत्[5], स्थिरबुद्धिः असंमूढः ब्रह्मविद् ब्रह्मणि[6] स्थितः[7] ॥

**अर्थ**—इष्ट[1] वस्तु[1] प्राप्त[2] झाली[2] असतां[2] आनंदून[3] जाऊं[3] नये[3] आणि अप्रिय प्राप्त[4] झालें[4] असतां[4] खिन्नहि[5] होऊं[5] नये[5] ( याप्रमाणें ) स्थिरबुद्धि संशयरहित ब्रह्मवेत्ता ( पुरुष ) ब्रह्माचे[6] ठायीं[6] स्थिर[7] झालेला[7] ( असतो ).

तरी मृगजळाचोनि पूरें । जैसें न लोटिजे कां गिरिवरें ।
तैसा शुभाशुभीं न विकरे । पातलां जो ॥ १०३ ॥

**अन्वय**—तरी जैसें गिरिवरें[1] मृगजळाचेनि पूरें[2] न लोटिजे तैसा जो शुभाशुभीं[3] पातलां[4] न[5] विकरे.[5]

**अर्थ**—तर ज्याप्रमाणें मोठा[1] पर्वत[1] मृगजळाचा पूर[2] आला[2] असतां[2] लोटत नाहीं ( म्हणजे वाहत नाहीं ) त्याप्रमाणें जो इष्ट[3] किंवा[3] अनिष्ट[3] गोष्टी[3] प्राप्त[4] झाल्या[4] असतांना,[4] विकार[5] पावत[5] नाहीं.[5]

तोचि तो निरुता । समदृष्टी तत्त्वता ।
हरि म्हणे पांडुसुता । तोचि ब्रह्म ॥ १०४ ॥

**अन्वय**—तोचि निरुता तत्त्वता[1] तो समदृष्टी[2] ( होय ) तोचि ब्रह्म ( असें ) हरि पांडुसुता म्हणे.

**अर्थ**—तोच खरोखर तत्त्व[1] पाहूं[1] जातां[1] असा ऐक्य[2] पाहणारा[2] ( पुरुष ) ( होय ). तोच ब्रह्म ( आहे ) ( असें ) श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले.

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥**

**अन्वय**—बाह्यस्पर्शेषु, असक्तात्मा[1], आत्मनि यत् सुखं तत् विन्दति, सः ब्रह्मयोगयुक्तात्मा[2] अक्षय्यं सुखं अश्नुते[3] ॥

**अर्थ**—बाह्यविषयांमध्यें,-ज्याचें अंतःकरण आसक्त[1] झालेलें नसतें—( त्यालाच ) आत्म्यामध्यें जें सुख ( असतें ) तें मिळतें; तो-ब्रह्मयोगानें[2] ( म्ह. ब्रह्माशीं समरस होऊन ) युक्त झालेला पुरुष- अक्षय्य सुखाचा अनुभव[3] घेतो.[3]

जया आपणपें सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणें नाहीं ।
तो विषय न सेवी हें काई । विचित्र येथ ॥ १०५ ॥

**अन्वय**—जया आपणपें सांडूनि कहीं इंद्रियग्रामावरी[1] येणें नाहीं तो विषय न[2] सेवी[2] येथ विचित्र हें काई.

**अर्थ**—ज्याचें आपल्याला ( म्ह. आत्मस्वरूपाला ) सोडून कधींही इंद्रियरूपी[1] गांवावर[1] येणें ( होत ) नाहीं; तो विषयांचें सेवन[2] करीत[2] नाहीं[2] यांत आश्चर्य तें काय ?

सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडें अंतरें ।
रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घली ॥ १०६ ॥

**अन्वय**—अंतरें[1] स्वसुखाचेनि अपारें सहजें सुरवाडें रचिला[2] म्हणऊनि बाहिरें पाऊल न घली.

**अर्थ**—अंतःकरणांत[१] असलेल्या[१] आत्मसुखाच्या अपरिमित स्वाभाविक विपुलतेनें (तो) भरलेला[२] असतो[२], म्हणून (तो) बाहेर पाऊल घालीत नाहीं (म्ह. विषयांकडे प्रवृत्त होत नाहीं).

सांगें कुमुददळाचेनि ताटें । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें ।
तो चकोरु काई वाळुवंटें । चुंबितु असे ॥ १०७ ॥

**अन्वय**—सांगें जो चकोर कुमुददलाचेनि[१] ताटें चोखटें चंद्रकिरणें जेविला[२] तो वाळुवंटें[३] चुंबितु[४] असे[४] काई.

**अर्थ**—(अर्जुना,) सांग, जो चकोर (पक्षी) कमळाच्या[१] पानाच्या[१] ताटांत शुद्ध चंद्रकिरणांचें भोजन[२] करतो[२], तो वाळूचे[३] कण[३] खातो[४] काय ?

तैसें आत्मसुख उपाइलें । जयासि आपणपांचि फावलें ।
तया विषय सहज सांडवले । म्हणों काई ॥ १०८ ॥

**अन्वय**—तैसें जयासि उपाइलें आत्मसुख आपणपांचि[१] फावलें[२] तया विषय सहज सांडवले काई म्हणों.

**अर्थ**—त्याप्रमाणें, ज्याला उत्कृष्ट आत्मसुख स्वतःच्याच[१] ठिकाणीं[१] प्राप्त[२] झालें,[२] त्याचे विषय सहजच सुटले (हें) काय सांगूं ?

एऱ्हवीं तरी कौतुकें । विचारूनि पाहें पां निकें ।
या विषयांचेनि सुखें । झकवती कवण ॥ १०९ ॥

**अन्वय**—एऱ्हवीं तरी कौतुकें निकें विचारूनि[१] पाहें या विषयांचेनि सुखें कवण झकवती.[२]

**अर्थ**—येऱ्हवीं सुद्धा कौतुकानें चांगला विचार[१] करून[१] पहा; या विषयांच्या सुखानें कोण फसविले[२] जातात[२] ?

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥**

**अन्वय**—हि ये संस्पर्शजाः[१] भोगाः ते दुःखयोनयः[२] एव[२], आद्यंतवंतः[३], (हे) कौंतेय, बुधः तेषु न[४] रमते[४] ॥

**अर्थ**—कारण जे ( इंद्रियें व विषय यांच्या ) संयोगापासून[१] उत्पन्न[१] होणारे[१] भोग ते दुःखजनकच[२] ( म्ह. दुःखाचेंच कारण होत ) ( कारण ते ) –उत्पत्ति[३] ( व ) नाश[३] यांनीं युक्त असलेले ( आहेत )—( म्हणून ) ( हे ) अर्जुना, ज्ञानी ( पुरुष ) त्यांच्यामध्यें रत[४] होत[४] नाहीं[४].

जिहीं आपणपें नाहीं देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले ।
जैसें रंक कां आळुकैलें । तुषांतें सेवी ॥ ११० ॥

**अन्वय**—जिहीं आपणपें देखिलें नाहीं तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले ( कैसें ? ) जैसें आळुकैलें रंक तुषांतें सेवी.

**अर्थ**—ज्यांनीं आत्मस्वरूप अनुभविलें नाहीं, तेच ह्या विषयांत रंगतात; ( कशाप्रमाणें तर ) ज्याप्रमाणें भुकेलेला भिकारी तूससुद्धां खातो.

नातरी मृगें तृषापीडितें । संभ्रमें विसरोनि जळांतें
मग तोयबुद्धी बरडीतें । ठाकूनि येती ॥ १११ ॥

**अन्वय**—नातरी तृषापीडितें[१] मृगें संभ्रमें जळांतें विसरोनि[२] मग तोयबुद्धी[३] बरडीतें ठाकूनि येती.

**अर्थ**—अथवा तहानेनें[१] व्याकूळ[१] झालेलीं[१] हरणें, भांबावून ( वाटेंत लागलेल्या ) पाण्यास न[२] ओळखतां[२] मग पाण्याच्या[३] कल्पनेनें[३] ( म्ह. हें पाणी आहे या कल्पनेनें ) माळरानांत येऊन पोहोंचतात.

तैसें आपणपें नाहीं दिठें । जयातें स्वसुखाचे सदा खरांटे ।
तयासीचि विषय हे गोमटे । आवडती ॥ ११२ ॥

**अन्वय**—तैसें ( जेणें ) आपणपें नाहीं[२] दिठें[१] जयातें स्वसुखाचे सदा खरांटे तयासीचि हे विषय गोमटे आवडती.

**अर्थ**—त्याप्रमाणें ( ज्यानें ) आत्मस्वरूप अनुभविलें[१] नाहीं[२] ( व ) ज्याला आत्मसुखाचा नेहमीं दुष्काळ ( असतो ) त्यालाच हे विषय गोड वाटतात.

एऱ्हवीं विषयीं काइ सुख आहे । हें बोलणेंचि सारिखें नोहे ।
तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे । जगामाजीं ॥ ११३ ॥

**अन्वय**—एऱ्हवीं विषयीं काइ सुख आहे हें बोलणेंचि सारिखें नोहे तरी जगामाजीं विद्युत्स्फुरणें[१] कां न[३] पाहे[२] ?

**अर्थ**—एऱ्हवीं विषयामध्यें कांहीं सुख आहे हें म्हणणें योग्य नाहीं. नाहीं तर ( म्हणजे विषयांत सुख असतें तर ) जगामध्यें विजेच्या[१] चमकण्यानें[१] कां उजाडलें[२] नसतें[३] ?

सांगें वातवर्षआतपु धरे । ऐसें अभ्रच्छायाचि जरी सरे ।
तरी त्रिमाळिकें धवळारें । करावीं कां ॥ ११४ ॥

**अन्वय**—सांगें वातवर्षआतपु[१] अभ्रछायाचि[२] धरे[३] ऐसें जरी सरे तरी त्रिमाळिकें[४] धवळारें[५] कां करावीं ?

**अर्थ**—( अर्जुना ) सांग, वारा,[१] पाऊस[१] ( व ) ऊन[१] ( हीं ) ढगांच्या[२] साउलीनेंच[२] निवारतां[३] येतात[३] असें जर घडेल, तर तीन[४] मजली[४] चुनेगची[५] वाडे[५] कां बांधावे ?

म्हणोनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणतां गा वायां जल्पिजे ।
जैसे महुर कां म्हणिजे । विषकंदातें ॥ ११५ ॥

**अन्वय** — गा ( अर्जुना ), म्हणोनि विषयसुख[१] जें बोलिजे[२] तें नेणतां[३] वायां जल्पिजे[४] जैसें विषकंदाते[५] महुर म्हणिजे.[६]

**अर्थ** — अरे ( अर्जुना ), म्हणून विषयांपासून[१] प्राप्त[१] होणारें[१] सुख[१] ( असें ) जें बोललें[२] जातें,[२] तें ( त्याचा अर्थ ) न[३] कळतां,[३] व्यर्थ बडबड[४] आहे,[४] ज्याप्रमाणें विषारी[५] कांद्याला[५] गोड म्हटलें[६] जातें.[६]

नातरी भौमा नाम मंगळु । रोहिणीतें म्हणती जळु ।
तैसा सुखप्रवादु बरळु । विषयिकु हा ॥ ११६ ॥

**अन्वय**—नातरी भौमा मंगळु नाम ( असे ) रोहिणीतें जळु म्हणती तैसा विषयिकु हा सुखप्रवादु[१] बरळु[२] ( आथि ).

**अर्थ**—अथवा, भूमिपुत्राला ( म्ह. मंगळग्रहाला जसें ) मंगल नांव ( आहे) ( किंवा ) मृगजळाला पाणी म्हणतात; त्याप्रमाणें विषयसुखासंबंधीं ही सुखाची[१] भाषा[१] ( म्हणजे ) निरर्थक[२] बडबड[२] ( आहे ).

हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली ।
ते शीतल होईल केतुली । मूषकासी ॥ ११७ ॥

**अन्वय**—हे आघवी बोली असो[१], सांग पां, सर्पफणीची[२] ते साउली मूषकासी केतुली शीतल होईल ?

**अर्थ**—हें सर्व बोलणें राहू[१] दे[१]. सांग बरें; सर्पाच्या[२] फडेची[२] ती साउली उंदराला कितीशी थंड ( म्हणजे सुखकारक ) वाटेल ?

जैसा आमिषकवलु पांडवा । मीनु न सेवी तंवचि बरवा ।
तैसा विषयसंगु आघवा । निभ्रांत जाणें ॥ ११८ ॥

**अन्वय**—पांडवा, जैसा ( जंव ) मीनु आमिषकवलु न[१] सेवी[२] तंवचि ( तो ) बरवा ( असे ) तैसा आघवा विषयसंगु[३] निभ्रांत जाणें.

**अर्थ**—अर्जुना, ज्याप्रमाणें ( जोंपर्यंत ) मासा, उंडी पकडीत[२] नाहीं,[१] तोंपर्यंतच ( ती ) निरुपद्रवी ( असते ), त्याप्रमाणें ( जोंपर्यंत मनुष्य ) कोणत्याहि विषयाचा[३] संग[३] ( करीत नाहीं, तोंपर्यंतच विषयसंग ) ( निरुपद्रवी असतो. हें तूं ) निश्चित समज.

हें विरक्तांचिये दिठी । जैं न्याहाळिजे किरीटी ।
तैं पांडुरोगाचिये पुष्टी—। सारिखें दिसे ॥ ११९ ॥

**अन्वय**— किरीटी जैं हें विरक्तांचिये[१] दिठी न्याहाळिजे[२] तैं ( तें ) पांडुरोगाचिये पुष्टीसारिखें दिसे.

**अर्थ**—अर्जुना, जेव्हां हें ( विषयसुख ) विरक्त[१] पुरुषांच्या[१] दृष्टीनें बारकाईनें[२] पाहिलें[२] जातें[२], तेव्हां ( तें ) पांडुरोगाच्या लठ्ठपणासारिखें (दिखाऊ) दिसतें.

म्हणोनि विषयभोगीं जें सुख । तें साद्यंतचि जाण दुःख ।
परि काय करिती मूर्ख । न सेवितां न सरे ॥ १२० ॥

**अन्वय**—म्हणोनि विषयभोगीं[१] जें सुख ( आथि ) तें साद्यंतचि[२] दुःख जाण परि मूर्ख काय करिती ( तें ) न[३] सेवितां[३] ( तेयां ) न[४] सरे[५].

**अर्थ**—म्हणून विषयांच्या[१] सेवनांत[१] जें सुख ( असतें ), तें आरंभापासून[२] शेवटपर्यंत[२] दुःखच समज; परंतु मूर्ख काय करणार ! ( तें सुख ) सेविल्यावांचून[३] ( त्यांचें ) सरतच[५] नाहीं[४].

ते अंतर नेणती बापुडे । म्हणोनि अगत्य सेवणें घडे ।
सांगें पूयपंकींचे किडे । काय चिळसी घेती ॥ १२१ ॥

**अन्वय**—ते बापुडे अंतर[१] नेणती[२] म्हणोनि (तेयां) सेवणें[३] अगत्य घडे सांगें पूयपंकींचे[४] किडे चिळसी घेती काय ?

**अर्थ**—त्या बिचाऱ्यांना ( विषयांचें ) आंतील[१] सत्य[१] स्वरूप[१] कळत[२] नाहीं[२], म्हणून ( त्यांच्या हातून ) विषयांचें[३] सेवन[३] अवश्य होतें; बोल, पुवांतील[४] किंवा[४] चिखलांतील[४] किड्यांना ( कधीं त्याचा ) किळस येतो काय ?

तयां दुःखियां दुःखचि जिव्हार । ते विषयकर्दमींचे दर्दुर ।
ते भोगजळातें जलचर । सांडिती केवीं ॥ १२२ ॥

**अन्वय**— तयां दुःखियां[१] दुःखचि जिव्हार, ते विषयकर्दमींचे[२] दर्दुर ( होती ) ते जलचर भोगजळातें[३] केवीं सांडिती ?

**अर्थ**— त्या दुःखी[१] लोकांचें[१] ( विषय सुखरूपी ) दुःखच जीवन (असतें) ( म्ह. त्यावरच ते जगतात ). ते विषयरूपी[२] चिखलातील[२] बेडूक ( होत ); ते ( विषयी लोकरूपी ) मासे भोगरूपी[३] पाण्याला [३] कसें सोडतील ?

आणि दुःखयोनि जिया आहाती । तिया निरर्थका तरी नव्हती ।
जरी विषयांवरी विरक्ती । धरिती जीव ॥ १२३ ॥

**अन्वय** --आणि जरी जीव विषयांवरी विरक्ती धरिती तरी जिया दुःखयोनि[१] आहाती तिया निरर्थका नव्हती[२] ?

**अर्थ**—आणि जर प्राणी विषयांचा वीट धरतील, तर जे क्लेशकारक[१] जन्म[१] आहेत ते अर्थशून्य होणार[२] नाहींत[२] काय[२] ?

नातरी गर्भवासादि संकट । कां जन्ममरणींचे कष्ट ।
हे विसांवेनवीण वाट । वाहवी कवणें ॥ १२४ ॥

**अन्वय**—नातरी गर्भवासादि[१] संकट कां जन्ममरणींचे[२] कष्ट हे वाट कवणें विसांवेनवीण वाहावी[३] ?

**अर्थ**—अथवा आईच्या[1] गर्भात[1] राहणें[1] इत्यादि[1] क्लेश अथवा उपजतांना[2] ( व ) मरतांना[2] होणारे[2] कष्ट, ( अशी ) ही ( दुःखकारक ) वाट कोणी अखंड वाहती[3] ठेवावी[3]?

जरी विषयीं विषयो सांडिजेल । तरी महादोषीं कें वसिजेल ।
आणि संसारु हा शब्दु नव्हेल । लटिका जगीं ॥ १२५ ॥

**अन्वय**—जरी विषयीं[1] विषयो सांडिजेल तरी महादोषीं[2] कें वसिजेल आणि जगीं संसारु हा शब्द लटिका नव्हेल[3] ?

**अर्थ**—जर विषयासक्त[1] लोक[1] विषय टाकतील, तर घोर[2] पातकें[2] कोठें राहतील ? आणि जगामध्यें संसार हा शब्द खोटा ठरणार[3] नाहीं[3] का[3] ?

म्हणोनि अविद्या जात नाथिलें । तें तिहींचि साच दाविलें ।
जिहीं सुखबुद्धी घेतलें । विषयदुःख ॥ १२६ ॥

**अन्वय**—म्हणोनि जिहीं[1] विषयदुःख[2] सुखबुद्धी[3] घेतलें[4] तिहींचि तें नाथिलें[5] अविद्याजात साच दाविलें.

**अर्थ**—म्हणून ज्या[1] (विषयी) पुरुषांनीं[1] विषयभोगजन्य[2] दुःख[2], सुख[3] या[3] कल्पनेनें[3] सेवन[4] केलें[4], त्यांनींच त्या परमार्थतः[5] नसलेल्या[5] अविद्यादिक ( वस्तु ) सत्य ( म्हणून ) दाखविल्या.

या कारणें गा सुभटा । हा विचारितां विषय वोखटा ।
तूं झणें कहीं या वाटा । विसरोनि जाशी ॥ १२७ ॥

**अन्वय**—गा सुभटा, या[1] कारणें[1] हा विषय विचारितां[2] वोखटा (असे) तूं या वाटा कहीं विसरोनि झणें[3] जाशी[4].

**अर्थ**— अरे अर्जुना, यामुळें[1] हे विषय ( म्ह. ऐहिक भोग्य पदार्थ ) विचार[2] केला[2] असतां[2], त्याज्य ( आहेत ). तूं या वाटेनें कधीं चुकूनसुध्दां जाऊं[4] नको[3].

पैं यातें विरक्त पुरुष । त्यजिती कां जैसें विष ।
निराशां तयां दुःख । दाविलें नावडे ॥ १२८ ॥

**अन्वय**—यातें विरक्त पुरुष जैसें विष ( तैसें ) त्यजिती निराशां तयां[1] ( विषयसुख ) दाविलें ( सान्ते ) दुःख ( म्हणोनि ) नावडे.[2]

**अर्थ**— याला ( म्ह. विषयसुखाला ) विरक्त पुरुष जसें ( लोक ) विष ( टाकतात ) ( तसें ) टाकतात. विरक्त ( अशा ) या[१] पुरुषांच्या[१] ( पुढें ) ( विषयांनीं आपलें सुख ) मांडलें ( असतां ) ( तें त्यांना ) दुःख ( वाटतें म्हणून ) आवडत[२] नाहीं[२].

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥**

**अन्वय**—यः इह[१] एव[१] शरीरविमोक्षणात्[२] प्राक्[२] कामक्रोधोद्भवं[३] वेगं सोढुं[४] शक्नोति[५] सः युक्तः, सः सुखी नरः ॥

**अर्थ**--जो या[१] लोकींच[१], शरीर[२] पतन[२] पावण्यापूर्वी[२] ( म्ह. जिवंतपणींच ) कामक्रोधापासून[३] उद्भवणारा[३] वेग सहन[४] करण्यास[४] समर्थ[५] होतो[५], तोच योगी ( व ) तोच ( खरा ) सुखी पुरुष ( होय ).

ज्ञानियांच्या हन ठायीं । यांची मातुही कीर नाहीं ।
देहीं देहभावो जिहीं । स्ववश केले ॥ १२९ ॥

**अन्वय**—जिहीं देहीं देहभावो[१] स्ववश[२] केले ( तयां ) ज्ञानियांच्या[३] ठायीं यांची मातुही कीर नाहीं.

**अर्थ**—जे, शरिरांत विद्यमान[१] असलेले[१] कामादि[१] विकार[१] आपल्या[२] ताब्यांत[२] ठेवतात ( त्या ) ज्ञानी[३] पुरुषांच्या[३] ठिकाणीं यांची (म्ह.विषयांची) वार्तासुद्धां खरोखर नसते.

जयांतें बाह्याची भाष । नेणिजे चि निःशेष ।
अंतरीं सुख । एक आथि ॥ १३० ॥

**अन्वय**--जयांतें एक अंतरीं सुख आथि ( तिहीं ) बाह्याची[१] भाष निःशेष नेणिजे.

**अर्थ**—ज्यांना एक अंतःकरणांतील सुख ( म्हणजे आत्मसुख ) ( प्राप्त झालेलें ) असतें ( त्यांना ) बाह्य[१] विषयाची[१] वार्ता मुळींच नसते.

परी तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे ।
तैसें नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥ १३१ ॥

**अन्वय**—परी जैसें पक्षियें फळ चुंबिजे तैसें वेगळेपणें तें भोगिजे[१] ( असें ) नव्हे तेथ भोगितेपणही विसरिजे[२].

**अर्थ**—परंतु ज्याप्रमाणें पक्षी फळ चोखतो, त्याप्रमाणें वेगळेपणानें ( म्ह. मी भोक्ता व हें सुख भोग्य अशा भेदभावनेनें ) तें ( सुख ) भोगलें[१] जातें[१] ( असा प्रकार ) नाहीं. त्या ठिकाणीं ( म्ह. त्या सुखसेवनांत ) भोक्तेपणाचाही विसर[२] पडतो[२].

भोगीं अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अंचळु लोटी ।
मग सुखेंसि घे आंठी । गाढेपणें ॥ १३२ ॥

**अन्वय**—भोगीं एकी अवस्था उठी[१] ते अहंकाराचा अंचळु लोटी[२] मग सुखेंसि गाढेपणें आंठी घे.

**अर्थ**—( त्या आत्मसुखाच्या ) सेवनामध्यें ( अशी ) एक स्थिति उत्पन्न[१] होते[१] ( कीं ) ती अहंभावाचा पडदा बाजूला[२] सारते[२], नंतर ( तो ज्ञानी ) आत्मसुखाला घट्ट मिठी मारतो ( म्ह. तद्रूप होतो ).

तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप कवळी ।
तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥ १३३ ॥

**अन्वय** — तेथ तिये आलिंगनमेळीं[१] आपेंआप कवळी होय जैसें जळीं जळ वेगळें न[३] दिसे.[२]

**अर्थ**--त्या ठिकाणीं त्या दृढ[१] आलिंगनांत[१] (म्ह. त्या आत्मसुखसेवनांत) आपसूक ( आपली आपल्याशीं ) मिठी पडते ( म्ह. एकरूपता होते ). ज्याप्रमाणें पाण्यांत ( पडलेलें ) पाणी वेगळें दिसत[२] नाहीं.[३]

कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे ।
तैसें सुखचि उरे स्वरूपें । सुरतीं तिये ॥ १३४ ॥

**अन्वय**—कां आकाशीं वायु हारपे[१] तेथ ( जैसी ) हे दोन्ही भाष लोपे[२] तैसें तिये सुरतीं सुखचि स्वरूपें उरे.

**अर्थ**—अथवा आकाशांत वायु विरून[१] जातो[१] ( तेव्हां ) त्या ठिकाणीं ( ज्याप्रमाणें ) हे दोन ( म्ह. आकाश व वायु अशी ) भाषा नाहींशी[२] होते[२] ( व एकच आकाश उरतें ), त्याप्रमाणें त्या ( दोघांच्या ) मीलनांत सुखच ( केवळ आपल्या ) स्वरूपानें उरतें.

ऐशी द्वैताची भाष जाय । मग म्हणों जरी एकचि होय ।
तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणतें जें ॥ १३५ ॥

**अन्वय**—ऐशी द्वैताची भाष जाय मग जरी एकचि होय ( असें ) म्हणों[१] तरी तेथ जाणतें जें साक्षी कवणु आहे ?

**अर्थ**—अशी भेदभावाची भाषा संपते; मग जर ( दोन्ही ) एकच होतात ( असें ) म्हणूं[१] जावें[१], तर त्या ठिकाणीं ( हें ऐक्य ) जाणणारें असें साक्षी ( म्हणून ) कोण असणार ?

**योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः ।**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥**

**अन्वय**—यः अन्तःसुखः अन्तरारामः[१] तथा यः अन्तर्ज्योतिः[२] एव सः योगी ब्रह्मभूतः ( सन् ) ब्रह्मनिर्वाणं अधिगच्छति ॥

**अर्थ**—जो अंतःसुखी ( म्ह. अंतरात्म्यांतच सुखी ) आत्म्यांतच[१] आराम[१] घणारा[१], तसेंच ज्याला आत्म्यांतच[२] प्रकाश[२] ( म्ह. आत्म्याचा ज्ञानप्रकाश ) मिळाला[२], असा जो योगी ( तो ) ब्रह्मरूप ( होऊन ) ब्रह्मनिर्वाणाप्रत ( म्ह. ब्रह्मांत मिळून जाणें या मोक्षास ) प्राप्त[३] होतो.[३]

**लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥**

**अन्वय**—क्षीणकल्मषाः, छिन्नद्वैधाः, यतात्मानः, सर्वभूतहिते[१] रताः[२] ऋषयः ब्रह्मनिर्वाणं[३] लभन्ते[४] ॥

**अर्थ**—ज्यांचें पाप नष्ट झालें आहे, ज्यांचे संशय तुटले आहेत, ज्यांचें मन स्वाधीन झालें आहे, ( व ) सर्व[१] प्राण्यांच्या[१] हितामध्यें[१] जे[२] रत[२] आहेत,[२] ( असे ) ज्ञानी ब्रह्मनिर्वाणरूप[३] मोक्षास[३] प्राप्त[४] होतात.[४]

म्हणोनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें ।
ते खुण चि पावेल स्वभावें । आत्माराम ॥ १३६ ॥

**अन्वय**—म्हणोनि हें आघवें असो[१] एथ न[२] बोलणें[२] काय बोलावें[३] आत्माराम[४] चि[४] ते खुण स्वभावें पावेल.

अर्थ— म्हणून हें सर्व ( बोलणें ) राहूं[1] दे.[1] या ठिकाणीं ( जें ) अनिर्वाच्य[2] ( आहे, त्याचें ) कसें वर्णन[3] करावें? [3] ब्रह्मनिष्ठालाच[4] तें मर्म सहज: कळेल.

जे ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण गुंतले ।
ते मी जाणें निखळ वोतले । सामरस्याचे ॥ १३७ ॥

अन्वय—जे ऐसेनि सुखें मातले[1] आपण आपणपांचि[2] गुंतले[3] ते निखळ सामरस्याचे[4] वोतले[5] ( असें ) मी जाणें.

अर्थ—जे अशा सुखांत गुंग[1] होतात[1] (व) स्वतः स्वतःचेच[2] ठिकाणीं[2] रममाण[3] होतात,[3] ते संपूर्ण ब्रह्मानंदरूपी[4] रसाचे[4] ओतीव[5] पुतळे[5] ( आहेत, असें ) मी समजतों.

ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर ।
कीं महाबोधें विहार । केले जैसे ॥ १३८ ॥

अन्वय—ते आनंदाचे अनुकार, सुखाचे अंकुर कीं[2] जैसे[1] महाबोधें विहार[3] केले[4].

अर्थ--ते आनंदाच्या प्रतिमा, सुखाचे कोंब, किंवा जसें[1] कांहीं[2] ब्रह्मज्ञानानें ( आपणास राहण्याकरतां ) रम्य[3] आश्रमच[3] बनविलेले[4] आहेत.[4]

ते विवेकाचे गांव । परब्रह्मींचे स्वभाव ।
नातरी अळंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ १३९ ॥

अन्वय --ते विवेकाचे गांव कीं परब्रह्मींचे स्वभाव[1] नातरी ब्रह्मविद्येचे अळंकारले अवयव ( होत ).

अर्थ —ते विवेकाचीं वसतिस्थानें, किंवा परब्रह्माची स्वाभाविक[1] अवस्था[1] अथवा ब्रह्मविद्येचे सजविलेले अवयवच ( होत ).

ते सत्त्वाचे सात्त्विक । कीं चैतन्याचे आंगिक ।
हें बहु असो एकैक । वानिसी काई ॥ १४० ॥

अन्वय—ते सत्त्वाचे सात्त्विक कीं चैतन्याचे आंगिक हें बहु असो[2] एकैक[3] काई वानिसी[4]?

**अर्थ**—ते ( शुद्ध ) सत्त्वाचे सात्त्विक अथवा चैतन्याचे अवयव ( होत ). ( यावर श्रोते म्हणतात, ) हा ( बोलण्याचा ) विस्तार राहूं[२] दे[२], ( तूं ) एक[३] एक[३] किती वर्णन[४] करणार[४] ?

तूं संतस्तवनीं रतसी । तरी कथेची से न करिसी ।
कीं निराळीं बोल देखसी । सनागर ॥ १४१ ॥

**अन्वय**—तूं संतस्तवनीं[१] रतसी[२] तरी कथेची से न[३] करिसी[३] कीं निराळीं सनागर बोल देखसी[४].

**अर्थ**—तूं संतांच्या[१] स्तुतीमध्यें[१] रममाण[२] होतोस[२], त्यामुळें ( तुझें ) कथासूत्राचें अवधान सुटतें[३], आणि ( गीतेंतील पदांच्या ) आधारावांचून ( म्हणजे विषयाला सोडून ) अलंकारिक व्याख्यान प्रगट[४] करतोस[४].

परि तो रसातिशयो मुकुळीं । मग ग्रंथार्थदीपु उजळीं ।
करीं साधुहृदयराउळीं । मंगळ उखा ॥ १४२ ॥

**अन्वय**—परि तो रसातिशयो[१] मुकुळीं[२] मग ग्रंथार्थदीपु[३] उजळीं साधुहृदयराउळीं[४] मंगळ उखा करीं.[५]

**अर्थ**—परंतु हा रसाळ[१] वर्णनाचा[१] भर[१] आवरून[२] घे;[२] ( आणि ) आतां गीतार्थरूपी[३] दिवा[३] लाव ( व ) संतांच्या[४] अंतःकरणरूपी[४] राजवाड्यांमध्यें[४] कल्याणकारक ( असा ) ( ज्ञानाचा ) अरुणोदय उत्पन्न[५] कर.[५]

ऐसा श्रीगुरूचा उवायिला । निवृत्तिदासासि पातला ॥
मग तो म्हणे श्रीकृष्ण बोलिला तेंचि आइकां ॥ १४३ ॥

**अन्वय**—ऐसा श्रीगुरूचा उवायिला निवृत्तिदासासि पातला[१] मग तो म्हणे श्रीकृष्ण ( जें ) बोलिला तेंचि आइकां.

**अर्थः**—असा श्रीगुरूचा ( निवृत्तिनाथांचा ) आदेश निवृत्तिदासाला ( म्हणजे ज्ञानेश्वरांना ) कळून[१] आला;[१] मग ते म्हणाले, "श्रीकृष्ण ( काय ) बोलले, तेंच ( मी सागतों ) ऐका."

अर्जुना अनंत सुखाच्या डोहीं । एकसरा तळुचि घेतला जिहीं ।
मग स्थिराऊनि तेही । तेंचि जाहले ॥ १४४ ॥

**अन्वय**—अर्जुना जिहीं अनंत सुखाच्या डोहीं एकसरा तळुचि घेतला मग ते ( तेथें ) स्थिराऊनि[१] तोंचि जाहले.

**अर्थ**—अर्जुना, ज्यांनीं अमर्याद सुखाच्या (म्ह. आत्मसुखाच्या) डोहाचा एकदम तळ गांठला, ( व ) मग ते ( तेथें ) स्थिर[१] होऊन[१] तेंच ( म्हणजे सुखरूपच ) बनले.

अथवा आत्मप्रकाशें चोखें । जो आपणपेंचि विश्व देखे ।
तो देहेंचि परब्रह्म सुखें । मानूं येईल ॥ १४५ ॥

**अन्वय**—अथवा चोखें आत्मप्रकाशें जो आपणपेंचि विश्व देखे तो देहेंचि परब्रह्म सुखें मानूं येईल.

**अर्थ**—अथवा शुद्ध आत्मप्रकाशानें ( म्ह. आत्मज्ञानानें ) जो स्वतःलाच विश्व समजतो, तो ( या ) देहांत ( असतांनाच ) परब्रह्म (झाला आहे, असें) खुशाल मानतां येईल.

जें साचोकारें परम । ना तें अक्षर निःसीम ।
जिये गांवींचे निष्काम । अधिकारिये ॥ १४६ ॥

**अन्वय**—जें साचोकारें परम, ना तें अक्षर निःसीम जिये गांवींचे निष्काम अधिकारिये ( आथि ).

**अर्थ**—जें (ब्रह्म) खरोखर सर्वोत्तम (आहे) अथवा जें अविनाशी, अमर्याद ( आहे ) ( व ) ज्या ( ब्रह्मरूपी ) गांवाचे विरक्तपुरुष ( हे ) अधिकारी ( म्ह. मिरासदार ) ( आहेत. )

जें महर्षीं वाटलें । विरक्तां भागा फिटलें ।
जें निःसंशयां पिकलें । निरंतर ॥ १४७ ॥

**अन्वय**—जें महर्षीं वाटलें[१] विरक्तां भागा फिटलें ( आणि ) जें निःसंशयां[२] निरंतर पिकलें.[३]

**अर्थ**—जें महर्षींमध्यें वांटलें[१] गेलें[१]; विरक्तांच्या वांट्याला आलें ( व ) जें विकल्परहित[२] पुरुषांच्यासाठीं[२] नेहमीं फलद्रूप[३] होतें[३].

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥**

**अन्वय**—कामक्रोधवियुक्तानां, यतचेतसां, विदितात्मनां ( तेषां ), यतीनां[1] अभितः[2] ब्रह्मनिर्वाणं[3] वर्तते ॥

**अर्थ**—जे कामक्रोधविरहित झाले आहेत, ज्यांनीं आपल्या चित्ताचें संयमन केलें आहे, ज्यांना आत्मज्ञान झालें आहे ( त्या ) ज्ञानी[1] पुरुषांच्या[1] सर्व[2] बाजूंनीं[2] ( म्ह. सबाह्य अंतरीं ) ब्रह्मनिर्वाणरूप[3] मोक्ष[3] असतो ( म्ह. या देहांतच ते ब्रह्म बनतात ).

जिहीं विषयापासोनि हिरतलें । चित्त आपुलें आपण जिंतिलें ।
ते निश्चित जेथ सुतले । चेतीचिना ॥ १४८ ॥

**अन्वय**—जिहीं आपण आपुलें चित्त विषयापासोनि हिरतलें,[1] जिंतिलें ते जेथ[2] सुतले ( स्तान्ते ) निश्चित चेतीचिना.[3]

**अर्थ**—ज्यांनीं स्वतः आपुलें चित्त विषयांतून काढून[1] घेतलें[1] ( व ) जिंकिलें ( म्ह० स्वाधीन करून ठेवलें ); ते ज्या[2] ( ब्रह्माचे ) ठिकाणीं[2] निजले ( असतां ) मुळींच जागे[3] होत[3] नाहींत[3]. (म्ह० पुन्हा वृत्तीवर येत नाहींत).

तें परब्रह्मनिर्वाण । जें आत्मविदांचें कारण ।
तेंचि ते पुरुष जाण । पांडुकुमरा ॥ १४९ ॥

**अन्वय** — पांडुकुमरा, तें आत्मविदांचें[1] कारण जें परब्रह्मनिर्वाण[2], तेंचि ते पुरुष जाण.

**अर्थ** — अर्जुना, ते ( ब्रह्म ) आत्मज्ञानी[1] पुरुषांचें[1] साध्य, जें परब्रह्मरूपी[2] निर्वाण[2] ( म्ह. मोक्ष ) तेंच ते पुरुष ( होत ) ( असें, तूं ) समज.

ते ऐसे कैसेंनि जहाले । जे देहींचि ब्रह्मत्वा आले ।
हेंही पुससी तरी भलें । संक्षेपें सांगों ॥ १५० ॥

**अन्वय**—जे देहींचि ब्रह्मत्वा आले ते ऐसे कैसेंनि जहाले हेंही ( जरी ) पुससी तरी संक्षेपें भलें सांगों.

**अर्थ**—जे ( या ) देहांतच ब्रह्मभावाला आले, ते असे कशानें झाले, हेंही ( जर ) विचारशील, तर थोडक्यांत नीट सांगतों.

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥**
**यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥**

**अन्वय**——यः मुनिः बाह्यान् स्पर्शान् बहिः कृत्वा च चक्षुः भ्रुवोः अंतरे[१] एव[१] कृत्वा, नासाभ्यन्तरचारिणौ[२] प्राणापानौ[३] समौ कृत्वा, यतेंद्रियमनोबुद्धिः[४], मोक्षपरायणः, विगतेच्छाभयक्रोधः[५] सः सदा मुक्तः[६] एव[६] ॥

**अर्थ**——जो मुनि बाह्य ( शब्दस्पर्शादि ) विषयांस बाहेर करून आणि दृष्टि भुवयांच्या मध्येंच[१] ( स्थिर ) करून, नासिकेच्या[२] आंत[२] संचार[२] करणारे[२] प्राण[३] ( व ) अपान[३] ( हे वायु ) सम करून, – इंद्रियें, मन, ( व ) बुद्धि[४] यांचें संयमन केलेला – मोक्षपरायण, – इच्छा, भय[५], ( व ) क्रोध यांविरहित झालेला – ( असा ) तो सर्वदा मुक्तच[६] ( आहे ).

तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय दवडूनि बाहिरें ।
शरीरीं एकंदरें । केलें मन ॥ १५१ ॥

**अन्वय**— तरी जिहीं वैराग्याचेनि आधारें विषय, बाहिरें दवडूनि शरीरीं मन एकंदरें केलें.

**अर्थ**— तर ज्यांनीं वैराग्याच्या आधारानें विषयवासना बाहेर घालवून शरिरामध्यें मन एकवट ( म्ह. एकाग्र ) केलें.

सहजें तिहीं संधी भेटी । जेथ भ्रूपल्लवां पडे गांठी ।
तेथ पाठिमोरी दिठी । पारुखोनियां ॥ १५२ ॥

**अन्वय**—जेथ भ्रूपल्लवां[१] सहजें गांठी पडे तेथ तिहीं संधी भेटी[२] दिठी पाठिमोरी[३] पारुखोनियां[४]

**अर्थ**—जेथें दोन[१] भुवया[१] सहजच एकत्र मिळतात तेथें ( म्हणजे इडा, पिंगला व सुषुम्ना या ) तीन घटकांच्या ( म्ह. नाड्यांच्या ) संयोगाच्या[२] ठिकाणीं[२], दृष्टि माघारी[३] वळवून[३] ( व ) स्थिर[४] करून[४]——

सांडूनि दक्षिण वाम । प्राणापानसम ।
चित्तेंसी व्योम — । गामिये करिती ॥ १५३ ॥

**अन्वय** — दक्षिण वाम सांडूनि[१] प्राणापानसम[२] (करूनि[२]) चित्तेंसी व्योमगामिये[३] करिती.

**अर्थ** —उजवी (व) डावी (नाकपुडीचे मार्ग) बंद करून[१] (म्ह. पिंगला व इडा या नाड्यांतून वाहणाऱ्या वायूंचें निरोधन करून), प्राण[२] (व) अपान[२] (यांचें) ऐक्य[२] करून[२] (त्यांना) चित्तासह मूर्ध्न्याकाशाकडे[३] जाणारे[३] करतात (म्ह. मूर्ध्न्याकाशाकडे नेतात).

तेथ जैसीं रथ्योदकें सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे ।
मग एकेक वेगळें । निवडूं न ये ॥ १५४ ॥

**अन्वय** —तेथ जैसीं सकळें रथ्योदकें[१] घेऊनि गंगा समुद्रीं मिळे, मग एकेक (रथ्योदक) वेगळें निवडूं न[२] ये.[२]

**अर्थ** —त्या ठिकाणीं (म्ह. मूर्धाकाशांत), ज्याप्रमाणें सगळीं रस्त्यांतील[१] उदकें,[१] घेऊन गंगा समुद्रास मिळते (आणि) मग एकेक (उदक) वेगळें काढतां येत[२] नाहीं[२] —

तैसीं वासनांतराची विवंचना । मग आपैसी पारुखे अर्जुना ।
जे वेळीं गगनीं लयो मना । पवनें कीजे ॥ १५५ ॥

**अन्वय** —अर्जुना, तैसी मग जे वेळीं गगनीं पवनें मना लयो कीजे[१] (ते वेळीं) वासनांतराची[२] विवंचना आपैसी पारुखे.

**अर्थ** —अर्जुना, त्याप्रमाणें नंतर ज्या वेळीं मूर्ध्न्याकाशांत वायूनें मनाचा लय केला[१] जातो[१], (त्या वेळीं) भिन्न[२] भिन्न[२] वासनांचा[२] भेद आपोआप थांबतो.

जेथ हें संसाराचित्र उमटे । तो मनोरूपु पटु फाटे ।
जैसें सरोवर आटे । मग प्रतिभा नाहीं ॥ १५६ ॥

**अन्वय** — जेथ हें संसारचित्र[१] उमटे तो मनोरूपु पटु फाटे (मग) जैसें सरोवर आटे मग प्रतिभा नाहीं.[२]

**अर्थ**—ज्या ठिकाणीं हें संसाररूपी[१] चित्र[१] उमटतें तो मनरूपी पडदा फाटतो, (नंतर) ज्याप्रमाणें सरोवर आटलें म्हणजे (त्यांत) प्रतिबिंब उमटत[२] नाहीं[२]—

तैसें मनपण मुदल जाय । मग अहंभावादिक कें आहे ।
म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥ १५७ ॥

**अन्वय**—तैसें मुदल मनपण जाय[१] मग अहंभावादिक कें आहे म्हणोनि तो अनुभवी[२] शरीरेंचि[३] ब्रह्म होये.

**अर्थ**—त्याप्रमाणें मुळांतच (मनाचें) मनपण नाहींसें[१] होतें[१], मग अहंकारादिक (विकार) कोठें राहणार? म्हणून तो ब्रह्मानुभवी[२] पुरुष[२] याच[३] देहांत[३] ब्रह्म होतो.

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥**

**अन्वय**—यज्ञतपसां[१] भोक्तारं, सर्वलोकमहेश्वरं[२], सर्वभूतानां[३] सुहृदं मां ज्ञात्वा शांतिं ऋच्छति ॥

**अर्थ**—यज्ञ[१] (व) तप[१] (यांचा[१]) भोक्ता, सर्व[२] लोकांचा[२] परमेश्वर[२], सर्व[३] प्राण्यांचा[३] सखा, (असा जो मी त्या) मला जाणून (मुनि) शांतिप्रत पावतो.

**इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे संन्यासयोगो नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥**

आम्हीं मागां हन सांगितलें । जे देहींचि ब्रह्मत्व पावले ।
ते येणें मार्गें आले । म्हणऊनियां ॥ १५८ ॥

**अन्वय**—आम्हीं मागां सांगितलें जे देहींचि[१] ब्रह्मत्व पावले[२] ते येणें मार्गें आले म्हणऊनियां.

**अर्थ**—आम्हीं पूर्वीं सांगितलें (कीं,) "जे याच[१] देहांत[१] ब्रह्मैक्याला प्राप्त[२] झाले[२], ते याच वाटेनें आले म्हणून"—

आणि यमनियमांचे डोंगर । अभ्यासाचे सागर ।
क्रमोनि हें पार । पातले ते ॥ १५९ ॥

**अन्वय**—आणि यमनियमांचे डोंगर, अभ्यासाचे सागर क्रमोनि ते हें पार[१] पातले.

**अर्थ**—आणि यमनियमांचे पर्वत (व) अभ्यासाचे समुद्र ओलांडून ते (ज्ञानी पुरुष) ह्या पलीकडल्या[१] तीराला[१] येतात.

तिहीं आपणपें करूनि निर्लेप । प्रपंचाचें घेतलें माप ।
मग साचाचेंचि रूप । होऊनि ठेले ॥ १६० ॥

**अन्वय**—तिहीं आपणपें निर्लेप करूनि प्रपंचाचें माप घेतलें मग साचाचेंचि[१] रूप होऊनि ठेले.

**अर्थ**—ते (आपण) स्वतः उपाधिरहित होतात (आणि) प्रपंचाची मोजणी करून (म्ह. त्यास तत्त्वतः मिथ्या असें जाणून) मग (याच देहांत) सत्य[१] जें[१] ब्रह्म[१], तद्रूप होऊन राहतात.

ऐसा योगयुक्तीचा उद्देशु । जेथ बोलिला हृषीकेशु ।
तेथ अर्जुनु सुदंशु । म्हणोनि चमत्कारला ॥ १६१ ॥

**अन्वय**— ऐसा योगयुक्तीचा उद्देशु जेथ हृषीकेशु बोलिला तेथ अर्जुनु सुदंशु म्हणोनि चमत्कारला[१].

**अर्थ**— असें योगमार्गाचें स्वरूप जेव्हा श्रीकृष्णांनीं वर्णिलें, तेव्हां अर्जुन मर्मज्ञ असल्यामुळें (तो) आश्चर्य[१] पावला[१] (म्ह. त्याला मोठें कौतुक वाटलें).

तें देखिलिया कृष्णें जाणितलें । मग हांसोनि पार्थातें म्हणितलें ।
काई पां चित्त उवाइलें । इये बोलीं तुझें ॥ १६२ ॥

**अन्वय**—तें देखिलिया[१] कृष्णें जाणितलें मग हांसोनि पार्थातें म्हणितलें इये बोलीं तुझें चित्त उवाइलें[१] काई ?

**अर्थ**—तें देखिलें[१] असतां[१] (म्ह. तें पाहून) कृष्णांनीं जाणलें (व) मग हंसून अर्जुनाला म्हटलें, "ह्या बोलण्यानें तुझें चित्त संतुष्ट[१] झालें[१] ना ?"

तंव अर्जुन म्हणे देवो । परचित्तलक्षणांचा रावो ।
भला जाणितला जी भावो । मानसु माझा ॥ १६३ ॥

**अन्वय**—तंव अर्जुन म्हणे, देवो परचित्तलक्षणांचा[१] रावो[१] ( आथि ); जी माझा मानसु भावो भला जाणितला.

**अर्थ**—तेंव्हा अर्जुन म्हणाला, देव दुसऱ्याच्या[१] ( तोंडावर उमटणारीं ) हृद्गतांचीं[१] चिन्हें[१] जाणण्यांत[१] चतुर[१] आहेत. "महाराज, माझ्या मनांतील अभिप्राय ( आपण ) उत्तम जाणला."

म्यां जें कांहीं विवरूनि पुसावें । तें आधींचि कळिलें देवें ।
तरी बोलिलें तेंचि सांगावें । विवळ करूनि ॥ १६४ ॥

**अन्वय**— म्यां विवरूनि[१] जें कांहीं पुसावें तें देवें आधींचि काळिलें[२] तरी (जें) बोलिलें तेंचि विवळ करूनि सांगावें.

**अर्थ**— मीं विचार[१] करून[१] जें कांहीं विचारावें तें महाराजांनीं अगोदरच जाणलेलें[२] असतें[२] तरी ( आपण जें ) बोललांत तेंच स्पष्ट करून सांगावें.

एऱ्हवीं तरी अवधारा । जो दाविला तुम्हीं अनुसारा ।
तो पव्हण्याहूनि पायउतारा । सोहपा जैसा ॥ १६५ ॥

**अन्वय**—एऱ्हवीं तरी अवधारा तुम्हीं जो अनुसारा दाविला तो जैसा पायउतारा[१] पव्हण्याहूनि सोहपा.—

**अर्थ**—एऱ्हवीं तर पहा ( कीं, ) तुम्हीं जो मार्ग दाखविला, तो ज्याप्रमाणें पाण्यांतून[१] पायीं[१] उतरून[१] जाणें[१] ( हें ) पोहण्यापेक्षां सोपें.—

तैसा सांख्याहूनि प्रांजळा । आम्हांसारिखियां अभोळां ।
एथ आहे परि कांहीं काळा । तो साहों ये वर ॥ १६६ ॥

**अन्वय**—तैसा ( हा अनुसारा ) सांख्याहूनि प्रांजळा ( आथि ) परि एथ आम्हांसारिखियां[१] अभोळां कांहीं काळा आहे, वर तो साहों[२] ये.

**अर्थ**—त्याप्रमाणें ( हा मार्ग ) ज्ञानमार्गाहून सोपा ( आहे ); परंतु येथें (म्ह. हा मार्ग आक्रमण्यास) आमच्या[१] सारख्या[१] दुबळयांना कांहीं (अधिक) काळ लागेल, पण तो ( विलंब खुशाल ) सहन[२] करतां[२] येईल.

म्हणोनि एक वेळ देवा । तोचि पडताळा घेयावा
विस्तरेल तरी सांगावा । साद्यंतुचि ॥ १६७ ॥

**अन्वय**—देवा म्हणोनि एक[1] वेळ[1] तोचि पडताळा घेयावा ( जरी ) विस्तरेल[2] तरी साद्यंतुचि सांगावा.

**अर्थ** —महाराज, म्हणून एकवेळ[1] तोच ( योगमार्ग ) फिरून सांगा; ( तो सांगण्यांत जरी ) विस्तार[2] झाला[2] तरी ( तो ) संपूर्ण सांगावा.

तंव श्रीकृष्ण म्हणती हो कां । तुज हा मार्गु गमला निका ।
तरी काय जाहलें ऐकीजो कां । सुखें बोलों ॥ १६८ ॥

**अन्वय**—तंव श्रीकृष्ण म्हणती हो[1] कां? तुज हा मार्गु निका गमला तरी काय जाहलें[1] ऐकीजो कां[1] सुखें बोलों.

**अर्थ**—तेव्हां श्रीकृष्ण म्हणतात, "असें[1] आहे[1] का? तुला हा मार्ग चांगला वाटला? तर ( मला, सांगण्यास ) काय ( अडचण ) आहे? ( त्वां ) ऐकावा बरें. ( मी ) आनंदानें सांगतों."

अर्जुना तूं परिससी । परिसोनि अनुष्ठिसी ।
तरी आम्हांसीचि वानी कायसी । सांगावयाची ॥ १६९ ॥

**अन्वय**—अर्जुना, तूं परिससी, परिसोनि अनुष्ठिसी तरी आम्हांसीचि सांगावयाची वानी कायसी ?

**अर्थ**—अर्जुना, तूं ( आमचें ) ऐकतोस, ऐकून ( तें ) आचरितोस तर आमची सांगण्यांत कसर कशाला ?

आधींच चित्त मायेचें । वरी मिष जाहलें पढियंतयाचें ।
आतां तें अद्भुतपण स्नेहाचें । कवण जाणे ॥ १७० ॥

**अन्वय**— आधींच ( कृष्णाचें ) चित्त मायेचें ( होय ) वरी पढियंतयाचें मिष जाहलें आतां[1] स्नेहाचें तें अद्भुतपण कवण जाणे[2] ?

**अर्थ**— अगोदरच ( कृष्णाचें ) चित्त आईच्या अंतःकरणासारखें दयाळू, तशात ( विचारणारा हा ) आवडता ( अर्जुन ) कारण झाला, अशा[1] स्थितींत[1] (कृष्णाच्या) प्रेमाची ती अपूर्वता कोण जाणेल ? ( म्ह. वर्णन करूं शकेल ! )

ते म्हणों कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवया स्नेहाची सृष्टि ।
हें असो नेणिजे दृष्टी । हरीची वानूं ॥ १७१ ॥

**अन्वय**—ते ( हरिची दृष्टी ) कारुण्यरसाची वृष्टि कीं नवया स्नेहाची सृष्टि म्हणों, हें असो,[१] हरिची दृष्टी वानूं[२] नेणिजे.[२]

**अर्थ**—त्या ( कृष्णाच्या दृष्टीला ) ( आम्हीं ) कारुण्यरसाचा वर्षाव म्हणावा ) किंवा नव्या प्रेमाची सृष्टि ( म्ह. प्रेमाचा दुसरा एक प्रकारच आहे असें ) म्हणावें; हें राहूं[१] द्या[१], ( त्या ) कृष्णाच्या दृष्टीचें ( यथार्थ ) वर्णन[२] करितां[२] येत[२] नाहीं[२].

जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिऊन मातली ।
म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणे ॥ १७२ ॥

**अन्वय**—जे अमृताची वोतली कीं प्रेमचि पिऊन मातली[१] म्हणोनि अर्जुन-मोहें[२] गुंतली निघों[३] नेणे.

**अर्थ**—जी ( दृष्टि ) अमृताची वोतीव ( होती ) किंवा प्रेमच पिऊन गुंग[१] झालेली[१] होती[१], कारण अर्जुनाच्या[२] प्रेमांत[२] गुंतल्यामुळें ( तिला त्यांतून ) बाहेर[३] कसें[३] निघावें[३] ( हें ) कळेना.

हें बहु जें जें जल्पिजेल । तेणें कथेसि फांकु होईल ।
परि तें स्नेह रूपा नयेल । बोलवरी ॥ १७३ ॥

**अन्वय**—हें जें जें बहु जल्पिजेल[१] तेणें ( तेणं ) कथेसि फाकु होईल परि तें स्नेह बोलवरी रूपा[२] नयेल.[२]

**अर्थ**—हें जें जें अधिक बोललें[१] जाईल[१] त्यानें ( त्यानें ) कथा अधिक लांबेल परंतु तें प्रेम ( म्ह. त्या कृष्णाच्या प्रेमाचें स्वरूप ) बोलण्यानें स्पष्ट[२] होणार[२] नाहीं.[२]

म्हणोनि विसुरा काय येणें । तो ईश्वरु आकळावा कवणें ।
जो आपुलें मान नेणे । आपणचि ॥ १७४ ॥

**अन्वय**—म्हणोनि येणें[१] विसुरा काय ? जो ईश्वरु आपुलें मान आपणचि नेणे[१] तो कवणें आकळावा.

**अर्थ**—म्हणून यात आश्चर्य ( तें ) कसलें ? जो ईश्वर स्वतःचें मान ( म्ह. मोजमाप ) स्वतःच जाणत[1] नाहीं[1] त्याला कोण जाणणार ?

तरी मागीला ध्वनीआंतु । मज गमला सावियाची मोहितु ।
जे बलात्कारें असे म्हणतु । परिस बापा ॥ १७५ ॥

**अन्वय**—तरी सावियाची मागीला ध्वनीआंतु मज ( तो ) मोहितु[1] गमला जे बलात्कारें[2] म्हणतु असे " बापा परिस ".

**अर्थ**—तर सहजच ( कृष्णाच्या ) मागील ( बोलण्यांत व्यक्त झालेल्या ) अभिप्रायावरून मला ( तो ) ( अर्जुनाच्या प्रेमानें ) वेडा[1] झालेला[1] दिसला, कारण ( तो अर्जुनाला ) आग्रहानें[2] बजावून[2] सांगत होता ( कीं, ) " बापा ( म्ह. सख्या अर्जुना ) ऐक. "

अर्जुना जेणें जेणें भेदें । तुझें कां चित्त बोधे ।
तैसें तैसें विनोदें । निरूपिजेल ॥ १७६ ॥

**अन्वय** — अर्जुना जेणें जेणें भेदें तुझें चित्त बोधे[1] तैसें तैसें (भेदें) विनोदें निरूपिजेल.[2]

**अर्थ**— अर्जुना, ज्या ज्या प्रकारानें तुझ्या मनाला उमज[1] पडेल,[1] त्या त्या (प्रकारें) (मजकडून) आनंदानें निरूपण[2] केलें[2] जाईल.[2]

तो काइसया नाम योगु । तयाचा कवण उपेगु ।
अथवा अधिकारप्रसंगु । कवणा येथ ॥ १७७ ॥

**अन्वय**—तो योगु काइसया नाम, तयाचा उपेगु कवण अथवा येथ कवणा अधिकारप्रसंगु ( आथि ).

**अर्थ**—तो योग कशाची संज्ञा ( आहे ) ( म्ह. योग कशाला म्हणतात )? त्याचा उपयोग काय? किंवा यांत ( म्ह. या योगांत ) कोणास अधिकारप्राप्ति ( होते )? ( म्हणजे येथील अधिकारी कोण? )

ऐसें जें जें कांहीं । उक्त असे इये ठाईं ।
तें आघवेंचि पाहीं । सांगेन आतां ॥ १७८ ॥

**अन्वय**—ऐसें जें जें कांहीं इये ठाईं उक्त असे तें आघवेंचि आतां सांगेन, पाहीं.

**अर्थ**—अशा प्रकारें जें जें कांहीं ह्या ठिकाणीं ( म्ह. ह्यासंबंधीं ) सांगितलेलें असेल तें सर्वच आतां ( मी तुला ) सांगेन, ऐक.

तूं चित्त देऊनि अवधारीं । ऐसें म्हणोनि श्रीहरी ।
बोलिजेल ते पुढारीं । कथा आहे ॥ १७९ ॥

**अन्वय**-- तूं चित्त देऊनि अवधारीं, ऐसें म्हणोनि श्रीहरी ( जे कथा ) बोलिजेल ते कथा पुढारीं आहे.

**अर्थ**— "तूं चित्त देऊन ऐक," असें म्हणून ( यापुढें ) श्रीकृष्ण ( जी कथा ) सांगतील ती कथा पुढें आहे.

श्रीकृष्ण अर्जुनासी संगु । न सांडोनि सांगेल योगु ।
तो व्यक्त करूं प्रसंगु । म्हणे निवृत्तिदासु ॥ १८० ॥

**अन्वय**—श्रीकृष्ण अर्जुनासी संगु न सांडोनि योगु सांगेल तो प्रसंगु व्यक्त करूं ( असें ) निवृत्तिदासु म्हणे.

**अर्थ**—श्रीकृष्ण, अर्जुनाचें सख्य न सोडितां ( त्यास ) हठयोग सांगतील तो प्रसंग ( मी ) स्पष्ट करीन ( म्ह. सांगेन असें ) निवृत्तिदास ( म्ह. ज्ञानेश्वर-महाराज ) म्हणाले.

**॥ इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥**

**॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥**

---

# प्रस्तुत पुस्तक लिहितांना उपयोगांत आणलेल्या पुस्तकांची यादी

(१) सार्थ ज्ञानेश्वरी—संपादक–ह. भ. प. वंकटस्वामी
(२) श्रीज्ञानेश्वरी टीका—लेखक–गणेश कृष्ण आगाशे, बी. ए., एल्‌एल्. बी.
(३) ज्ञानेश्वरी–सर्वस्व—लेखक-साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर
(४) ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी—लेखक–प्रा. न. र. फाटक, बी. ए.
(५) विचारसागररहस्य–संपादक-ह. भ. प. विनायक नारायण जोशी, साखरे
(६) श्रीज्ञानदेव (चरित्र, ग्रंथ व तत्त्वज्ञान)—संपादक —प्रि. शं. वा. दांडेकर, एम्. ए.
(७) तत्त्वानुसंधानसार—सारलेखक–वे. शा. सं. विष्णु वामन बापटशास्त्री
(८) जीवनमुक्तिविवेकसार—सारलेखक–वे. शा. सं. विष्णु वामन बापटशास्त्री
(९) साहित्यकौमुदी—संपादक–रा. विद्याधर वामन भिडे.
(१०) महाराष्ट्र शब्दकोश—प्रकाशक–रा. यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए., एल्‌एल्. बी.

॥ ॐ ॥

# ॥ ज्ञानेश्वरी अध्याय पांचवा ॥

## प्रकरण पहिलें

### टीपा व विस्तृत निरूपण

[ **टीप** —या प्रकरणांत प्रत्येक ओवींतील कठीण शब्दांचे अर्थ प्रथमतः देऊन त्या अर्थांपुढें रेघ देऊन विस्तृत निरूपण दिलें आहे. ]

## उपोद्घात

**नमन व अध्यायसंगति**— श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं गीतेंतील बहुतेक अध्यायांच्या आरंभीं आपले गुरु जे श्रीनिवृत्तिनाथ त्यांना नमन केलें आहे. त्या नमनांतून त्यांनीं प्रायः गुरुप्रसादाची व तद्द्वारा ग्रंथ लिंहिण्यास अवश्य असणारी जी काव्यस्फूर्ति यांची मागणी केली आहे ( ' अगा विश्वैकधामा । तुझा प्रसादचंद्रमा । करू मज पूर्णिमा । स्फुर्तीची जी ' ॥ ज्ञा.–१४–२३ ) व कांहीं ठिकाणीं अध्यायसंगतिही सांगितलेली आहे. ( नमनाविषयीं अधिक माहिती ज्ञानेश्वरी–अध्याय बारावा, प्र. १ लें, पानें १ ते २ पहा. ) प्रस्तुत अध्यायाच्या आरंभीं त्यांनीं नमन केलेलें नाहीं व अध्यायसंगतिही सांगितलेली नाहीं. या अध्यायाच्या आरंभींच अर्जुनानें भगवंतास प्रश्न केला आहे व त्याचें उत्तर म्हणून प्रस्तुत अध्यायाची निर्मिति झाली असल्यामुळें अध्यायसंगति सांगण्याचें कारण उरत नाहीं. तथापि श्रीज्ञानेश्वरांनीं श्रोत्यांची जिज्ञासा वाढविण्याकरितां ' अर्जुन हा पांचव्या अध्यायाच्या आरंभीं भगवंतास समयोचित प्रश्न करील ' असें चौथ्या अध्यायाच्या शेवटींच सूचित केलें आहे.

( ' तंव या पूर्वापर बोलाचा । विचारूनि कुमरु पंडूचा । कैसा प्रश्नु हन अवसरीचा । करिता होईल ' । ज्ञा.– ४–२११ ).

**' कर्मयोगो विशिष्यते । '** — गीतेंतील पांचव्या अध्यायास एक विशेष महत्त्व प्राप्त झालेलें आहे. असें महत्त्व प्राप्त होण्याचें कारण, भगवंतांनीं या अध्यायांत अर्जुनास ' कर्मसंन्यास ' (म्ह., कर्मत्याग किंवा ज्ञानमार्ग) व ' कर्मयोग ' (म्ह. निष्काम कर्मयोग) या दोन मार्गांपैकीं ' कर्मयोग ' हा मार्ग कर्मसंन्यासापेक्षां अधिक चांगला आहे असें स्पष्टपणानें सांगितलें आहे (' तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते । ' गीता–५–२ ). एवढ्यावरून भगवंत संन्यासमार्ग हा कर्मयोगापेक्षां कमी प्रतीचा लेखतात असें मात्र नव्हे. गीतेमध्यें असे पुष्कळ श्लोक आहेत कीं, ज्यांत भगवंतांनीं ज्ञाननिष्ठेची मुक्तकंठानें स्तुति केलेली आहे (' ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः। ' गीता–४–१९ ; ' सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते । ' गीता –४–३३ ) व गीतेंत कर्मापेक्षां ज्ञानाचेंच वर्णन अधिक आलेलें आहे (' न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।' गीता --४--३८ ). असें असतांना भगवंत या अध्यायांत कर्मसंन्यासापेक्षां ( म्ह. ज्ञानमार्गापेक्षां ) कर्मयोग हा अधिक प्रशस्त आहे असें म्हणतात, याचें कारण कर्मयोगाचे अधिकारी पुष्कळ, कर्मयोग हा जाणते व नेणते या सर्वांना आचरण्यास सुलभ, अतएव सर्वसंग्राहक व निश्चित मोक्षफलदायी असा आहे ( ' तरी जाणां नेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा । जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणीं । ' ज्ञा. –५–१६ ). याच्याउलट ज्ञानमार्गाचा अधिकारी विरळा, कारण ज्याच्या अंतःकरणांतून मल व विक्षेप हे दोन दोष गेले आहेत व जो ' साधनचतुष्टयसंपन्न ' झालेला आहे, तोच ज्ञानाचा अधिकारी होय. याशिवाय ज्ञानमार्ग हा विहंगममार्ग असल्यामुळें त्यांत आरूढपातित होण्याचें भय असतें. तात्पर्य, कर्मयोग हा सुकर व कर्मसंन्यास हा दुष्कर होण्यास्तव, भगवंत ' कर्मयोगो विशिष्यते ' असें म्हणतात ( ' तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे । येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें । ' ज्ञा. –५–१७ )

**गीतेचें ध्येय—** ' नैष्कर्म्यसिद्धि ' प्राप्त करून घेणें हें गीतेचें ध्येय आहे. ( ' नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ' । गीता–१८–४९ ) ' नैष्कर्म्य ' ह्या शब्दाचा अर्थ ' कर्मशून्यता ' असा नव्हे व ' नैष्कर्म्यस्थिति प्राप्त करून घेणें ' म्हणजे आळशी बनून सर्व कर्मांचा त्याग करणें असाही नव्हे, तर

देहादि संघाताकडून कर्में होत असतांनाही, एवढेंच नव्हे, युद्धासारखें घोर कर्मे होत असतांनाही, स्वतःच्या अकर्तेपणांत किंचितही न्यूनता न येणें अशी जी स्थिति त्या स्थितीला 'नैष्कर्म्यस्थिति' म्हणतात. ('कुर्वन्नपि न लिप्यते।' गीता–५–७; 'हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते।' गीता—१८–१७). अशी 'नैष्कर्म्यस्थिति,' कर्ता हा ज्या वेळेस ब्रह्मरूप होतो म्हणजे 'मी ब्रह्म आहें' अशा अपरोक्ष अनुभवावर येतो तेव्हांच प्राप्त होते. 'आत्म-स्वरूपस्थितीलाच 'नैष्कर्म्य' हें दुसरें नांव आहे ('तेथ स्वभावें धनंजया। नाहीं कोणीचि क्रिया। म्हणौनि प्रवादु तया। नैष्कर्म्यु ऐसा।' ज्ञा. १८–९७८). ही नैष्कर्म्यता प्राप्त करून देणाऱ्या मार्गाचा आरंभ मात्र निष्काम-कर्मयोगापासून होतो व त्या मार्गाचा शेवट 'संन्यासांत' म्हणजे 'अकर्तृत्व-बुद्धींत' होतो ('न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते। न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति॥' गीता –३–४ ; 'नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधि-गच्छति'। गीता–१८–४९). ह्याचा अर्थ गीता ही मोक्षप्राप्तीचें साधन 'ज्ञान-कर्मसमुच्चय' (म्ह. एकाच वेळीं कर्म व ज्ञान यांचा स्वीकार) सांगते असा नव्हे, तर गीतेंतील मार्ग हा 'क्रमसमुच्चयाचा' म्हणजे प्रथमतः निष्कामकर्मयोगाचें अनुष्ठान व तद्द्वारा अंतःकरणशुद्धि व ईशप्रसाद ; ईशप्रसादामुळें वैराग्यलाभ, नंतर उपासना अथवा ध्यानयोग व ध्यानयोगापासून ज्ञान (म्ह. जीव व ब्रह्म ह्यांच्या ऐक्याचें 'मी ब्रह्म आहें' असें साक्षात्काररूपज्ञान) व तद्द्वारा मोक्ष असा आहे. अतएव मोक्षाचें किंवा नैष्कर्म्यस्थिति प्राप्त करून घेण्याचें नियतपूर्व साधन ज्ञानच ठरतें ('जें ज्ञान जयाच्या हातीं। तोची समर्थु मुक्ती।' ज्ञा. १५–३० ; 'वांचूनि ज्ञानेंवीण एकें। उपाय करिसी जितुके। तिहीं गुंफासि अधिकें। रुखीं इये।' ज्ञा. –१५–२४९).

**ज्ञानी व ज्ञानोत्तर कर्में**—ज्ञानप्राप्तीनंतर लोकसंग्रहार्थ किंवा जगदुद्धारा-करितां कर्म करणाऱ्या बोधसंपन्न महात्म्याचें, गीतेनें वर्णन केलेलें आहे ('जे पुरुषार्थसिद्धि चौथी। घेऊनि आपुलिया हातीं। रिगाला भक्तिपंथीं। जगा देतु।' ज्ञा.–१२–२१९) व अशा प्रकारचा ज्ञानसंपन्न भक्त भगवंताला फार प्रिय असतो असेंही गीतेंत सांगितलें आहे. परंतु एवढ्यावरून गीता ही प्रत्येक ज्ञानसंपन्न पुरुषास 'तूं कर्में करच' असा विधि सांगते असें मात्र नव्हे, कारण प्रत्येक ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं कर्मप्रवृत्ति संभवनीय असते असें म्हणतां

येणार नाहीं. ज्ञानी पुरुषाची अशी एक अवस्था असते, जिला ‘ निर्विकल्प समाधि ’ किंवा ‘ निरुद्धावस्था ’ म्हणतात. त्या अवस्थेंत कर्ता, कार्य, कर्म; द्रष्टा, दृश्य, दर्शन; ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान व भोक्ता, भोग्य, भोग या त्रिपुटीसह जगताचें भानच त्याच्या वृत्तीवर नसतें, मग कर्म करण्यास आवश्यक जो अहंकार तो त्याच्या ठिकाणीं कोठून असणार ? व त्याच्या संघाताकडून कर्में कशीं होणार ? ( ‘ सहज मी आंधळा गा । निजनिराकार पंथें । वृत्ति हे निवृत्ति झाली जन न दिसे तेथें । मी माझें हारपलें । ठायीं जेथींच्या तेथें । अदृश्य तेंचि जालें । कांहीं दृश्य जें होतें । तुका. ३५१ ) हस्तामलकासारखे ( ‘ नाहं मनुष्यो नच देवयक्षो । न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः । न ब्रह्मचारी न गृही वनस्थो । भिक्षुर्नचाहं निजबोधरूपः । ’ हस्तामलक श्लोक २ ) केवळ ‘ निज-बोधरूप ’ होऊन सदा ‘ वृत्तिशून्य ’ अवस्थेंत जे ज्ञानी पुरुष असतात, त्यांच्याकडून कर्में होणें शक्य नाहीं. रामकृष्ण परमहंस सहा सहा महिने विदेहास्थितींत असत, असें त्यांच्या चरित्रांत वर्णन केलेलें आहे; मग अशा अवस्थेंत असणाऱ्या पुरुषांकडून लोकसंग्रहार्थ तरी कर्में कशीं होतील ? वेदांतमतें ज्ञानी पुरुषांचे व्यवहार त्यांच्या पूर्वसंस्कारानुसार किंवा प्रारब्ध-कर्मानुसार होत असतात ( ‘ मुक्ताचे देह तैसें । हालत संस्कारवशें । तें देखोनि लोक पिसे । कर्ता म्हणती । ) ज्ञा. –१८–४४७ ). ज्या ज्ञात्याचें अधिक भोगाचें प्रारब्ध असतें त्याची लोकसंग्रहाकरितां कर्माकडे आधिक प्रवृत्ति होते व त्याच्याकडून जगाच्या उद्धाराचीं कर्में होतात. या वर्गांत याज्ञवल्क्य, नारद, जनक, भीष्म, श्रीमच्छंकराचार्य, श्रीज्ञानेश्वरमहाराज व रामदासस्वामी ’ इत्यादि ज्ञात्यांची गणना होते; परंतु ज्या ज्ञात्याचें न्यून-भोगाचें प्रारब्ध असतें त्याच्याकडून लोकसंग्रहार्थ फारशीं कर्में होत नाहींत. अशा वर्गांत शुक, वामदेव, श्रीनिवृत्तिनाथ, रामकृष्ण परमहंस, इत्यादिकांची गणना होते. तात्पर्य, प्राप्त पुरुषाची व्यवहारांत न्यूनाधिकप्रवृत्ति ही प्रारब्ध-वैचित्र्यानें किंवा पूर्वसंस्कारानें होत असल्यामुळें ( पैं प्राचीनसंस्कारशेषें । पांचही कारणें सहेतुकें । कामवीजती गा अनेकें । कर्माकारें । ’ ज्ञा. –१८–४३१ ) ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तर कर्में केलींच पाहिजेत असा गीतेनें विधि सांगितला नाहीं. परंतु ज्या ज्ञानी पुरुषाकडून लोकसंग्रहार्थ निष्कामकर्में घड-तात त्याची गीता प्रशंसा करते ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे.

**अर्जुनाचा प्रश्न**— प्रस्तुत अध्यायाच्या आरंभीं अर्जुनानें भगवंतास प्रश्न विचारला आहे. भगवंतानें चवथ्या अध्यायांत 'ज्ञानमार्गाचें' म्हणजे 'कर्मसंन्यासाचें' महत्त्व सांगितलें; परंतु शेवटीं अर्जुनाला मात्र 'तूं कर्म कर' असें सांगितलें. त्यामुळें अर्जुनास साहजिकच असें वाटलें कीं, ज्ञानयोगच श्रेष्ठ असतांना व कर्मयोगाची परिसमाप्ति शेवटीं ज्ञानांतच होत असतांना भगवंत "मला मात्र कर्म करण्यास कां म्हणून सांगतात?" म्हणूनच अर्जुन या अध्यायाच्या आरंभीं भगवंतास विचारतो, "देवा, कर्मसंन्यास व कर्मयोग या दोहोंमध्यें श्रेयस्कर मार्ग कोणचा तो मला सांगा."

**ओवी १—मग**— नंतर— श्रीकृष्णांनीं ४ थ्या अध्यायांत ( कर्म ) संन्यासाची महती वर्णन करून सरतेशेवटीं अर्जुनास 'तूं मात्र कर्मयोगाचें आचरण कर व युद्धास उभा रहा.' ( 'योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत' गीता ४–४२ ) असें सांगितल्यावर. हां–आश्चर्यद्योतक केवलप्रयोगी अव्यय. **हो**–अहो. **एक**— एकच, निश्चित एकार्थाचें–सांगण्यांत एक निश्चितपणा असला, म्हणजे दुसऱ्यास त्याचा मनानें नीट विचार करितां येतो व त्याप्रमाणें वागतां येतें. [ उदाहरणार्थ, एखाद्या मुलाच्या मनांत त्याच्या मित्रांबरोबर सिंहगडास सहल करण्याकरितां जावयाचें असतें. परंतु त्याच्या वडिलांच्या मनांत त्यानें जाऊं नये असें असतें. मग तो मुलगा वडिलांकडे जाऊन त्यांना विचारतो, 'बाबा, मी सिंहगडास जाऊं का?' वडील म्हणतात, 'जातोस तर जा.' त्यावर मुलगा पुन्हा विचारतो, 'मग मी जाऊं नको का?' वडील म्हणतात, 'जात नसशील तर जाऊं नकोस.' अशा वडिलांच्या संदिग्ध सांगण्यानें ज्याप्रमाणें मुलगा बुचकळ्यांत पडतो त्याप्रमाणें भगवंताच्या बोलण्यानें अर्जुनाच्या मनाची स्थिति झाली. ] भगवंतांनीं चवथ्या अध्यायांत ज्ञानाचें वर्णन केलें व शेवटीं अर्जुनास 'तूं मात्र कर्मयोगाचें आचरण कर' असें सांगितलें. त्यामुळें अर्जुन बुचकळ्यांत पडला व त्याला कर्मसंन्यास व कर्मयोग या दोन मार्गांपैकीं कोणच्या मार्गाचें अवलंबन करावें, हें समजेना. **होय**— असतें. ( भगवंताचें बोलणें दुहेरी कसें होतें हें अर्जुन पुढच्या ओवींत सांगतो. )

**ओवी २—मागां**—मागें ( ४ थ्या अध्यायांत ). **संन्यास**—त्याग ( कर्मत्याग ). **निरोपिला**—सांगितला. **बहुवसु**—विस्तारानें, नाना प्रकारांनीं—भगवंतांनीं ४ थ्या अध्यायांत कर्मसंन्यासाची म्हणजे ज्ञानमार्गाची

प्रसंशा नुसती ओझरती केली नाहीं तर, ती त्यांनीं पुष्कळ रीतीनें केलेली आहे ( ' ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ', ' ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ', ' सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ', ' ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ', ' न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ', ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ' गीता—४–१९, २४, ३३, ३७, ३८, ३९ ). **तरी**–असें असतां. **कर्मयोगीं आतिरसु केवीं पोखीतसां**—कर्मयोगाचे ठिकाणीं भर कां वाढवितां ?—मला कर्मयोगाचें आचरण कर म्हणून कां सांगतां ? ( ' याकारणें पार्था । उठीं वेगीं वरौता । नाशु करोनि हृदयस्था । संशयासी । ' ज्ञा.–४–२०९ ).

**ओवी ३—द्व्यर्थ**—दुटप्पी, एकदां हें व एकदां तें.— वास्तविक भगवंत दुटप्पी बोलत नव्हते, पण अर्जुन ' संन्यास ' ह्याचा अर्थ ' सर्व कर्मांचा त्याग ' असें समजत होता. भगवंत ' संन्यास ' म्हणजे ' सर्व संकल्पांचा त्याग ' असें सांगत होते ( ' यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ' गीता–४–१९ ). शिवाय अर्जुन हा कर्माचा अधिकारी होता. ' कर्मण्येवाधिकारस्ते ' गीता–२–४७ ; ' नियतं कुरु कर्म त्वम ' गीता–३–८) म्हणून भगवंत त्याला ' तूं निष्काम कर्मयोगाचें आचरण कर, ' असें सांगत होते. तो मूलतः कर्मप्रवृत्त होता व तो लढण्याच्याच उद्देशानें रणांगणावर आला होता. परंतु त्या ठिकाणीं त्याला मोह उत्पन्न झाला व त्या मोहामुळें तो कर्म टाकण्यास तयार झाला होता. अतएव अर्जुनाचा कर्मत्याग हा तामस कर्मत्याग होता ( 'मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ।' गीता–१८–७ ). त्याचप्रमाणें संन्यास व कर्मयोग या दोहोंचें आचरण एकाच काळीं व एकाच व्यक्तीनें करावें असें भगवंताचें म्हणणें नव्हतें. परंतु मोहामुळें अर्जुनाची मनःस्थिति हें सर्व जाणण्याइतकी निर्विकार नव्हती व त्यामुळें तो ' संन्यास ' शब्दाचा अर्थ ' प्राप्त व विहित अशा सर्व कर्मांचा त्याग ' असें समजत होता व म्हणून भगवंताला ' दुटप्पी बोलतां ' असें दूषण लावीत होता. **नेणतेयांचिया**—अजाण लोकांच्या, अल्पज्ञांच्या—अर्जुन आपल्या ठिकाणीं कमीपणा घेऊन सौम्यतेनें व नम्रतेनें या ठिकाणीं बोलत आहे. पूर्वीच्या व आतांच्या अर्जुनांत आतां बराच फरक पडला आहे. मागें त्यानें भगवंताला ' तुला लाज कशी वाटत नाहीं ?' असें म्हटलें होतें. ( ' इये लाजसीना महाघोरीं । कर्मीं सुतां ' ।।

ज्ञा. –३–२ ) असा फरक करण्याचें कारण, तो पूर्वी श्रीकृष्णाला आपल्या-प्रमाणेंच मानव समजत होता. परंतु श्रीकृष्णांनीं ज्या वेळेस ४ थ्या अध्यायांत आपण जन्मरहित कसें आहोंत व युगायुगीं अवतार कसें घेतों ( 'अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्। प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥' गीता –४–६. 'जें धर्मजात आघवें। युगायुगीं म्यां रक्षावें। ऐसा ओघु हा स्वभावें। आद्य असे ॥' ज्ञा.–४–४९ ) हें अर्जुनास सांगितलें त्या वेळेस अर्जुनाचे डोळे उघडले व त्याला श्रीकृष्णाचें अजत्व पटलें. म्हणूनच तो आतां विनयानें बोलूं लागला आहे. **श्रीअनंता**—ज्यास अंत नाहीं अशा ( श्रीकृष्णा ) परमात्मा हा देशकालवस्तु परिच्छेदशून्य व सजातीय–विजातीय–स्वगतभेदशून्य ( अधिक माहिती १२ वा अध्याय, प्रकरण २ रें, पान १३२ पहा. ) असा असल्यामुळें अर्जुन श्रीकृष्णाला 'श्री अनंता' असें संबोधीत आहे. **आपुलिये चाडे उमजु नोहे**— आपल्या इच्छेप्रमाणें उलगडा होत नाहीं. —अर्जुन म्हणतो, 'मी अल्पज्ञ व परिच्छिन्न आहे व तुम्ही सर्वज्ञ व अनंत आहांत; तेव्हां तुम्ही असें द्व्यर्थी बोललें असतां आमच्यासारख्या अज्ञ जनांना त्याचा उलगडा हवा तसा होत नाहीं.'

**ओवी ४— एकसार**–एकच तत्त्व. **बोधिजे**–सांगितलें जावें. **एकनिष्ठ**–निश्चयात्मक, एकार्थक. **आणिकीं**–दुसऱ्यांनीं. —अर्जुन म्हणतो, 'महाराज आपणांस दुसऱ्यांनीं कां शिकवावयास पाहिजे? आपण अनंत असून सर्व जगताचे गुरु आहांत ( 'कृष्णं वंदे जगद्गुरुम्' ).

**ओवी ५—राउळ**–महाराज, श्रेष्ठ पुरुष. **विनाविलें होतें**—विनंती केली होती.—अर्जुन भगवंताला मागची आठवण करून देतो. त्यानें भगवंतास पूर्वी म्हणजे ३ ऱ्या अध्यायांत अशीच विनंती केली होती ( 'तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्' ॥ गीता–३–२ 'तरी पारत्रिकीं हित। आणि आचरितां तरी उचित। तें सांगें एक निश्चित। पार्थु म्हणे' ॥ ज्ञा.–३–३१ ). **परमार्थ**—तत्त्वज्ञान. **ध्वनितें**—गर्भितार्थानें, भावार्थानें, लाक्षणिकार्थानें.–अर्जुन म्हणतो, 'हे देवा, तुम्ही मला संदिग्ध भाषेंत सांगू नका. तर स्पष्ट व सोप्या भाषेंत सांगा. कारण मी मंदबुद्धि आहे. ( 'म्हणोनि आइकें देवा। हा भावार्थु आतां न बोलावा। मज विवेकु सांगावा। मऱ्हाटा जी ॥'; 'मी अत्यंत जड असे। परी ऐसाही निकें परियसें। श्रीकृष्णा बोलावें तुवां तैसें। एकनिष्ठ॥' ज्ञा.–३–१७,१८ ).

**ओवी ६—प्रस्तुतीं**—चालू विषयांत. **उकलु**—उलगडा. **दोहींमाजि**—दोहोंमध्यें—कर्मयोग (म्ह. निष्काम कर्मयोग) व कर्मसंन्यास (म्ह. ज्ञानयोग) या दोहोंमध्यें चांगला मार्ग कोणचा तो मला सांगा. (तो मार्ग कसा असावा याचें स्पष्टीकरण अर्जुन पुढच्या दोन ओव्यांतून सांगतो.)

**ओवी ७ — परिणामींचा निर्वाळा**— अंतीं शुद्ध असलेला, ज्याचा शेवट शुद्ध म्हणजे हितकारक आहे.—जगतांत कांहीं मार्ग असे आहेत कीं, जे आरंभीं व परिणामींही दुःखकारक अथवा अहितकर असतात. उदाहरणार्थ, तामस सुख ('यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः। निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम्॥' गीता–१८–३९; 'आणि अपेयाचेनि पानें। अखाद्याचेनि भोजनें। स्वैरस्त्रीसंनिधानें। होय जें सुख॥' ज्ञा.–१८–८०६). कांहीं मार्ग आरभीं गोड परंतु परिणामीं अहितकर असतात. उदाहरणार्थ, राजस सुख ('विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम्। परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम्॥' गीता—१८–३८ 'अधिकारिया रिगतां गांवो। होय जैसा उत्साहो। कां रिणावरी विवाहो। विस्तारिला॥' ज्ञा–१८–७९५). परंतु कांहीं मार्ग आरंभीं कष्टदायक पण परिणामीं हितकर असतात. उदाहरणार्थ, सात्त्विक सुख अथवा आत्मसुख ('यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्। तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम्॥' गीता– १८–३७ 'तेव्हां सागरीं गंगा जैसी। आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी। अद्वयानंदाची आपैसी। खाणी उघडे॥' ज्ञा. १८–७९२). तामस सुख हें अत्यंत कनिष्ठ व त्याज्य असें असल्यामुळें श्रुतीमध्यें मुख्यतः 'प्रेय' (म्हणजे 'इंद्रियास प्रिय वाटणारें ऐहिक सुख अथवा राजस सुख) व 'श्रेय' (म्हणजे अतींद्रिय असें आत्मसुख अथवा सात्त्विक सुख) या दोन मार्गांचाच विचार आलेला आहे ('अन्यच्छ्रेयोऽन्यदुतैव प्रेयस्ते उभे नानार्थे पुरुषँसिनीतः॥ तयोःश्रेय आददानस्य साधु भवति हीयतेऽर्थाद्य उ प्रेयो वृणीते॥ १॥ कठ० उप० १,१,१) व या दोन मार्गांपैकीं 'आत्मबुद्धिप्रसादज' असें जें अध्यात्मिक सुख तें प्राप्त करून देणारा जो श्रेय मार्ग त्याचेंच अवलंबन करावें असें सांगितलें आहे. ('आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः।' बृह. उप. ४, ५, ६). अर्जुनही या ठिकाणीं भगवंतास, 'मला श्रेय मार्ग कोणचा तो सांगा' असेंच विचारीत आहे. **अचुंबितु**—

बिनचूक, अचूक. **फळा ये**-सिद्धीला येतो. —अर्जुनास असा मार्ग पाहिजे होता कीं, ज्या मार्गानें गेलें असतां फल निश्चित प्राप्त होईल. कित्येक मार्ग दुस्तर असतात व अशा मार्गांनीं मनुष्य गेला असतां तो ध्येय गांठण्यापूर्वीं मध्येंच दगावण्याचा संभव असतो. अर्जुनाला अशा प्रकारचा दुस्तर मार्ग नको होता. **अनुष्ठितां प्रांजळा**- आचरण करतांना सुलभ- ज्या मार्गांत कमी कष्ट पडतील अशा प्रकारचा मार्ग अर्जुन भगवंतास विचारतो. हठयोग व ज्ञानादिक मार्ग आहेत, परंतु ते आचरण्यास फार कठीण आहेत. हठयोग हा तर कठिणांतील कठिण मार्ग आहे. ('येणें यमनियमांचेनि तळवटें। रिगे आसनाचिये पाउलवाटें। येई प्राणायामाचेनि आडकंठें। वरौता गा॥', 'मग प्रत्याहाराचा अधाडा। जो बुद्धीचियाही पाया निसरडा। जेथ हटिये सांडिती होडा। कडेलग॥' ज्ञा. ६-५५, ५६). या मार्गांतील 'तळवट', जे यम-नियम तेच साधणें फार कठिण आहे; मग कुंडलिनीरूपी प्राणशक्ति सुषुम्ना-नाडीच्या द्वारें मूर्ध्न्याकाशांत नेणें तर फारच दुरापास्त होय ('नागिणी उत्साहें नवहि द्वारें निरोधुन। नाडित्रयामाजि सुषुम्नासंचरण। न साधे हा मार्ग ऐसे बोलती मुनिजन। नरहारिचिंतनें अहर्निशीं मुक्तिस्थान॥' ज्ञा. गा० ३३७). ज्ञानमार्ग हाही सोपा नाहीं ('बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते।' गीता ७-१९; 'जे तो विषयांची मोट झाडी-। माजी काम-क्रोधांचीं सांकडीं। चुकावूनि आला पाडी। सद्वासनेचिया॥' ज्ञा.-७-१२७ ते १३१; जया ज्ञानालागीं। गगन गिळिताती योगी। स्वर्गाची आडवंगी उमरडोनि॥' ज्ञा. १३-१६२ ते १६७; 'क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति।' कठ. उप. १, ३, १४). तात्पर्य, अर्जुनाला सोप्यांतला सोपा व कमी कष्टाचा असा मार्ग पाहिजे होता. सामान्यतः मनुष्याची प्रवृत्ति सोप्या मार्गाकडे असते. कारण, लोकांना स्वभावतःच कमी कष्ट करणें आवडतें ('अवघड कोणी न करी सांगतां। सुलभ बहुतां गोड वाटे।' तुका.-२७८५). उदाहरणार्थ— एखादा वैद्य त्याच्याकडे आलेल्या रोग्यास सांगतो कीं, तुझ्या रोगावर मजजवळ उत्तम औषध आहे. परंतु तुला रोज सकाळीं रानांत जाऊन ताजी गुळवेल आणली पाहिजे; तिचे बारीक तुकडे करून ते एक शेर पाण्यांत घालून उकळले पाहिजेत व शेवटीं दोन

छटाक पाणी शिल्लक ठेवून त्यांत मी जी पुडी देईन ती घालून तुला तें पाणी औषध म्हणून दररोज घेतलें पाहिजे. परंतु रोगी त्याला म्हणतो कीं, तुम्ही वाटेल तर दोन पैसे अधिक घ्या, परंतु मला ज्या औषधाकरतां कमी कष्ट पडतील असें औषध द्या. सामान्यतः लोकांना गोड, आयतें, मोफत, सतत गोड बोलून व घरीं आणून दिलेलें असें षड्गुणसंपन्न औषध आवडतें ('देखें रोगातें जिणावें। औषध तरी देयावें। परी तें अति-रुच्य व्हावें। मधुर जैसें॥' ज्ञा. -३-१९ ). तात्पर्य, जो परिणामीं गोड, आच-रण्यास सुलभ व ज्याचें अवलंबन केलें असतां निश्चित फल प्राप्त होतें, अशा प्रकारचा मार्ग मला सांगा, असें अर्जुन भगवंतास विनवितो (किती सोपा मार्ग पाहिजे ही गोष्ट अर्जुन पुढच्या ओवींत दृष्टांतानें सांगतो ).

**ओवी ८—सोकासना सांगडें**—सुखकारक वाहनासारखें—ज्याप्रमाणें मेण्यांत किंवा पालखींत बसलें असतां चालण्याचे तर कष्ट पडत नाहींत, ('मारगाची चिंता पालखी बैसतां। नाहीं उसंतितां कोसपेणी॥' तुका-८६४ ) झोंपेंतही व्यत्यय येत नाहीं व मार्ग तर पुष्कळ कटला जातो, तशा वाहनासारखें सुलभ साधन मला सांगावें, असें अर्जुन विनवितो. ज्ञानेश्वरमहाराजांच्या कालीं आगगाडी नव्हती, नाहीं तर त्यांनीं आग-गाडीचाच दृष्टांत दिला असता. पहिल्या वर्गानें प्रवास करणारा उतारू ज्या-प्रमाणें झोंपेंत व्यत्यय न येतां व प्रवासाचे कष्ट न पडतां, शेंकडों मैलांचा प्रवास सहजगत्या करूं शकतो, तसा सुखकारक व सोपा मार्ग अर्जुनास पाहिजे होता.

**ओवी ९-रिझले**- संतुष्ट झाले.—अर्जुनाचा प्रश्न ऐकून भगवंत फारच प्रसन्न झाले. ज्या ठिकाणीं प्रेम असतें त्या ठिकाणीं थोडी जरी हुषारी दिसली तरी प्रेम करणाऱ्याला आनंद होत असतो. उदाहरणार्थ, हुषार मुलानें प्रश्न विचारण्यांत थोडी जरी उपजतबुद्धि दाखविली तरी शिक्षकास आनंद होतो. भगवंताचें तर अर्जुनावर निरुपम प्रेम होतें व त्यांत अर्जुनानेंही भगवंतास फार मार्मिक असा प्रश्न विचारला. नाहीं तर व्यवहारांत कित्येकांना आपणास काय हवें हेंच सांगतां येत नाहीं. उदाहरणार्थ, कोणी एखादा वैद्याकडे जातो व त्याला जर वैद्यानें विचारलें कीं, तुला काय होतें? तर तो 'कसेंसेंच' वाटतें म्हणून सांगतो. त्याच्या प्रकृतीचें निदान करणें हें लहान अर्भकाच्या प्रकृतीचें निदान करण्यासारखें आहे. अर्जुन असा मुखदुर्बल नव्हता. त्यानें आपलें म्हणणें

सौजन्यानें पण स्पष्टपणानें मांडलें व त्यामुळें भगवंत संतुष्ट होऊन 'तुझ्या मनाप्रमाणें आतां होईल' असें त्यास म्हणाले. ( अर्जुन जें मागेल तें त्याला मिळेल यांत काय आश्चर्य आहे ? कारण तो मोठा भाग्यवान् होता. हीच गोष्ट ज्ञानेश्वरमहाराज पुढच्या ओव्यांतून सांगतात.

**ओवी १०—कामधेनु**—इच्छिलेली वस्तु तात्काळ देणारी स्वर्गातील एक गाय—कामधेनु, कल्पतरु व चिंतामणि हे इच्छित वस्तु तात्काळ प्राप्त करून देतात. ज्याच्याजवळ कामधेनु असते त्याला कांहींही कमी पडत नाहीं. [ ह्याबद्दल एक पौराणिक गोष्ट आहे ती अशी — एकदां विश्वामित्र हे आपल्या सैन्यासह शिकारीस बाहेर पडले असतां, त्यांना वाटेंत वसिष्ठ मुनींचा आश्रम लागला. तेव्हां ते वसिष्ठांना भेटण्यास गेले. भेटीअंतीं वसिष्ठांनीं त्यांना जेवण्याचा आग्रह केला. विश्वामित्र म्हणाले, "मी एकटा नाहीं, माझ्याबरोबर पुष्कळ सैन्य आहे." वसिष्ठ म्हणाले, "कांहीं हरकत नाहीं. तुम्ही सर्व जणच जेवावयास या." विश्वामित्रांना आश्चर्य वाटलें कीं, हा दरिद्री, झोंपडींत राहणारा ब्राह्मण आपणां सर्वांस जेवण कसें काय घालणार ? परंतु त्यांनीं वसिष्ठांचें आमंत्रण स्वीकारलें व ते सैन्यासह स्नानाला गेले. वसिष्ठांच्याजवळ एक काळी कपिला नंदिनी नांवाची कामधेनु होती. तिला त्यांनीं सर्व मंडळींची जेवणाची व्यवस्था करावयास सांगितली. विश्वामित्र त्यांच्या सैन्यासह स्नान करून परत येतात तोंच त्यांना एक मोठा मांडव दिसला. त्यांत त्यांना चांदीचे पाट मांडलेले, रांगोळी घातलेली व पंचपक्वान्नें वाढलेलीं अशीं चांदीचीं ताटें दिसलीं. विश्वामित्र व त्यांचें सैन्य यांचें जेवण झाल्यानंतर विश्वामित्रांनीं वसिष्ठांस विचारलें, "महाराज आपण आज जेवणाचा थाट तर एखाद्या राजालाही लाजवील असा केला होता." वसिष्ठ म्हणाले कीं, "हें माझें सामर्थ्य नाहीं. माझ्याजवळ जी नंदिनी कामधेनु आहे तिचें हें सर्व वैभव आहे. कामधेनूला आपल्याजवळ साहित्य ठेवावें लागत नाहीं. ती एका क्षणांत, जें लागेल तें उत्पन्न करूं शकते." ( 'काय कामधेनूसवें सर्व साहान । चालत असे ॥' ज्ञा. १०–३०९-; 'कामधेनु कल्पतरु चिंतामणी । आवडीची धणी पुरविती ।' तुका – २३३२ ). कामधेनूजवळ जो कोणी इच्छा करील, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात, मग तिच्या स्वतःच्या मुलाचे मनोरथ तिच्याकडून पुरविले जातील यांत काय आश्चर्य आहे ? अर्जुन हा प्रत्यक्ष

श्रीकृष्णरूपी कामधेनूचा मुलगा होता असें श्रीज्ञानेश्वरांनीं काव्यात्मक वर्णन केलेलें आहे ( ' किरीटी कामधेनूचा पाडा । वरी कल्पतरूचा आहे मादोडा । म्हणोनि मनोरथ सिद्धीचिया चाडा । तों नवल नोहे ॥ ' ज्ञा.—८–८ ). मग अर्जुनानें जें जें विचारावें तें तें श्रीकृष्णांनीं सांगावें यांत नवल तें काय ? **सदैवा**—भाग्यवानाला.—कामधेनु व कल्पतरु हे ज्याला प्राप्त होतात, त्याच्या सर्व कामना फलद्रूप होतात ही गोष्ट जरी खरी असली तरी त्याच्याजवळ कल्पना करणारा हा भाग्यवान् असावा लागतो. कल्पना करणारा जर दुर्दैवी असेल तर ह्या वस्तु प्राप्त होऊनही त्याचा नाश होतो ( ह्याबद्दल एक कल्पित गोष्ट, ज्ञानेश्वरी अध्याय १२ वा, प्रकरण १ लें, पान ६ वर दिली आहे ती वाचावी ). म्हणूनच ज्ञानेश्वरांनीं ' सदैवा ' हें विशेषण ह्या ठिकाणीं योजलेलें आहे.

अर्जुन हा ' सदैव ' होता. कारण श्रीकृष्ण परमात्मा हे त्याचे सारथी होते व रुद्रावतार श्रीहनुमान हे त्याच्या रथाच्या ध्वजस्तंभावर स्थित होते ( ' ध्वजस्तंभावरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरु । सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेंसीं ॥ ज्ञा. –१–१४१). शिवाय श्रीकृष्ण व अर्जुन हे बालमित्र होते व अर्जुनाची भाक्ति ही सख्यभक्ति होती ( ' हो कां आत्मनिवेदनातळींची । जे पीठिका होय सख्याची । पार्थु अधिष्ठात्री तेथिंची । मातृका गा ॥' ज्ञा.–६–१२७). जो परमात्मा योग्यांना दिसत नाहीं व वेदाला व ध्यानालाही जो अगोचर आहे, तो परमात्मा श्रीकृष्ण अर्जुन रागावला तर त्याची समजूत घालीत असे ( 'एऱ्हवीं हा योगिया नाडळे। वेदार्थासी नाकळे । जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना ॥ ' ज्ञा. ४–७ ते १५; ' हा कोपे कीं निवांतु साहे । हा रुसे तरी बुझावीत जाये । नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ॥ ' ज्ञा. –११–१७२ ). आजपर्यंत जें विश्वरूप भगवंतांनीं कोणालाही दाखविलें नाहीं, तें विश्वरूप भगवंतांनीं अर्जुनाला दाखविलें ( ' मियां इहींच दोहीं डोळां । झोंबावें विश्वरूपा सकळा । एवढी हांव तो दैवाआगळा । म्हणऊनि करी ' ॥ ज्ञा. –१०–३३२ ). याशिवाय आजपर्यंत न घडणारी ही गोष्ट अर्जुनाच्या बाबतींत घडून आली. सामान्यतः ब्रह्मज्ञान हें नेहमीं योग्य स्थल, योग्य काल व योग्य अधिकार पाहून सांगितलें जातें. ब्रह्मज्ञान सांगण्याकरितां नेहमीं एकांत किंवा निदान शांत स्थल लागत असतें. श्रीशंकरांनीं पार्वतीला आत्मज्ञान, क्षीरसिंधूच्या

सन्निधभार्गी सांगितलें. ( ' क्षीरासिंधुपरिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं । नेणों कैं श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ॥ ' ज्ञा. १८-१७५१ ). परंतु भगवंतांनीं अर्जुनाला आत्मज्ञान रणांगणावर सांगितलें म्हणूनच संजय म्हणतो, ' असा भाग्योदय अर्जुनाखेरीज दुसऱ्या कोणाच्याही ठिकाणीं दिसत नाहीं. ' ( ' अहो संग्रामु हा वाणिया । मापें नाराचांचिया आणिया । सूनि मांस घे मवणिया । जीवितेंसी ॥ ', ' ऐसिया समयीं कर्कशें । भोगीजत स्वानंद राज्य कैसें । आजि भाग्योदयो हा नसे । आणिके ठांईं ॥ ' -ज्ञा. १७-४२५-४२६ ). तात्पर्य, अर्जुन हा असा ' सदैव ' होण्यास्तव त्याच्या सर्व इच्छा पूर्ण व्हाव्यात यांत आश्चर्य नाहीं.

**ओवी ११—आर्त**—उत्कंठा, इच्छा, आवड, तळमळ.

**उपमन्यु**—हा व्याघ्रपाद ऋषींचा वडील मुलगा होता. त्याच्या घरीं इतकें दारिद्र्य होतें कीं, त्याला घरीं दूध पिण्यास मिळत नसे. म्हणून त्याची समजूत करण्याकरितां त्याची आई रोज त्याला पाण्यांत पीठ कालवून दूध म्हणून देई. एकदां त्याला त्याच्या मित्राच्या घरीं खरें दूध प्यावयास मिळालें. दुसऱ्या दिवशीं नेहमींप्रमाणें आईनें त्याला पाण्यांत पीठ कालवून दूध म्हणून दिलें. परंतु तें त्याला आवडेना व त्यानें खऱ्या दुधाकरतां तिच्याजवळ हट्ट धरिला. आईनें त्याला सांगितलें कीं, तुला खरें दूध पाहिजे असल्यास तूं श्रीशंकराची आराधना कर. तेच तुला दूध देऊं शकतील. यानंतर त्या पांच वर्षांच्या उपमन्यूनें श्रीशंकरांची तपश्चर्या केली व श्रीशंकरांनीं प्रसन्न होऊन जेथें दुधाची कधींही उणीव पडणार नाहीं अशा क्षीरसागराचें त्याला अधिपति केलें व त्याला आकल्प आयुष्य दिलें. ( ' मागां दूध दे म्हणतलियासाठीं । आघवियाची क्षीराब्धीची करुनि वाटी । उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविली जैसी ॥ ' ज्ञा. -१०-१७ ). ( ज्याप्रमाणें श्रीशंकरांच्या कृपेमुळें उपमन्यूचे मनोरथ पूर्ण झाले त्याचप्रमाणें श्रीकृष्णाच्या कृपेमुळें अर्जुन हाही सर्व सुखांचें वसतिस्थान होईल असें श्रीज्ञानेश्वरमहाज पुढच्या ओवींतून सांगतात ).

**ओवी १२ — कुरुठा — घर. औदार्य —** उदारपणा, दातृत्व. — श्रीकृष्णाच्या औदार्याचें जेवढें वर्णन करावें तेवढें अपुरेंच होणारें आहे ( ' उदार तूं हरी ऐसी कीर्ति चराचरीं । अनंत हे थोरी गर्जताती पवाडे ॥ ' —तुका-१३२६ ; तुका म्हणे तुज वर्णिती पुराणें । होय नारायण दयासिंधु ॥ '

—तुका.–६८७; 'दान दे गा उदार श्रेष्ठा ।'–ज्ञा. गा. '४२६; तुजऐसा कोण उदाराची रासी । आपुलेंचि दसी पद दासा ॥'–तुका.–६९४). औदार्याचे किंवा दानाचे तीन प्रकार आहेत— कनिष्ठ दान, इच्छेनुसार दान, स्वेच्छा अथवा स्वतंत्र दान. उदाहरणार्थ, याचकानें पन्नास रुपये मागितले असतां त्यास दहा रुपये देणें म्हणजे याचकाच्या इच्छेपेक्षां कमी दान देणें ह्याला कनिष्ठ दान म्हणतात. याचक मागेल तेवढें त्याला देणें याला इच्छेनुसार दान म्हणतात व याचकाचा अधिकार व योग्यता न पाहतां त्यानें मागितल्यापेक्षां अधिक देणें ह्याला 'स्वतंत्र दान' म्हणतात. भगवंताचें औदार्य हें 'स्वतंत्र दानांत' पडतें व अर्जुनानेंही त्याचें वर्णन असेंच केलेलें आहे ('तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र । पैं कैवल्याऐसें पवित्र । कीं वैरियांही दिधलें ॥'–ज्ञा.–११–९८). समर्थांच्या घरीं ज्याप्रमाणें पंक्तिप्रपंच नसतो (समर्थांचिये पंक्तिभोजनें । ताळिल्या वरिल्या एकाचि पक्वान्नें' ज्ञा. १८–४८) त्याचप्रमाणें भगवंताच्या औदर्यात दुजाभाव नाहीं ('विष पाजूं आली पूतना राक्षसी । सायुज्यता देणें तियेसीरया ॥' ज्ञा. गा. ८०; 'पुत्राचिया लोभें नष्ट म्हणे नारायण । कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचें पुण्य ॥' तुका.–२४१२; 'सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । पातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया' तुका.–२२७२). भगवंत आपलें स्वतःचें पदही देतात ('देव देऊनी उदार भक्तां देतो अमरपदें । देतां न म्हणे साना थोर वैरियासि तेंचि दे' ज्ञा. गा. ३३७). **सर्व सुखांचा वसौटा**— सर्व सुखांचें वसतिस्थान.—'सर्व सुख' म्हणजे 'ब्रह्मसुख' कारण सर्व सुखाचा अंतर्भाव 'ब्रह्मसुखांत' होतो. ब्रह्माला 'भूमा' म्हणतात व 'भूमा' म्हणजेच 'सुख' असें उपनिषदांमध्यें सांगितलेलें आहे ('यो वै भूमा तत्सुखम् । नाल्पे सुखमस्ति । भूमैव सुखम् ॥' छां. उप०–७–२३ 'सर्व सुखाचें आगरु । बाप रखुमादेवीवरु' ज्ञा. गा. ४०२).

**ओवी १३**—**गोसावी**–धनी, मालक. **श्रीलक्ष्मीकांताऐसा**–श्रीलक्ष्मीच्या पतीसारखा (म्ह. श्रीकृष्णासारखा).—ऐश्वर्यसंपन्न अशी जी लक्ष्मी ('नातरी आथिलेपणें सरिसी । कवणी आहे लक्ष्मियेऐसी । श्रियेसारखिया दासी । घरीं जियेतें ॥' ज्ञा. ९–३७३) ती ज्याच्यावर कृपा करते तो ऐश्वर्यसंपन्न होतो, ('पैं निर्धनाघरीं वानिवसें । महालक्ष्मीचि घेऊनि बैसे । तयातें

निर्धन ऐसें । म्हणो ये काई ॥' ज्ञा.-१६-३६ ); मग लक्ष्मीचे स्वामी जे श्रीकृष्ण ते ज्याच्यावर कृपा करतील त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतील यांत नवल तें काय?

**ओवी १५—तत्त्वता**-वस्तुतः, तात्त्विकदृष्ट्या, वास्तविक पाहतां. **मोक्षकर**-मोक्षाला देणारे. **दोनीही**-दोन्हीही—( कर्म ) संन्यास ( म्ह. ज्ञान-मार्ग ) व कर्मयोग ( म्ह. निष्कामकर्मयोग ) हे दोन्हीही मार्ग मोक्षाला प्राप्त करून देणारे आहेत. ज्याप्रमाणें मेघांतून जमिनीवर पडणारें पाणी वेगवेगळ्या मार्गांनीं पण समुद्रालाच जाऊन मिळतें ( ' आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् । ' ) त्याप्रमाणें कर्मयोगाचें आचरण केलें असतां किंवा ज्ञानमार्गाचें आचरण केलें असतां मोक्षाचीच प्राप्ति होते. संन्यासमार्ग हा कठिण आहे म्हणून तो मोक्षाचा मार्गच नव्हे, असें म्हणतां येणार नाहीं. ( उदाहरणार्थ, मलखांबावर नुसते हातात कान धरून उडी मारणारे पहिलवान आहेत व कित्येकांना दुसऱ्यानें हातांनीं धरिलें तरीही उडी मारतां येत नाहीं. एवढ्यावरून कान हातांत धरून मलखांबावर उडी मारणें अशक्य आहे असें म्हणतां येणार नाहीं. ) ज्ञानमार्ग व कर्ममार्ग या दोन मार्गांपैकीं ज्याला जो मार्ग झेपेल त्याचेंच त्यानें आचरण करणें श्रेयस्कर होय.

**ओवी १६—प्रांजळा**-सोपा, सुलभ, सहज आचरण्यासारखा. —अज्ञानी व ज्ञानी या दोघांनाही आचरण्यास सोपा असा मार्ग 'निष्कामकर्मयोग' होय. निष्कामकर्मयोग हा धोपट व सर्वसंग्राहक असा मार्ग आहे. नाव ही अर्भक, स्त्री, आंधळा, पांगळा किंवा उत्तम पोहणारा या सर्वांनाही तारून पलीकडच्या तीराला नेते म्हणून ज्याप्रमाणें सर्वसंग्राहक आहे त्याप्रमाणें बुद्धि शुद्ध किंवा मलिन असणाऱ्या अशा दोघांनाही कर्ममार्ग हा तारून नेतो. ज्ञानमार्गास बुद्धि तीक्ष्ण व शुद्ध म्हणजे मलविक्षेपदोषरहित ( अधिक माहिती वेदांत-प्रकरण, ओवी ३४ पहा. ) अशी लागते ( ' दृश्यते त्वग्रयया बुद्ध्या । सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः । ' कठ. उप. २-३-१२; ' नाविरतो दुश्चरितान्नाशान्तो नासमाहितः । नाशान्तमानसो वापि प्रज्ञानेनैन-माप्नुयात् ॥ कठ. उप. १-२-२३ ॥ 'तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाहीं आन । परी तोचि थारे ऐसें मन । शुद्ध होआवें ॥' ज्ञा. १५-३५; ' निर्विण्णानां ज्ञानयोगो न्यासिनामिह कर्मसु ॥ ' ए. भा.-२०- श्लोक ७)

व ज्ञानाचा अधिकारी 'साधनचतुष्टयसंपन्न' असावा लागतो. (अधिक माहिती वेदांत–प्रकरण, ओवी ७१ पहा). अनधिकाऱ्याला जर ब्रह्मज्ञान सांगितलें तर कित्येक वेळां त्याचा दुष्परिणाम होतो. तो सर्वच ब्रह्म आहे, असें समजून यथेच्छ विषयोपभोग घेऊं लागतो. ('आवडीच्या मतें करितो भोजन। भोग नारायणें म्हणती केला।' तुका.–२६६०). एवढ्याकरितां अनधिकाऱ्याला नैष्कर्मतेचा उपदेश करूं नये असें भगवंत सांगतात ('न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम्। जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन्॥' गीता–३–२६). 'जें सायासें स्तन्य सेवी। तें पक्वान्नें केवीं जेवी। म्हणोनि बालका जैशीं नेदावीं धनुर्धरा॥'; 'तैशीं कर्मीं जया अयोग्यता। तयाप्रति नैष्कर्म्यता। न प्रगटावी खेळतां। आदिकरुनी॥' ' ज्ञा. ३–१७२,१७३). ज्ञानमार्ग हा विहंगम मार्ग असल्यामुळें त्याच्यांत पतनाची भीति असते. परंतु कर्मयोगांत तशी भीति नसते. निष्कामकर्मयोगाच्या आचरणानें अंतःकरणशुद्धि प्राप्त होते व तद्वारा वैराग्याचा लाभ होतो. नंतर अशा साधकाला श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ असे गुरु भेट देतात व ते त्याला 'तत्त्वमसि' या महावाक्याचा उपदेश करतात. नंतर साधकाला अहंग्रहध्यानानें ब्रह्माची म्हणजे मोक्षाची प्राप्ति होते. **कर्मयोगु**–निष्कामकर्मयोग.—निष्काकर्मयोग याचा अर्थ, आपापल्या वर्णाला व आश्रमाला विहित असें जें कर्म शास्त्रानें सांगितलें आहे, तें कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून ईश्वरार्पणबुद्धीनें करणें, असा आहे.

**ओवी १७—सारासार**–श्रेष्ठकनिष्ठ, सरसनिरस. **सोहपा**–सोपा, आचरण्यास सुलभ–ज्ञानमार्गापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ म्हणण्याचें कारण तो आचरण्यास सोपा आहे. उदाहरणार्थ, मुंबईस पायानें, बैलगाडीनें, मोटारीनें, आगगाडीनें व विमानानें जातां येतें. परंतु सर्वांत कमी कष्टाचा, कमी खर्चाचा, बिनधोक्याचा अतएव सोपा व सर्वसंग्राहक असा मार्ग जर कोणता असेल तर तो आगगाडीचाच होय. तद्वतच सर्वांना झेंपण्यासारखा व सुलभ मार्ग कर्मयोग हा आहे. संन्यास–मार्गांत सर्व वासनांचा व भोगांचा त्याग व्हावा लागतो ('आशा हे समूळ खाणोनि काढावी। तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें।' तुका.–२४६६); परंतु कर्ममार्गांत शास्त्रानें सांगितलेल्या विहित भोगांचा उपभोग घेतां येतो. **संन्यासफळ**–संन्यासमार्गाचें फल (म्ह. मोक्ष). **अनायासें**–कष्टांवाचून, सहज.—ही भाषा तारतम्यानें वापरली आहे. ह्याचा

अर्थ निष्कामकर्मयोगांत मुळींच कष्ट पडत नाहींत असा नाहीं. यथासांग व यथाविधि कर्म करून त्याच्या फलाची इच्छा न करतां, तें भगवंताला अर्पण करणें ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाहीं. संन्यासमार्गापेक्षां निष्कामकर्मयोगांत कमी कष्ट पडत असल्यामुळें भगवंत या ठिकाणीं 'अनायासें' असें पद योजितात.

**ओवी १८—याचिलागीं**—एवढ्याकरितां. **सांगेन**—कथन करीन. **संन्यासियाचें**—कर्मसंन्यास करणाराचें, ज्ञात्याचें. **चिन्ह**—लक्षण, खूण.—भगवें वस्त्र परिधान करणें वगैरे जो आश्रमसंन्यास, ज्याला चतुर्थाश्रम म्हणतात, त्याचा विचार गीतेंत आलेला नाहीं, तर ज्ञानपूर्वक जो कर्मांचा त्याग ( म्ह. संन्यास ) त्याचा विचार आलेला आहे. गीता ही बाह्य त्यागापेक्षां अंतर्त्यागाला अधिक महत्त्व देते. **हे**—हे दोन्ही मार्ग ( म्ह. कर्मसंन्यास व कर्मयोग ). **अभिन्न**—एकरूप, पृथक् नसलेले—अधिकारपरत्वें कर्मसंन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग जरी भिन्न असले तरी प्राप्तव्याच्या दृष्टीनें हे दोन्ही मार्ग एकच ( म्ह. मोक्षफलाला देणारे ) आहेत. संन्यासमार्गानें जें फल प्राप्त होतें तेंच फल कर्ममार्गानें अनायासें प्राप्त होत असतांना, "अर्जुना, तूं अविवेकानें प्राप्त कर्म कां टाकतोस?" असें सांगण्याचा भगवंताचा आशय आहे.

**ओवी १९—गेलियाची**—नष्ट झालेल्याची. **से**—स्मृति, आठवण, स्मरण, विचार.—मनुष्याची यःकश्चित् सामान्य वस्तु हरवली किंवा नष्ट झाली तर त्याची त्याला सारखी चुटपुट लागते; मग एखादी प्रिय वस्तु नाहींशी झाली तर त्याबद्दल तो शोक करीत बसेल यांत नवल नाहीं. परंतु खरा संन्यासी तोच कीं, प्रिय विषय नष्ट झाला असतांही ज्याच्या मनाला रुखरुख वाटत नाहीं.

केवळ पांढरें वस्त्र भगवें केल्यानें मनुष्य खरा संन्यासी होत नाहीं, तर मुख्यतः मन भगवें म्हणजे विकाररहित व्हावें लागतें. ( 'तुका बस्तर बिचारा क्या करे रे। अंतर भगवा न होय। तुका.–४७९ ). नाहीं तर तुकाराममहाराज म्हणतात, कांहीं कुत्र्यांचा सुद्धां रंग भगवा असतो म्हणून त्यांना संन्यासी म्हणतां येणार नाहीं. ( 'भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा। तेथें अनुभवाचा काय पंथ।' तुका. –२६०२ ). श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं एका

अभंगांत एका दांभिक संन्याशाचें वर्णन केलें आहे—एक संन्यासी महाराज होते. त्यांना एकानें विचारलें, " महाराज, आपणांस आपला कमंडलु हरवला तर त्याबद्दल वाईट वाटतें का ?" ते म्हणाले, " हो, वाटतें. " नंतर त्यानें पुन्हा विचारलें, " तुम्हांस जर एखाद्यानें पुडीस ( म्ह. भोजनास ) बोलाविलें तर आनंद होतो का ? " ते म्हणाले, " होतो, हा तर मनुष्यस्वभावच आहे ". मग ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, अशी जर मनोवृत्ति असेल तर गृहस्थाश्रम टाकून संन्यासाश्रम घेण्यांत कोणचा पुरुषार्थ साधला ? ( ' आलियाचा संतोष गेलियाची हानी ॥ नाहीं त्याचा आतिसो वेंचे त्याची कहाणी ॥ ऐसे संकल्प विकल्प देहीं ॥ वरीवरी मुंडलिया होय कांहीं ॥ तरी बहुरुप्याच्या ठायीं ॥ काई काई नटु नसे रया ॥ १ ॥ आधीं भीतरु दंडावा । पाठीं बाहिजु मुंडावा । नाहीं तरी योग मांडिवा । कां करिसी रया ॥ ध्रु. ॥ ज्ञा. गा.–११३ ). नाटकामध्यें संन्याशाचा अभिनय करणारे पुष्कळ नट असतात, परंतु त्यांना संन्यासी म्हणतां येत नाहीं ( ' ब्रह्मज्ञानेंवीण संन्यासी । नटाच्या ऐसें मुंडण त्यासी । सोकले मिष्टान्न भिक्षेसी । वृथा गेरूशी नाशिलें ॥ ए. भा. ९–३५१). जोपर्यंत अंतःकरणांतून विषयवासना गेलेल्या नाहींत, ( ' वासनेची बुंथी । तेथें कैची ब्रह्मस्थिति ' । तुका.–४००५ ) द्वंद्वराहित्यता प्राप्त झालेली नाहीं व देहतादात्म्य नष्ट झालेलें नाहीं तोंपर्यंत संन्यासाश्रम घेणें किंवा कर्मत्याग करणें ही गोष्ट अनुचित होय ( ' तुका म्हणे नाहीं निरसला देह । तोवरी अवघे हे संसारिक । ' तुका.–२०५२ ; ' पहिला नाद चटपट चटपट । शिखासूत्र त्यज्जुनि सपाट । विरजा होमिला द्दष्ट । परि अपुट तैसाचि ॥ ' ज्ञा. गा. ७२९ ). विषयांचा नुसता बाह्य त्याग करून उपयोग होत नाहीं तर विषय हा मुख्यतः मनांतून जावा लागतो ( ' म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे । मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥ ' ज्ञा. २–३३१ ).

जोंपर्यंत अंतःकरणांत विषयांचें ध्यान असतें किंवा वासना असतात तोंपर्यंत बाह्यतः जरी विषयांचा त्याग केलेला असला तरी खरा विषयत्याग होत नाहीं ( ' त्यजिले भेटवी आणुनी वासना । दाविल्याचें जना काय काज ॥ ' तुका.–३९२१ ). उदाहरणार्थ, अविचारानें बायकोचा त्याग करून जर मनुष्य वनांत गेला तर त्या ठिकाणीं पुनः बायकोचें चिंतन सुरू होतें ( ' सकळ सांडुनि वना गेला । वनीं वनिता चिंतूं लागला । तो त्यागचि बाधकत्वा

आला। उलथोनि पडिला परिग्रहीं ॥' ए. भा.–११. ९०८ ). एवढ्याकरितां अपरिपक्क स्थितींत संसाराचा त्याग करणें हें घातुक ठरतें.

ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं विषयांचें ध्यानच नसल्यामुळें विषय नष्ट झाला असतांना त्याबद्दल त्याला वाईट वाटत नाहीं ('निळा म्हणे विरक्त देहीं। आठवाचि नाहीं विषयांचा ॥' निळा—१००२; विषयीं विसर पडिला निःशेष। अंगीं ब्रह्मरस ठसावला।' तुका.–३५८४ ). अमुक एक विषय आपला होता किंवा असावा अशी वृत्ति ज्याच्या ठिकाणीं असते त्याला तो विषय नसतांना त्याची आठवण होते. परंतु ज्ञानसंपन्न पुरुषाच्या ठिकाणीं विषयाबद्दल आसक्ति नसल्यामुळें विषय नष्ट झाला, तरी त्याची त्याला खबरही नसते. **न पवतां**—प्राप्त न होतां. **चाड न धरी**—इच्छा करीत नाहीं—एखादी वस्तु प्राप्त झाली नाहीं तरी त्याबद्दल तो खिन्न होत नाहीं; ह्याचें कारण त्याची संतुष्टता बाह्य विषयावर अवलंबून नसते. ("तैसें आत्मसुख उपाइलें। जयासि आपणपांचि फावलें। तया विषय सहज सांडवले। म्हणों काई।" ज्ञा.–५–१०८ ) याशिवाय इच्छेला कारण असणारें जें द्वैत तेंही त्याच्या ठिकाणीं नसतें. ('पैं आघवेंचि आपुलेपणें। पुरेचि जयां अभिलाषणें। जैसें येथूनि पऱ्हां जाणें। आकाशा नाहीं ॥' ज्ञा.–१५–३०० ). **सुनिश्चळु**— पूर्णपणें स्थिर.— बाह्य विषय प्राप्त झाला काय किंवा नष्ट झाला काय, त्याबद्दल त्याच्या ठिकाणीं पर्वा नसते. ह्याचें कारण तो अंतः-करणांत मेरुपर्वताप्रमाणें स्थिर असतो. त्याच्या मनाची बैठक ध्रुव ताऱ्या-प्रमाणें अढळ असते. पृथ्वी जरी फिरत असली तरी ध्रुव तारा जसा अढळ असतो तद्वतच त्याचें शरीर जरी इकडे तिकडे वावरत असलें, शरीरावर जरी सुखदुःखाचे आघात येऊन आदळत असले व त्याच्या देहादिसंघाताकडून जरी क्रिया होत असल्या तरी त्यामुळें त्याच्या अंतःकरणाची बैठक बिघडत नाहीं ('देह तरी वरिचिलीकडे। आपुलिया परी हिंडे। परि बैसका न मोडे॥ मानसींचि ॥' ज्ञा.–१३–४८५; 'जो अंतरीं दृढु। परमात्मरूपीं गूढु। बाह्य भांगू तरी रूढु। लौकिकु जैसा ॥' ज्ञा.–३–६८; 'अचळ न चळे ऐसें झालें मन। धरूनि निज खुण राहिलोंसें। तुका.–१७०० ). याचें कारण तो आपल्याला शरीर समजत नाहीं; तर अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय या पंचकोशाच्या (अधिक माहिती अध्याय १२ वा, प्रकरण दुसरें,

धान १२४ पहा ) पलीकडे असणारा जो आत्मा तो मी आहें असें तो समजतो. यामुळें तो इतर नाशवंत वस्तूंबद्दल शोक करीत नाहीं ( ' पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे । हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ ' ज्ञा.-१२-१९२ ). चार चौकी वाड्याच्या शेवटच्या चौकांत राहणाऱ्या माणसाला ज्याप्रमाणें बाहेरच्या रस्त्यावर चाललेल्या घडामोडींची खबरही नसते त्याचप्रमाणें ह्याची वृत्ति आत्मस्वरूपांत लीन झाल्याकारणानें त्याला बाह्य विषयांची जाणीवही नसते. म्हणून त्याला त्याच्या प्राप्तीमुळें किंवा नष्टतेमुळें हर्षशोक उत्पन्न होत नाहींत ( ' तरि जयाचिया इंद्रियांचिया घरा । नाहीं विषयांचिया येरझारा । जो आत्मबोधाचिया वोवरां । पहुडला असे ॥ '; ' जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो नेघे । विषय पासींही आलिया से न रिघे । हें काय म्हणऊनि ॥ ' ज्ञा.-६-६२, ६३ ). सामान्य मनुष्याची वृत्ति फुलझाडाच्या लहान रोपट्याप्रमाणें असते. तें जसें दक्षिणेकडून वारा आला असतां उत्तरेकडे वांकतें व उत्तरेकडून वारा आला असतां दक्षिणे-कडे वांकतें त्याप्रमाणें मनुष्याची वृत्ति सुख प्राप्त झालें असतां उल्हसित होते व दुःख प्राप्त झालें असतां खिन्न होते. परंतु आत्मानुभवी पुरुषाचें चित्त अनुकूल किंवा प्रतिकूल विषयप्राप्तीनें विकाराला पावत नाहीं ( ' दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता । तैसा सुखदुःखां प्राप्तां । मध्यस्थु जो । ' ज्ञा.-१२-२०३; ' तुका म्हणे जाण । सुख दुःख तें समान ॥ तुका.-२४५६ ). पुढच्या ओवींत ज्ञानेश्वरमहाराज संन्यासी कोणाला म्हणावें याची व्याख्या पुरी करतात.

**ओवी २०-संन्यासी**—कर्मसंन्यासी ( म्ह० ज्ञानी पुरुष )—ज्याच्या अंतःकरणांतून ' अहं आणि इदं ' अथवा ' मी देह आहे व देहसंबंधी ते माझे आप्त आहेत ' अशी जाणीव गेलेली असते तोच खरा संन्यासी होय. मग बाह्यतः तो अंगावर भगवीं वस्त्रें परिधान करो वा न करो ( ' आणि मी तूं हे भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे । सुख दुःख जाणणें । नाहीं जया । ' ज्ञा.-१२-१४९; ' तुका म्हणे मी हें माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधुजन । ' तुका.-३७८७ ). त्याच्या ठिकाणचें ' मी व माझें ' असें स्फुरण कां गेलेलें असतें, हें समजण्याकरितां ' मी व माझें हें स्फुरण कोठें उत्पन्न होतें ' हें समजणें आवश्यक आहे. आत्मा हा ज्या वेळेस अज्ञानाला वश होऊन आपल्या मूळ स्वरूपाला विसरतो व शरीराशीं

तादात्म्य करतो त्याच वेळीं त्याच्या ठिकाणीं मी देह व तत्संबंधी माझे आत ' असें स्फुरण उत्पन्न होतें ( ' तैं अज्ञान एक रूढे । तेणें कोहं विकल्पांचें मांडे । मग विवरूनि कीजे फुडें । देहो मी ऐसें ।। ज्ञा. १५३-४२ ; ' तैसा आपुलिया विस्मृती ।.आत्मा आपणाचि प्रकृती-। सारिखा गमोनि पुढती तियेसीचि भजे ।। ' ज्ञा. १५-३५४. ) ' मी व माझें ' स्फुरण उत्पन्न होणें हेंच संसाराचें कारण होय. ( ' मुक्त होता परी बळें झाला बद्ध । घेऊनिया छंद माझें माझें । ' तुका.-३७८९; ' कां कवण एकु भ्रमलेपणें । मी तो नव्हे गा चोरलों म्हणे । ऐसा नाथिला छंदु अंतःकरणें । घेऊनि ठाके ।। ' ज्ञा. ६-७४; ' उपजोनि संसारीं आपुला आपण वैरी । मी माझें शरीरीं घेऊनि ठेला । या देहातें म्हणे मी पुत्रदारा धन माझें । परि काळाचें हें खाजें ऐसें नेणतु गेला ।। ' ज्ञा. गा.-१२०. ) ह्या पुरुषाच्या ठिकाणचें ' मी व माझें ' असें स्फुरण नष्ट होण्याचें कारण अशा स्फुरणाला कारण असणारें जें आत्मस्वरूपाचें मूळ अज्ञान तें ह्याच्या ठिकाणीं ज्ञानोदय झाल्यामुळें संपूर्ण नष्ट झालेलें असतें. तो आपल्याला ' अहं-इदं-शून्य ' असें जें निर्धर्म आत्मस्वरूप, तें मी आहें, असें समजतो ( ' मग इदंतेसि वाळलें । जें मीपणेंवीण डाहारलें । ते रूप पाहिजे आपलें । आपणचि । ' ज्ञा.-१५-२६७ ). यामुळें त्याच्या ठिकाणची ' मी देह आहें ' अशी परिच्छिन्न अहंता नष्ट होते व सर्व ठिकाणीं मीच मी ओतप्रोत भरलेला आहें अशा व्यापक अहंतेवर तो येतो ( ' तैसा विश्वस्वप्नेंसीं माया । नीद सांडूनि धनंजया । सहसा चेइला अद्वया-। नंदपणें जो । ' ज्ञा-१८-४०५). ज्या ठिकाणीं कोणं-चीहि क्रिया संभवत नाहीं ( ' तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया म्हणौनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा । ' ज्ञा.-१८-९७८ ) असें जें व्यापक चैतन्य तें मीच आहें अशा अपरोक्ष अनुभवावर जो पुरुष असतो तोच खरा ' नित्य ' संन्यासी होय. **निरंतर**—कायमचा, अखंड.

**ओवी २१—मनें ऐसा जाहला**—मनानें असा ( म्ह. अहंममरहित ) झाला—ज्याच्या ठिकाणचें मनाचें मनपण म्हणजे ' संकल्पविकल्पता ' नाहींशी झालेली आहे. ' संकल्पविकल्पता ' हेंच मनाचें स्वरूप होय. ( संकल्पविकल्पात्मकं मनः । ' ' वायां मन हें नांव । एऱ्हवीं कल्पनाचि सावेव । जयाचेनि संगें जीव-। दशा वस्तु ।। ' ज्ञा.-१३-११० ). या पुरुषाच्या अंतःकरणांतील सर्व वासना नष्ट होऊन याचें मन स्थिर झालेलें असतें. मन जिंकणें हाच खरा

पुरुषार्थ होय. कारण वृत्तीबरोबर मनाला वाहूं न देणें व देणें याच्यावरच सुखदुःख अवलंबून आहे. ( ‘तें मनोरथसंगें नव्हे। एऱ्हवीं सिद्धि गेलेंचि आहे। हे दोनीचि उपाये। सुखदुःखासी।’ ज्ञा.–१३–१३३ ). ज्याचें मन मोकळें झालेलें असतें तोच खरा सुखी होय. ( ‘तुका म्हणे पाख मन। नारायण तें भोगी।’ तुका.– २९८५ ). असा पुरुष जरी परिग्रही असला तरी त्याला संन्यासी म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. उदाहरणार्थ, जनक हे जरी परिग्रही होते तरी ते संन्यासीच होते. कारण त्यांच्या ठिकाणीं देहाभिमान नव्हता व त्यामुळें अपरिग्रही जे शुकाचार्य त्यांचेही ते गुरु झाले ( ‘तुका म्हणे राज्य करितां जनक। अग्नीमाजी एक पाय जळे।’ तुका.–३४६५ ; ‘जनकभेटीसी पाठविला तेणें। अभिमान नाणें खोटें केलें।’ तुका.–२५५१ ). [ शुकाचार्य हे आपल्याला संसार करावयासच नको म्हणून बारा वर्षें आईच्या उदरातच राहिले. पुढें महामुनि व्यासांनीं त्यांना हांक मारली म्हणून ते बाहेर आले व पळूं लागले. नंतर व्यास त्यांच्यामागें धांवूं लागले. शुकाची वृत्ति पूर्ण ब्रह्माकार असल्यामुळें व्यास जेव्हां त्यांना ‘ शुका, शुका ’ म्हणून हांक मारीत, त्या वेळेस सभोंवतालचीं झाडें शुकांच्याऐवजीं ‘ ओ ’ म्हणून प्रत्युत्तर देत. पुढें शुकांना आपण ज्ञाते आहोंत असा सूक्ष्म अहंकार उत्पन्न झाला व म्हणून व्यासांनीं त्यांना जनकाच्या भेटीस पाठविलें. जनकानें आंतूनच निरोप पाठविला कीं, “ शुका, तूं आपणांबरोबर जो कोणी आणला आहेस त्याला टाकून आंत ये ” ( ‘ संगं त्यक्त्वा सुखी भव ’ ). शुक हे पूर्ण अपरिग्रही असल्यामुळें त्यांच्याजवळ कांहींच नव्हतें व म्हणून त्यांना जनकांच्या निरोपाचा अर्थच कळेना. नंतर तीन दिवसांनीं त्यांना त्याचा अर्थ कळला व त्यांनीं ‘ अहंकाराचा ’ त्याग केला तेव्हां जनकांची भेट झाली. ] **संग**—आसक्ति, स्नेह, प्रेम. **तो संगीं चि सांडिला**—तो आसक्तींकडूनच त्यागिला.—ज्ञानेश्वरांच्या व्याख्यानाची ही एक शैली आहे. त्यांचें व्याख्यान कित्येक वेळां फार वरच्या पातळीवरून केलेलें असतें. ते म्हणतात, तो संग टाकीत नाहीं ’, तर ‘संगच त्याला सोडून जातात.’ ज्या ठिकाणीं ममत्व अथवा प्रेम असतें, त्या ठिकाणीं आसक्ति असते. उदाहरणार्थ, बापाचें आपल्या मुलाचे ठिकाणीं ममत्व असतें म्हणून मुलगा परीक्षा उत्तीर्ण झाला तर तो पेढे वांटतो

व दुर्दैवानें मुलगा मेला तर शोक करतो. परंतु तिऱ्हाईत पुरुषाचा मुलगा परीक्षा उत्तीर्ण झाला किंवा मेला तर त्याबद्दल त्याला आनंद किंवा शोक होत नाहीं. कारण त्याच्या ठिकाणीं त्या मुलाबद्दल ममत्व नसतें. ज्ञानी पुरुषांच्या ठिकाणचें ममत्वच नाहींसें झालें असल्यामुळें त्याला संगच सोडून जातात. ज्याप्रमाणें झाडाला आग लागली असतां त्या झाडावर राहणारे पक्षी आपणहून त्या झाडाचा त्याग करतात, त्याचप्रमाणें त्याचें मन वैराग्यरूपी अग्नीनें पेटलेलें असल्यामुळें मनाचा आश्रय करून राहणारे असे जे संग ते त्याला सोडून जातात (' आगी लागलिया रुखीं । देखोनि सैरा पळती पक्षी । तैसें सांडिले अशेखीं । विकल्पीं जे ॥ ' ज्ञा. १५–२८८ ). सुखदुखाला कारण जो स्नेह त्याचाच त्यानें त्याग केलेला असतो ( ' तैसा वियोग जेणें दुःखें । विपात्ति शोक पोखे । ते स्नेह सांडूनि सुखें । उदासु होय । ' ज्ञा. १३–५८९ ).

**सुखें**—अनायासें, परिश्रमावांचून, सहज. **सुख**—आत्मसुख. –आत्मसुख प्राप्त करून घेण्याकरितां जीवाला आपलें अंतःकरण सोडून बाहेर जाण्याची जरूरी नाहीं, कारण तें त्याच्या अंतःकरणांतच असतें ( ' तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्व सुखाचा आरामु । कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ॥ ' ज्ञा. ९–६०)। असें असतांना त्याला तें प्राप्त होत नाहीं, ह्याचें कारण जीवाची वृत्ति बाह्य विषयांच्याकडे धांव घेत असते. ती वृत्ति अंतर्मुख झाली म्हणजे जीवाला आत्मसुखाचा लाभ होत असतो. सुख हा आत्म्याचा गुण नसून तें त्याचें स्वरूपच आहे (' जो आंगाथिला आनंदु । सुरतेंविण ॥ ' ज्ञा. १५–७४ ). आत्मलाभ होणें ह्याचाच अर्थ आत्मसुख प्राप्त होणें असा आहे. स्नेहामुळें जो आत्मभाव अनेक वस्तूंच्या ठिकाणीं विकसित झालेला असतो, तो आत्मभाव ज्ञानी पुरुष आत्मानात्मविवेकाच्या योगानें एकत्रित करतात, म्हणजे वृत्ति अंतर्मुख करतात व ती आत्म्याच्या ठिकाणीं संस्थापित करून अखंड असें जें आत्मसुख तें, ते अनुभवितात (' तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली बासवाटी । ते एकवटिती ज्ञानदृष्टी । अखंड जे ॥ ' ज्ञा. १५–२९८ ).

**अखंडित**—सतत, निरंतर.—विषयसुख हें परावलंबी असल्यामुळें तें खंडित व विनाशी असतें. परंतु आत्मसुखाच्या मागें नाश नसतो व तें अमर्याद असतें (' देशेंकालें वेदानुवादा । ज्या सुखाची न करवे मर्यादा । त्या सुखाची सुखसंपदा । मद्भक्त सदा भोगिती ॥ ' ए. भा. १४–२०१; ' मन हें

निश्चळ झालें एके ठायीं । तयां उणें काई निजसुखा ॥' तुका.-३६८४; 'अर्जुना अनंत सुखाच्या डोहीं । एकसरा तळुचि घेतला जिहीं । मग स्थिराऊनि तेही । तोंचि जाहले ॥' ज्ञा. ५-१४४ ).

**ओवी २२--आतां**—यानंतर, अशा स्थितींत. **निःसंगु**--संगरहित—विषय हे बाधक नसतात तर त्यांची आसक्ति बाधक असते. ईशसृष्टि म्हणजे घरदार, बायका, पोरें वगैरे खरीं बाधक नाहींत, तर जीवसृष्टि म्हणजे जीवानें त्यांच्याबद्दल जें ममत्व घेतलेलें असतें तें बाधक असतें. ह्या ममत्वामुळेंच जीवाला सुखदुःखें भोगावीं लागतात ( 'कां सांडिसी गृहाश्रम । कां सांडिसी क्रियाकर्म । कासया सांडिसी कुळींचे धर्म । आहे तें वर्म वेगळेंचि ॥' ज्ञा. गा.-११ ). विषय हे जड आहेत, ते आपणहोऊन जीवाच्या मागें लागत नाहींत. परंतु जीव विषय हे सुखदायक आहेत म्हणून त्यांचें चिंतन करतो व मग त्यांच्या ठिकाणीं त्याला आसक्ति उत्पन्न होते व तो त्यांमध्यें गुरफटला जातो. विषयांना विषयत्व देणारें जें मन तें या बोधसंपन्न पुरुषाचें, आत्मसुखांत निमग्न झालेलें असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं भोक्ता, भोग्य व भोग ही त्रिपुटीच नाहींशी झालेली असते. अशा अनुभवानंतर तो जरी गृहादिक उपाधींत राहत असला तरी त्याच्या मनाचें स्थैर्य बिघडत नाहीं ( 'एऱ्हवी इंद्रियांचेनि मेळें । विषयावरी तरी लोळे । परि विकाराचेनि विटाळें । लिंपिजेना ॥' ज्ञा.-१३-४७८; 'दळीं कांडीं लोकांऐसें । परि मी नसें ते ठायीं ॥' तुका.-४०७०. [ ह्याबद्दल महान् साधु कान्होबा पाठक यांची एक गोष्ट प्रसिद्ध आहे, ती अशी—श्रीक्षेत्र आळंदीपासून सुमारें दहा मैलांवर असलेल्या केंदूर पाबळ गांवीं कान्होबा पाठक म्हणून एक आत्मानुभवी थोर पुरुष राहत असत. एक ब्राह्मण काशीयात्रेला पायीं निघाला असतां वाटेंत त्याला कांशीविश्वेश्वरांनीं स्वप्नांत येऊन असा दृष्टांत दिला कीं, "तूं माझ्याकडे न येतां केंदूर गांवीं राहत असणाऱ्या कान्होबा पाठकांना शरण जा म्हणजे तुझें कार्य होईल." दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो ब्राह्मण काशीयात्रेला न जातां परत माघारीं फिरला व केंदूर गावीं येऊन कान्होबा पाठकांची चौकशी करूं लागला. कान्होबा पाठक हे आपल्या घराच्या पडवींत, मुलांना मांडीवर खेळवीत व त्यांचे मुके घेत बसलेले होते. तेथें तो ब्राह्मण प्राप्त झाला व त्यानें त्यांना विचारलें,

"कान्होबा पाठक कोठें राहतात?" कान्होबा म्हणाले, "याच देहाला कान्होबा पाठक म्हणतात." हें ऐकल्याबरोबर त्या ब्राह्मणाचा चेहरा एकदम उतरला व तो मट्कन् खालीं बसला. कान्होबा पाठक हे अंतर्ज्ञानी असल्यामुळें त्यांनीं त्या ब्राह्मणास विचारलें, "भटजीबुवा, असें तुम्ही खिन्न कां दिसतां?" त्यानें सर्व हकीकत सांगितली व तो म्हणाला, "मी इतक्या लांबून आपण साधु आहांत म्हणून या ठिकाणीं आलों व आपण तर मुलांचे मुके घेत बसलां आहांत." कान्होबा पाठक म्हणाले, "एकंदरींत ह्या मुलांमुळें माझी साधुता बिघडली, तर त्यांनाच मी आतां आडांत टाकून देतों." असें म्हणून त्यांनीं त्या मुलांना अंगणांतील आडांत टाकून दिलें. पुढें स्वयंपाक वगैरे तयार झाल्यानंतर ते त्या ब्राह्मणाला जेवावयास बसण्यास आग्रह करूं लागले. भटजीबुवा म्हणाले, "अहो, ह्या ठिकाणीं बालहत्या झाली तेव्हां अशा परिस्थितींत मला जेवण सुचणार नाहीं". नंतर कान्होबा पाठकांनीं विहिरींतून आपल्या मुलांना जिवंत बाहेर काढलें. तात्पर्य, निःसंग ज्ञानी पुरुष जरी परिग्रहांत राहिला तरी त्यानें तो लिप्त होत नाहीं.]

**ओवी २३—गिंवसूं ये**—गुंडाळतां येतें—अग्नीच्या जवळ कापूस आला असतां अग्नि त्याला जाळतो. परंतु त्या अग्नींतील दाहक शक्ति नाहींशी झाली असतां तो त्याला जाळूं शकत नाहीं. उदाहरणार्थ, जळून विझलेल्या गोवरीची राख बायका कापसाला लावून कापसाच्या वाती करतात. तद्वतच ज्ञानी पुरुषाचें मन स्नेहशून्य झालें असल्यामुळें तो उपाधींत असूनही त्याचें मन विकाराला पावत नाहीं.

**ओवी २४—असतेनि उपाधी**—असणाऱ्या प्रपंचानें. **नाकाळिजे**—पकडला जात नाहीं, सांपडला जात नाहीं. **कर्मबंधीं**—कर्मपाशांनीं.—कर्तृत्वमद व फलास्वाद हे दोन कर्माचे बंध आहेत ('तैसा कर्तृत्वाचा मदु। आणि कर्मफळाचा आस्वादु। या दोहींचें नांव बंधु। कर्माचा कीं॥' ज्ञा.–१८–२०५). ह्यांच्यामुळें जीवाच्यामागें जन्ममृत्युरूपी चक्र लागतें. परंतु ज्ञात्याच्या ठिकाणीं कर्तृत्वमद व फलास्वाद या दोहोंच्या उत्पत्तीला कारण असणारा जो संकल्प अथवा अहंकार तोच नसल्यामुळें त्याच्या ठिकाणीं हे दोन्हीही बंध नसतात ('जे बुद्धीचिये ठावूनि देहीं। तयां अहंकाराची सेचि नाहीं। म्हणोनी

कर्मेंचि करतां पाहीं । चोखाळले ॥ ' ज्ञा.–५–६२ ). **संकल्प**—मानसिक कर्मप्रवृत्ति, वासना, इच्छा.–मनुष्याच्या मनांत पहिल्यांदा विषयाविषयीं संकल्प उत्पन्न होतो. नंतर त्याच्या ठिकाणीं विषयवासना उत्पन्न होते व तदनंतर तो विषयांत पडतो. सर्व क्रियेला कारण संकल्प आहे व संकल्पाच्या ठिकाणीं पराधीनता असते ( ' संकल्पारूढ तें पराधीन जिणें । कार्यीच कारण वाढतसे ॥ ' तुका.–३२३० ). परंतु ज्याच्या ठिकाणचा विषयाचा संकल्प नाहींसा झालेला असतो तो जरी विषयरूपी उपाधींत असला तरी त्यानें तो लिप्त होत नाहीं. म्हणून विषयांच्या बाह्य त्यागापेक्षां मनांतून विषयांचा त्याग होणें आवश्यक असतें ( ' म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे । मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ' ॥ ज्ञा. –२–३३१ ).

**ओवी २५—कल्पना**–संकल्प–कल्पना नाहींशी होण्याकरितां द्वैत नाहींसें व्हावें लागतें. जोंपर्यंत द्वैत स्फुरत आहे तोंपर्यंत कल्पना किंवा संकल्प उत्पन्न होत राहतात. जो ज्ञानाच्या योगानें अद्वैत–अनुभवावर येतो त्याच्या ठिकाणचा संकल्प नाहींसा होतो, असा संकल्पविरहित जो पुरुष तोच ' संन्यासी ' होय. **सांगडे**—सारखे—फलाच्या दृष्टीनें दोन्ही मार्ग ( म्ह. संन्यास व कर्मयोग ) हे सारखेच आहेत. दोन्ही मार्गांनींही मोक्षाचीच प्राप्ति होते. संन्यासमार्गामध्यें प्रथमतः संकल्प नाहींसा व्हावा लागतो व कर्मयोगामध्यें कर्तृत्वमद व फलास्वाद यांचा त्याग करावा लागतो. मनांत कर्तव्य स्फुरत असतांना केवळ कर्मांच्या त्यागानें संन्यास होत नाहीं. अशा त्यागाला भगवान् " मिथ्याचार " म्हणतात ( ' कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ' ॥ गीता–३–६; ' तयां कर्मत्यागु न घडे । जे कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती तें फुडें । दरिद्र जाण ॥ ' ज्ञा.–३–६५ ).

**ओवी २६—मूर्ख**—अविवेकी, अज्ञानी, शास्त्रसंस्काररहित. **सांख्य**—संन्यास, ज्ञानयोग. **संस्था**—व्यवस्था, निष्ठा, मार्ग. **केंवी जाणती**—कसें जाणतील ?—वास्तविक निष्कामकर्मयोग व संन्यास हे दोन्ही एकच मार्ग आहेत. निष्कामकर्मयोगाचीच परिणति संन्यासांत होते ( ' न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।' गीता–३–४; ' वांचोनि कर्मारंभ उचित । न करितांचि कां सिद्धवत । कर्महीना निश्चित । होईजेना ॥ ' ज्ञा.–३–४५ ).

**ओवी २७—भिन्न**-वेगळा, निराळा.-वास्तविक हे दोन्ही मार्ग एकच आहेत. या दोहोंमध्यें केवळ नांवाचाच फरक आहे. [ उदाहरणार्थ, दोन गृहस्थ प्रवास करण्याकरितां भिन्न भिन्न ठिकाणांहून निघाले होते. रस्त्यांत त्यांची गांठ पडली व कांहीं मैल बरोबर प्रवास केल्यानंतर त्यांनीं एका धर्मशाळेंत मुक्काम केला. गप्पा मारतां मारतां सहजच असा विषय निघाला कीं, सध्यां हिंदुस्थानांत उत्तम गाणारा कोण आहे. त्यांपैकीं एक म्हणाला, "माझ्या मामासारखा गाणारा जगतांत नाहीं." दुसरा म्हणाला, "माझ्या काकासारखा गाणारा दुसरा कोणीही सांपडणार नाहीं." दोघेही दुराग्रही असल्यामुळें ते आपला हेका सोडीनात व शेवटीं दोघांची मारामारीवर पाळी आली. इतक्यांत पलीकडे बसलेले गृहस्थ त्या दोघांच्या भांडणांत पडले व त्यांनीं एकाला त्याच्या 'मामाचें' नांव विचारलें व दुसऱ्याला त्याच्या 'काकाचें' नांव विचारलें. एक म्हणाला, "माझ्या मामाचें नांव 'तानसेन' आहे." व दुसरा म्हणाला, "माझ्या काकाचेंहि नांव तेंच आहे." मग तो म्हणाला, "अरे, तुम्ही मूर्खासारखे भांडत कां बसलां आहांत? कारण तुमचे मामा व काका हे एकच गृहस्थ आहेत." ]. परंतु हें ज्यांना समजत नाहीं ते निष्कारण वाद घालीत बसतात ( 'सांडिजे दुजया नामाचा आभासु। तरी योगु तोचि संन्यासु। पाहतां ब्रह्मीं नाहीं अवकाशु। दोहींमाजीं ॥'; 'जैसें नामाचेनि अनारिसेपणें। एका पुरुषातें बोलावणें। कां दोहींमार्गीं जाणें। एकाचि ठायां ॥' ज्ञा. ६-४०-४१ ).

**ओवी २८—पैं**—पादपूर्णार्थक अव्यय. **सम्यक्**—यथार्थतेनें, उत्तम रीतीनें, चांगलें. **अनुभवें**—अनुभवानें.—प्रत्यक्ष अनुभव व शब्दज्ञान यांत कित्येक वेळां फरक असूं शकतो. व्याख्यान करणाऱ्याचें ज्ञान यथातथ्य असेलच असें सांगतां येत नाहीं. अनुभवी जरी कमी बोलला तरी त्याचें महत्त्व शब्दज्ञान्यापेक्षा अधिक आहे. श्रीमच्छंकराचार्य, श्रीज्ञानेश्वरमहाराज, संत तुकाराम इत्यादिकांचे बोल हे अनुभवाचे आहेत म्हणून त्यांची किंमत अगाध आहे ( 'तुका म्हणे साक्षी आलें। तरी केलें प्रगट ॥' तुका.—२९७२; 'तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव। शब्दाचें गौरव कामा नये ॥' तुका.-३८०१ ). **तत्त्व**—सत्य, वास्तविक स्वरूप, ब्रह्म. **आघवें**—संपूर्ण.—संन्यास किंवा निष्कामकर्मयोगाच्या आचरणानें ज्यांनीं सतस्वरूप अनुभवले

ते पुरुष हे दोन्ही मार्ग एकच समजतात, परंतु ज्यांनीं या दोहोंपैकीं एकाही मार्गाचें आचरण केलें नाहीं व ज्यांना यथार्थ अनुभव प्राप्त झाला नाहीं, ते मात्र निरर्थक वाद करीत बसतात. [ उदाहरणार्थ, कांहीं जन्मांध आंधळे शहरांतील एका रस्त्यानें चालले होते. जातां जातां ज्या ठिकाणीं एक हत्ती बांधलेला होता त्या ठिकाणीं ते प्राप्त झाले. तेव्हां लोकांनीं सांगितलें, " अरे आंधळयांनो, वाटेंत हत्ती बांधला आहे, जरा जपून चाला." तेव्हां ते म्हणाले, " बापहो, आम्हीं कधींच हत्ती पाहिलेला नाहीं; तरी आम्हांला त्याचा निदान हातानें तरी स्पर्श करवा. " हे ऐकून तेथें जमलेल्या लोकांपैकीं एकाला त्यांची कींव आली व त्यानें त्यांपैकीं प्रत्येकाला हत्तीचा स्पर्श करून दिला, परंतु मजा अशी झाली कीं, त्या प्रत्येकाला हत्तीच्या एका विशिष्ट अंगाचाच स्पर्श झाला. पुढें ते आंधळे कांहीं काळ चालून गेल्यानंतर त्यांना वाटेंत ओढा लागला व त्या ठिकाणीं ते भाकरी खाण्याकरितां बसले. तेव्हां बोलतां बोलतां हत्ती हा प्राणी कसा असतो असा विषय निघाला. ज्याला हत्तीच्या पायाचाच फक्त स्पर्श झाला होता तो म्हणाला, " हत्ती हा खांबासारखा आहे "; ज्याला कानाचा स्पर्श झाला होता तो म्हणाला, " हत्ती हा सुपासारखा आहे "; ज्याला सोंडेचा स्पर्श झाला होता तो म्हणाला, " हत्ती हा मुसळासारखा आहे " व ज्याला फक्त शेपटाचाच स्पर्श झाला होता, तो म्हणाला, " हत्ती हा दोरासारखा आहे." असा वाद चालला असतां शेवटीं त्यांची हातघाईवर पाळी आली. इतक्यांत एक सद्‌गृहस्थ त्याच रस्त्यानें चालला होता. त्यानें त्यांना विचारलें, " अरे, तुम्ही भांडतां कां ? " तेव्हां त्यांनीं सर्व हकीकत सांगितली व ते म्हणाले, " महाराज, तुम्ही आतां खरा न्याय निवडा." तो गृहस्थ हुषार होता. तो म्हणाला, " तुम्हां सर्वांचें म्हणणें खरें आहे; याचें कारण तुम्हां प्रत्येकास हत्तीच्या एका विशिष्ट भागाचेंच ज्ञान झालेलें आहे व यामुळें तुम्ही आपसांत भांडत बसलां आहांत. मी तुम्हांला आतां हत्तीकडे घेऊन जातों व प्रत्येकाचा हात हत्तीच्या सर्व अवयवांवर फिरवितों म्हणजे तुम्हांला हत्तीचें संपूर्ण ज्ञान होईल." नंतर त्यानें सर्वांना हत्तीचें संपूर्ण ज्ञान करून दिलें. यामुळें त्यांच्यांतील वाद साहजिकच मिटला. ] पण ज्यांना एका मार्गानें का होईना आत्म्याचें

संपूर्ण ज्ञान झालेलें असतें ते तत्प्राप्तीच्या इतर मार्गाबद्दल वाद करीत नाहींत. **ऐक्यभावें**—अभिन्नपणानें, एकरूपानें.

**ओवी २९—सांख्यीं**-ज्ञानी पुरुषांकडून. **पाविजे**-मिळविलें जातें. **योगीं**-कर्मयोग्यांकडून. **गमिजे**-प्राप्त केलें जातें ; गम्य होतें. **इया परी**-ह्या रीतीनें. **ऐक्यता**-अभेद, --दोन्हीही मार्गांनीं गेलें असतां मोक्षाचीच प्राप्ति होते. म्हणून फलाच्या दृष्टीनें हे दोन्ही मार्ग अभिन्न आहेत.

**ओवी ३१—पाहलें.**-उजाडलें-त्याच्याच ठिकाणीं ज्ञानाचा खरा उदय झाला. **भेदेंविण**-अभिन्नपणानें.—जे खरे ज्ञानी असतात त्यांच्या ठिकाणीं हट्ट किंवा दुराग्रह फारसा नसतो (' तुका म्हणे भेदाभेद । गेले वाद खंडोनी । ' तुका.-१९४०). **आपणपें**-आपणाला, आत्मस्वरूपाला.--ज्ञानेश्वरमहाराज प्रायः ' आपण ' हा शब्द ' आत्मस्वरूप ' या अर्थानें योजितात (' जया आपणपें सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणें नाहीं । ' ज्ञा.-५-१०५ ' जिहीं आपणपें नाहीं देखिलें । ' ज्ञा.-५-११० ; ' तैसें आपणपें नाहीं दिठे । ' ज्ञा.-५-११२ ' तैसें हारपलें आपणपें पावे । तैं संतांतें पाहतां गिंवसावें । ' ज्ञा.-१८-४०० ).

**ओवी ३२—युक्ति**—निष्कामकर्मयोग, निष्कामकर्म करण्याची हतवटी.—आपापल्या वर्णाला व आश्रमाला उचित असें शास्त्रानें सांगितलेलें कर्म कर्तृत्वाभिमान व फलासक्ति टाकून ईश्वरार्पणबुद्धीनें करणें ह्याला युक्ति म्हणतात. ('म्हणोनि फळीं लागु । सांडोनी देहसंगु । कर्म करावीं हा चांगु । निरोपु माझा ॥' ज्ञा.-१८-१७६ ; ' तरी उचितें कर्में आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति न्यासावीं । आत्मरूपीं ॥ '; ' हें कर्म मी कर्ता । कां आचरेन या अर्था । ऐसा अभिमानु झणें चित्ता । रिगों देसी ॥' ज्ञा.-३-८६,८७ ). **मोक्षपर्वता**-मोक्षरूपी पर्वतावर—मोक्षाला पर्वत म्हणण्याचें कारण, मोक्ष प्राप्त करून घेण्याकरतां पुष्कळ कष्ट करावे लागतात. **महासुख**—परमानंद, ब्रह्मसुख, मोक्षसुख.—ब्रह्मानंद हा अनुपम, अमर्याद व अविनाशी असा आहे (' देशें काळें वेदानुवादा ज्या सुखाची न करवे मर्यादा । त्या सुखाची सुखसंपदा । मद्भक्त सदा भोगिती ॥ ' ए. भा. १४-२०१ ; 'भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति ॥' छां. उप.—७-२३ ). ब्रह्माच्या आनंदाची मीमांसा तैत्तिरीयोपनिषदांतील ब्रह्मानन्दवल्लीमध्यें विस्तरशः केलेली आहे. त्यांत एका-

पेक्षां एक, आनंद श्रेष्ठ आहे, असें सांगतां सांगतां सरते शेवटीं ब्रह्मानंद हा परमावधीचा आनंद होय असें म्हटलें आहे ( 'ते ये शतं प्रजापतेरानन्दः । स एको ब्रह्मण आनंदः' तैत्ति. उप. २-८; 'यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ॥' गीता-६-२२; 'तुका म्हणे आतां । लाभ नाहीं यापरता ॥' तुका.-९३३ ). **वाहिला**-सत्वर, लवकर.

**ओवी ३३—हव्यासीं**-छंदांत.-सांख्य म्हणजे संन्यासमार्ग हा सोपा मार्ग नाहीं. केवळ विहित कर्मांचा व शिखा व सूत्र यांचा त्याग केल्यानें संन्यास घडत नाहीं. जोंपर्यंत मनांत कर्तव्यबुद्धि स्फुरत आहे, अंतःकरणांत पापवासना व विषयांचें चिंतन आहे, तोंपर्यंत बाह्योपाधींचा जरी त्याग केलेला असला तरी तो खरा संन्यासी होत नाहीं ( 'जे उचित कर्म सांडिती । मग नैष्कर्म्य होऊं पाहती । परी कर्मेंद्रिय प्रवृत्ती । निरोधुनी ॥'; 'तयां कर्मत्यागु न घडे । जे कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती तें फुडें । दरिद्र जाण ॥' ज्ञा.-३-६४-६५). एक पैसा दान दिला, तर तो मनांतून लवकर विसरला जात नाहीं. या जन्मांत आपणहून जोडलेल्या चहा व विडीसारख्या सामान्य संवयी एकदम सुटत नाहींत; मग अनेक जन्मांतून भोगत आलेल्या विषयांचे संस्कार व त्याबद्दल मनांतील संकल्प केवळ कर्मत्यागानें किंवा वस्त्रत्यागानें नष्ट होणें शक्य नाहीं ( 'अनादि संसारमाळेच्या ठायीं । नित्य विषय भोगिले पाहीं । ते ठसावले चित्ताच्या ठायीं । वारंवार पाही सेवितां ॥' ए. भा. १३-३७८ ). संकल्पनाशाखेरीज संन्यास घडत नाहीं. व संकल्प नाहींसे होण्याकरतां देह-तादात्म्य नाहींसें व्हावें लागतें ( 'म्हणोनि कल्पना जें सांडे। तेंचि गा संन्यासु घडे । ' ज्ञा. -५-२५ ). संन्यासमार्ग साध्य होण्याकरतां प्रथमतः निष्कामकर्मयोगाचें आचरण करावें लागतें व त्याचा शेवट आत्मज्ञानांत म्हणजे 'संन्यासांत' होतो ( 'न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते' गीता-३-४; 'वाचोनि कर्मारंभ उचित। न करितांचि कां सिद्धवत । कर्महीना निश्चित । होईजेना ॥' ज्ञा. -३-४५ ). निष्कामकर्मयोग हा साधनारंभ आहे. ( 'मग अज्ञानें बांधलेयां । मोक्षपदीं बैसावया । साधनारंभु तो तृतीया -। ध्यायीं बोलिला ॥' ज्ञा.-१८-१४३७ ) व त्याचें अनुष्ठान न करतां जे एकदम संन्यासमार्गाचें अवलंबन करतात त्यांना संन्यासाची प्राप्ति कधींहि घडत नाहीं. ज्ञानी पुरुष आपणहून कर्में टाकीत नाहींत तर तीं

त्यांचीं पुढें आपोआप सुटतात ( ' फळली केळी उन्मळे। तैसी आत्मलाभें प्रबळें । जयांची क्रिया ढाळें ढाळें । गळती आहे ॥ ' ज्ञा. १५–२८७ ).

**श्लोक ७ वा**—गीतेचें सार व श्रीज्ञानेश्वरमहाराजांची टीका या दृष्टीनें प्रस्तुत श्लोक महत्त्वाचा आहे. या श्लोकाच्या पूर्वार्धांत साधन सांगितलें आहे व उत्तरार्धांत साध्य सांगितलें आहे. गीतेचें साध्य ' कुर्वन्नपि न लिप्यते ' असें आहे व हें साध्य, कर्ता हा जेव्हां अनुभवाच्या अंगानें ' सर्वभूतात्मभूतात्मा ' होतो त्या वेळेस प्राप्त होतें. प्रस्तुत श्लोकामध्यें ' सर्वभूतात्मभूतात्मा ' होण्याच्या मार्गाचा आरंभ निष्कामकर्मयोगापासून आहे असें ध्वनित केलें आहे. **विशुद्धात्मा**—शुद्धचित्त.—या ठिकाणीं ' आत्मा ' या शब्दाचा अर्थ 'चित्त' किंवा ' अंतःकरण ' असा आहे. निष्कामकर्मयोगाच्या आचरणानें चित्तशुद्धि प्राप्त होते. परमार्थांत चित्तशुद्धि आवश्यक आहे ( ' मुख्य साधावया परमार्था। अवश्य पाहिजे गा शुचिता । शुचित्वावांचोनि तत्त्वता । न लभे हातां निज-स्वार्थ ॥ ' ए. भा.–३–३८०, ' तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथें बोध करील काई ॥ ' तुका.–२६५६, ' करुनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥ ' तुका.–२४६८; ' एकी जाती तव्या आरिशासी । आरिसां उपलब्धि तवां मसी । तेवी चित्तशुद्धि परमार्थासी । विकल्पवंतासी अभावो ॥ ' हस्तामलक–२७५ ') **विजितात्मा**—जितदेह.—येथें ' आत्मा ' या शब्दाचा अर्थ ' देह ' असा आहे. शरीर ताब्यांत येण्याकरितां मिताहार, परिमित निद्रा व तपादि साधनें करावीं लागतात ) 'विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ' गीता–१८–५२ ; ' लोलुपता काय निद्रेसी जिंकावें। भोजन करावें परिमित ॥ ' तुका.–२४६३ ; ' युक्त आहार विहार । नेम इंद्रियाचा सार । नसावी बासर । निद्रा बहु भाषण ॥ ' तुका.–३०६४. ) शरीर ताब्यांत आलें नाहीं तर परमार्थ घडत नाहीं. **जितेंद्रिय**—इंद्रियें जिकलेला–मन हें इंद्रियद्वारा बाह्य विषयांच्याकडे धांव घेत असतें. त्याला अंतर्मुख करण्याकरितां प्रथमतः इंद्रियें जिंकावीं लागतात ( ' तरी मना या बाहेरिलीकडे । यावयाची साविया सवें मोडे । हें हृदयाचिया डोहीं बुडे । तैसें कीजे ॥ '; ' परी हें तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें । सर्वे द्वारीं कवाडें । कळासती ॥ ' ज्ञा.–८–१११–११२ ).

**ओवी ३४—भ्रांति**–भ्रम, चुकीचा समज, मिथ्या ज्ञान, अध्यास.–'भ्रांति' या शब्दाचा अर्थ श्रीज्ञानेश्वरांनीं ' असार ' ( म्ह. अनित्य ) असा केला आहे

( ‘ देखें सारासार विचारितां । भ्रांति ते पाहीं असारता । तरी सार तें स्वभावता । नित्य जाणें ॥ ’ ज्ञा.–२–१३३ ). आत्मा हा नित्य ( म्ह. सार ) आहे व आत्म्यावांचून जेवढे पदार्थ आहेत ते सर्व अनित्य ( म्ह. असार ) आहेत. तेव्हां श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मतें ‘भ्रांति’ या शब्दाचा अर्थ ‘सर्व अनात्मवस्तु’ असा ठरतो. वेदांतशास्त्राचेंही मत असेंच आहे. वेदांतशास्त्रामध्यें ‘ भ्रांति ’ या शब्दाचा अर्थ ‘ अध्यास ’ ( म्ह. भ्रम ) असा आहे. ‘ ज्याच्या ठिकाणी जें नाहीं त्याच्या ठिकाणीं तें भासणें ’ याला ‘ अध्यास ’ अथवा ‘ भ्रम ’ म्हणतात. ज्याप्रमाणें रज्जूवर ( दोरीवर ) सापाचा, शिंपीवर रुप्याचा अथवा स्थाणूवर ( खांबावर ) पुरुषाचा ‘ अध्यास ’ अथवा ‘ भ्रम ’ होतो, त्याचप्रमाणें ब्रह्मस्वरूपाच्या—आत्मस्वरूपाच्या–अज्ञानामुळें, समष्टिदृष्टीने ब्रह्मावर जगताचा व व्यष्टिदृष्टीनें आत्म्यावर अहंकार व देहादि प्रपंचाचा ‘ अध्यास ’ अथवा ‘ भ्रम ’ होतो. तात्पर्य, दिसणारें हे सर्व जगत्, अहंकार, देहादि प्रपंच, जगदंतरवर्ती शब्दादि पंचविषय व सर्व पदार्थ या ‘ सर्व अनात्म वस्तूंचा ’ अंतर्भाव ‘ भ्रांति ’ या शब्दांत होतो. अशा प्रकारची ‘ भ्रांति ’ जीवाला अनादि कालापासून झालेली आहे ( ‘ तरी अविद्येचिया निदा । विश्वस्वप्नाचा हा धांदा । भोगीत होता प्रबुद्धा । अनादि जो ॥ ’ ज्ञा. १८–४०३ ). या भ्रांतीमुळें जीवाला ‘ अनित्य, अशुचि, दुःखमय व अनात्मरूप ’ असा जो देहादि प्रपंच तो त्याला नित्य, शुचि, सुखमय व आत्मरूप असा वाटूं लागला व जीव हा आपल्या आत्मसुखाला विन्मुख होऊन सुखाकरतां विषयांच्याकडे धाव घेऊं लागला, म्हणून मूलतः त्याच्या ठिकाणीं नसलेलें जन्ममृत्युरूपी दुःख तो भोगूं लागला ( ‘ किती वेळां जन्मा यावें । किती व्हावे फजीत ॥ ’ तुका.–१७५७ ). **हिरतलें**—हिरावून घेतलें, काढून घेतलें.—पूर्वी या साधकाचें मन भ्रांतीमध्ये म्हणजे देहादि प्रपंचांत व विषयसुखांत रममाण झालेलें होतें ( ‘ संसाराचिया तोंडीं । गुंतलें जें ॥ ’ ज्ञा. ६–३७२ ; ‘ इंद्रियांचीं आम्ही पांगिलों अंकितें । त्यांचे रंगीं चित्त रंगलेंसे ॥ तुका.–१३१५ ). वास्तविक जीव हा आपल्या करमणुकीकरतां विषय जवळ करीत असतो. जन्माबरोबर मनुष्य आपल्याबरोबर विडी, तंबाखू, चहा इत्यादि व्यसनें व घरदार, बायकापोरें इत्यादि विषय घेऊन येत नाहीं. आपल्या सुखाकरतां तो हे विषय जवळ करीत असतो. पण हे विषय आपला भोग देऊन त्याच्या मनाला

आपल्या ताब्यांत ठेवतात. विषयभोगामुळें विषय हे मनुष्याच्या मनात संस्काररूपानें जडतात व नंतर ते संस्कार घालवणें फार कठिण पडतें. विषयवासनांनीं मनुष्याचें मन मलिन होते ('अनादि संसार माळेच्या ठायीं । नित्य विषय भोगिले पाहीं । ते ठसावले चित्ताच्या ठायीं । वारंवार पाहीं सेवितां ॥' ए. भा. १३–३७८, ३७९; 'मन मळिण वासनामळें। तें न करितां सोंविळें। बाह्य पवित्रता अहंबळें। तें जाण आंधळें न्याहाळी जैसें ॥' ए. भा. ३–३८२; 'महामळें मन होतें जें गांदलें। शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ॥' तुका.–१८२८). अशा प्रकारचें अपवित्र मन हें ईश्वरार्पणबुद्धीनें केलेल्या सत्कर्मरूपी साबणानें शुद्ध होतें ('यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥' गीता–१८–५; 'तीर्थें बाह्यमळु क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे । एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंचि ॥' ज्ञा.—१८–१६०; 'मनसंकल्पाचीं पापें न जाती तीर्थांचेनि बापें ।

). म्हणून साधक हा प्रथमतः 'योगयुक्त' होतो म्हणजे निष्कामकर्माचें आचरण करतो. पुढें त्याला ईशप्रसादानें वैराग्याचा लाभ होतो ('म्हणौनि तिये पुजे । रिझलेनि आत्मराजे । वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ॥' ज्ञा.–१८–९१८). परंतु चित्तशुद्धि व वैराग्यलाभ येवढ्यानें साधकाचें संपूर्ण कार्य होत नाहीं; कर्मानें फक्त अंतःकरणांतील मल व विक्षेप हे दोष जातात व तें ज्ञान ग्रहण करण्यास योग्य होतें. परंतु 'मी देह आहें व मी कर्ता, भोक्ता, जन्मणारा व मरणारा आहें,' असा जो भ्रांतिरूप संसार तो केवळ कर्मानें नष्ट होत नाहीं. हा संसार गुरूनें सांगितलेल्या आत्मानात्मविवेकानें व 'तत्त्वमसि' महावाक्याच्या उपदेशाने नष्ट होतो ('आत्मानात्मविवेकेन ज्ञानं भवति निश्चलम् ॥' सदाचारानुसंधान– २०). म्हणूनच श्रीज्ञानेश्वरांनीं 'गुरुवाक्यें मन धुतलें' अशीं पदें घातलेलीं आहेत. **वाक्य**—उक्ति, बोलणें, उपदेश. **धुतलें**-स्वच्छ केलें, शुद्ध केलें.—साधकानें निष्कामकर्मयोगाच्या व उपासनेच्या योगानें अंतःकरणांतील मल (म्ह. पापवासना) व विक्षेप (म्ह. चित्ताची चंचलता) हे दोष घालविल्यानतर (अधिक माहिती वेदांत–प्रकरण, ओ. ३४ पहा) गुरूची व त्याची गांठ होते ('आणि तेचि समर्यी । सद्गुरु भेटले पाहीं । तेवींचि तिहीं कांहीं । वांचिजेना ॥' ज्ञा.–१८–९९७). नंतर गुरु त्याला आत्मानात्मविवेकाचा म्हणजे पंचकोशाचा व तीन देहांचा विचार (अधिक माहिती १२ वा अध्याय

वेदान्त-प्रकरण, पानें १२४-१२५ पहा ) सांगतात व त्याला 'तत्त्वमसि' (म्ह. तें [ब्रह्म] तूं आहेस) या महावाक्याचा ('आंगें सानें परिणामें थोरु। जैसें गुरुमुखींचें अक्षरु।' ज्ञा.-१७-१२९) उपदेश करतात. असा उपदेश केल्यानंतरही कित्येक वेळां साधकाच्या मनांत 'मी ब्रह्म नसून देहच आहें' अशी विपरीत भावना उत्पन्न होत असते. ही भावना नाहींशी होण्याकरितां साधकाला तत्त्वमसि महावाक्यार्थाचें वारंवार मनन व निदिध्यासन करावें लागतें ( अधिक माहिती वेदान्त—प्रकरण, ओ ७१ पहा ). अशा तत्त्वमसि महावाक्याचा वारंवार विचार करणें व त्याचें ठिकाणीं अंतःकरणाची धारणा करणें यालाच 'गुरुवाक्यानें मन धुणें' असें म्हणतात ('तरी गुरु दाविलिया वाटा। येऊनि विवेकतीर्थतटा। धुऊनिया मळकटा। बुद्धीचा तेणें॥' ज्ञा.-१८-१०११; 'तेंचि गुरुवचन साहाणेसी। लावूनि अतितीक्ष्ण केलें त्यासी। घायें छेदिलें संशयासी। संकल्पविकल्पेंसी समूळ॥' ए. भा. ११-४३१). **रोवणें**—पुरणें, खुपसणें, घट्ट बसविणें, स्थिर करणें.—आत्मस्वरूपांत मन स्थिर करण्याकरितां साधक हा 'अहंग्रह' उपासना करतो. ध्येयस्वरूप जें ब्रह्म त्याच्याशीं जीवानें आपला अभेद करून चिंतन करणें याला 'अहंग्रह' ध्यान म्हणतात ('पैं ध्याता आपणचि परी। ध्यानरूप वृत्तिमाझारीं ध्येयत्वें घे हे अवधारीं। ध्यान रूढी गा॥' ज्ञा.-१८-१०३३). अशा अहंग्रह ध्यानानें साधकाचें मन आत्मस्वरूपांत (म्हणजेच ब्रह्मस्वरूपांत) स्थिर होतें ('तेथ ध्येय ध्यान ध्याता। ययां तिहीं एकरूपता। होय तंव पंडुसुता। कीजे तें गा॥' ज्ञा.-१८-१०३४), व साधक हा 'मी ब्रह्म आहें' अशा दृढ अपरोक्षानुभवावर येतो ('मी वासुदेव· तत्त्वता। कळों येईल विचारितां। आहे ठाउका सभाग्य संतां। नाहीं दुजा आणीक मागता गा॥४॥' तुका.-३४६; 'जगदाकारीं जाली सत्ता। वारोनी गेली पराधीनता। अवघें आपुलेंचि आतां। लाज आणि चिंता दुऱ्हावली॥३॥' तुका.-४७८; 'एकेचि ठायीं बैसला। परि सर्वत्र तोचि गेला। हें असो विश्व जाहला। आंगेंचि तो॥' ज्ञा.-४-१०२).

**ओवी ३५-अल्प**-लहान, थोडं.-मीठ जोंपर्यंत मीठरूपानें असतें तोंपर्यंत तें लहान व मर्यादित असतें. पण तेंच समुद्रांत टाकलें म्हणजे तें समुद्ररूप होऊन समुद्रायेवढें मोठें होतें ('तुका म्हणे लवणकळी। पडतां जळीं तें

होय ॥ ४ ॥' तुका.– २४६८ ). मग तें समुद्रांतून वेगळें काढतां येत नाहीं ('कां लवणाची कुंजरी । सूदलिया लवण सागरीं । होयचि ना माघारी । परती जैसी ॥' ज्ञा.–१५–३१८ ). शुद्ध पाण्यांत शुद्ध पाणी टाकलें असतां तें एकरूप होऊन जातें. ('यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति ॥ एवं मुनेर्विजानत आत्मा भवति गौतम ॥' कठ उप. २–१–१५ ) किंवा बर्फ व पाणी हीं ज्याप्रमाणें एकमेकांजवळ आली असतां एकरूप होतात त्याचप्रमाणें मन हें आत्म्याजवळ आलें असतां त्याच्याशीं तें तद्रूप होऊन जातें ('तें स्वलाभ लाभलेपणें । मन मनपणाही धरूं नेणें । शिवतलें जैसें लवणें । आपुलें निज ॥' ज्ञा.–१७–२३३ ). श्रीज्ञानेश्वरमहाराज प्रस्तुत ओवींत मीठ व समुद्राच्या दृष्टांतानें आत्मानुभवापूर्वीं साधकाचें मन किती संकोचित होतें व तदनंतर तें किती व्यापक होतें हें दर्शवितात.

**ओवी ३६—संल्कपोनि**-संकल्पापासून–संकल्प हेंच आहे मनाचें स्वरूप ('वायां मन हें नांव । एऱ्हवीं कल्पनाचि सावेव । जयाचेनि संगेजीव–। दशा वस्तु ॥' ज्ञा. १३-११० ). संकल्प नाहींसा झाला कीं जीव ब्रह्मरूप होतो ('जैसा किडाळाचा दोपु जाये । तरी पंधरें तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्प लोपीं ॥' ज्ञा.–६–८२ ). ज्याप्रमाणें पुत्रशोकानें बाप हा निर्बल होतो त्याचप्रमाणें संकल्पाचा पुत्र जो काम (म्ह. विषयवासना), तो नाहींसा केल्यानें संकल्प नाहींसा होतो ('परि तोचि योगु बापा । एके परी आहे सोपा । जरी पुत्रशोकु संकल्पा । दाखविजे ॥' हा विषयांतें निमालिया आइके । इंद्रियें नेमाचिया धारणीं देखे । तरी हिये घालूनि मुके । जीवितासी ॥' ज्ञा.–६–३७५–३७६ ; 'तया स्वांतःकरणजिता । सकळकामोपशांता । परामात्मा परौता । दूर नाहीं ॥' ज्ञा.–६–८१ ). हिणकस सोन्याचें शुद्ध सोनें करणें ह्याचा अर्थ त्या सोन्यांत जी विजायतीय हिणकस धातु मिसळलेली असते ती धातु सोन्याला अग्नीची आंच देऊन जाळणें असा आहे ('सांगे पितळेची गंधिकाळिक । जैं फिटली होय निःशेख । तैं सुवर्ण काई आणिक । जोडूं जाईजे ॥' ज्ञा.–४–६४ ). त्याचप्रमाणें जीवानें ब्रह्मरूप होणें ह्याचा अर्थ संकल्पाचा नाश करणें हा होय. हा संकल्प नाहींसा होण्याकरतां प्रस्तुत साधकानें आपलें मन 'गुरुवाक्यानें धुतलें'. याचा परिणाम असा झाला कीं, पूर्वीं त्याचें जें मन बहिर्मुख होतें ('काय करूं आता या मना ।

न संडी विषयवासना । प्रार्थिताही राहेना । आदरें पतना नेऊं पाहे ॥ १ ॥' तुका.–१५३४; ' बहुत चंचल चपल । जातां येतां न लगे वेळ ॥ ४ ॥ ' तुका.– १५३६; ' जें बुद्धीतें सळी । निश्चयातें टाळी । धैर्येसी हातफळी । मिळऊनि जाय ॥' ज्ञा.–६–४१४; ' संकल्पें सृष्टी घडी । सवेंचि विकल्पूनि मोडी । मनोरथांच्या उतरंडी । उतरी रची ॥ ' ज्ञा. १३–११४ ) तें अंतर्मुख झालें व आत्मस्वरूपांत तद्रूप होऊन गेलें (' परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियातें आपण देखे । देखतखेंवो वोळखे । म्हणे तत्त्व तें मी ॥ तिये ओळखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे । चित्तपण समरसें । विरोनि जाय ॥ ' ज्ञा.–६–३६६–३६७ ). **तेणें एकदेशियें**—त्यानें मर्यादित, देश व्यापणाऱ्यानें.–संकल्प नाहींसा झाल्यानंतर तो जरी शरीरदृष्ट्या परिच्छिन्न दिसत असला तरी अनुभवाच्या दृष्टीनें तो ब्रह्माएवढा व्यापक होतो, म्हणजे जेवढा परमात्मा तेवढा तो आपल्याला समजतो (' अगा हे जेव्हडी माझी व्याप्ति । तेवढीचि तयांचि प्रतीती । ऐसे बहुधाकारी वर्तती । बहुचि होउनी ॥ ' ज्ञा.–९–२५८; ' सुपात्रीं सर्व भाव । मी तो सर्व वासुदेव । जाणती कृपाळु संत महानुभाव । जया भिन्न भेद नाहीं ठाव गा ॥ ५ ॥ ' तुका.–३४५ ).

**ओवी ३७—आतां**—यापुढें, यानंतर (संकल्पनाशानंतर). **खुंटलें**—थांबलें, बंद पडलें.—त्याच्या ठिकाणीं कर्ता, कर्म व कार्य या त्रिपुटीचा व्यवहार थांबला. कर्ता होण्याकरतां प्रथमतः अंतःकरणात संकल्प स्फुरावा लागतो व संकल्प उत्पन्न होण्याकरतां द्वैत लागतें. आत्मा हा ज्या वेळीं अज्ञानाला वश होतो व शरिराशीं तादात्म्य करतो तेव्हांच त्याला विषय हे त्याच्याहून वेगळे प्रतीत होतात. नंतर त्याच्या ठिकाणीं संकल्प व इच्छा उत्पन्न होतात (' जैं अहंकारतनूसी । वालभ पडिलें ॥ तैं इच्छा हे कुमारी झाली ॥ ' ज्ञा.–७–१६५–१६६ ) व कर्ता, कर्म व कार्य असा त्रिपुटीचा व्यवहार होतो. ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं अज्ञान, तत्कार्य देहाहंकार व द्वैत हीं समूळ नष्ट झालेलीं असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कर्ता, कर्म व कार्य ही त्रिपुटी शिल्लक राहत नाहीं. (' तैसी अबोधाचिये कुशी । कर्म कर्ता कार्य ऐशी । त्रिपुटी असे ते जैसी । गाभिणी मारिली ॥ '; ' तैसेचि अबोध नाशासवें । नाशे क्रियाजात आघवें । ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ॥ ' ज्ञा.– १८–९७१–७२ ). **स्वभावें**—साहजिकपणें, आपोआप. —तो कर्म

टाकीत नाहीं तर त्याचें कर्म आपोआप थांबतें. ‘ मी कर्म टाकीन ’ हें म्हणणें वेडेपणाचें आहे ( ‘ न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः । ’ गीता–१८–११ ). कारण जोंपर्यंत शरीर आहे तोंपर्यंत कर्म हें होत राहणारच. आत्मज्ञानानें अज्ञानासह कर्मांचा नाश होतो ( ‘ तेणें आत्मबोधें तैसें । अविद्येशी कर्म नाशे । पार्था त्यजिजे जैं ऐसें । तैं त्यजिलें होय ।। ’ ज्ञा.–१८–२२९ ). **अकर्ता**—न करणारा. —त्याच्या हातून वाटेल तेवढें जरी कर्म घडलें तरी तो अकर्ताच ठरतो ( ‘ आणि तया करणेयाआंतु । घडो तिहीं लोकांघातु । परी तेणें केला हे मातु । बोलोंचि नये ।। ’ ज्ञा. १८–४४८). याचें कारण कर्म हें त्याला त्याच्याहून वेगळें असें प्रतीतच होत नाहीं ( ‘ हें असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवांचूनि नाहीं । आतां कवण तें कर्म कायी । बाधी तयातें ।। ’ ज्ञा. ४–११२ ). शिवाय, संकल्पविरहित होणारीं कर्में हीं कर्मांत मोडलीं जात नाहींत ( ‘ ब्रह्मस्वरूपाचीं कर्में ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ।। ’ तुका.–३७६८ ).

**ओवी ३८— देहीं**–देहांत, देहाचे ठिकाणीं. **आठऊ**—आठवण, जाणीव– ‘ मी देह आहें ’ अशी त्याच्या ठिकाणीं जाणीव नसते. ( ‘ आणि मी तूं हे भाष नेणें । माझें कांहींचि न म्हणे । सुखदुःख जाणणें । नाहीं जया ।। ’ ज्ञा. १२–१४९ ; ‘ तुका म्हणे मी हें माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधूजन ।। तुका–३७८७ ; ‘ मी तूं पण जाऊं दे दूरी । येकाचि घोंगडें पांघरूं हरी ।। ’ ज्ञा. गा. १७० ). प्रत्येकाला शरिराचें दोन प्रकारचें ज्ञान असतें ; कधीं तो शरिराला ‘ मी ’ म्हणतो व कधीं ‘ माझें ’ शरीर असें म्हणतो. उदाहरणार्थ, ‘ मी आंधळा झालों ’ किंवा ‘ माझे डोळे गेले ’. परंतु याच्या ठिकाणीं ‘ मी ’ हेंच स्फुरण नसतें मग ‘ माझें ’ हें स्फुरण कोठून असणार ? त्याच्या बोधामध्यें ब्रह्मांडाची आटणी झाल्यामुळें त्याच्या ठिकाणीं ‘ मी देह ’ अशी परिछिन्न अहंता शिल्लक राहत नाहीं. ‘ दृश्य ’ जर असेल तर त्याच्या सापेक्ष ‘ द्रष्टा ’ असतो. जसें, ‘ बायको ’ असेल तर तिच्या सापेक्ष ‘ नवरेपणा ’ असतो. तद्वतच ‘ तूं ’ च्या सापेक्ष ‘ मी ’ असतें. जेथें द्वैत असतें त्या ठिकाणीं ‘ तूं , मी ’ ही भाषा संभवते व तेथेंच ‘ मी व माझें ’ स्फुरण असतें. परंतु सर्वच ठिकाणीं, मीच मी ओतप्रोत भरलेला आहे अशा व्यापक अनुभवावर ज्ञानी पुरुष आला असल्यामुळें त्याच्या

ठिकाणीं द्वैतात स्फुरणारें ' मीपण ' नसतें. देहाशीं तादात्म्य घेणारें जें मन तें मनही त्या पुरुषाचें, आत्मसुखांत निमग्न झालें असल्यामुळें त्याला देहाची वार्ताहि नसते. ( ' कां शस्त्रवरी तोडिलिया । देह अग्निमाजीं पडलिया । चित्त महासुखीं पहूडलिया । चेवोचि नये ॥ ' ज्ञा. ६–३७० ; ' असों ऐसा कोठें आठवही नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥ ' तुका.— ३५५२ ; ' आतां उभयां उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गहन कवण तयाचें । म्हणोनि प्रतीतीच्चिये पोटींचें । पाणी न हाले ॥ ' ज्ञा. ८–६३ ; ' देहं च नश्वरमवस्थितमुत्थितं वा सिद्धो न पश्यति यतोऽध्यगमत्स्वरूपम् । दैवादपेत-मुतदैववशादुपेतं वासो यथा परिकृतं मदिरामदांधः ॥ ' ए. भा. १३, श्लोक ३६ ; ' हा ठायवरी । नेहटोनि ठेला अंतरीं । आतां काय वर्ते शरीरीं । हेंही नेणे ॥ ' ज्ञा. १४–३११ ). **कर्तृत्व**–कर्तेपणा–कर्म हें नेहमीं परिच्छिन्न वस्तूच्या ठिकाणीं संभवतें. व्यापकाच्या ठिकाणीं संभवत नाहीं. जसें आकाशाच्या ठिकाणीं कोण-तीही क्रिया नसते. ज्ञानी पुरुष ' मी ब्रह्म आहें ' अशा व्यापक अनुभवावर आला असल्याकारणानें त्याला कर्म हें त्याच्याहून वेगळें दिसत नाहीं ; मग त्याच्या ठिकाणीं कर्तृत्व कोठून येणार ? ( ' तैसे जें तेणें करावें । तो तोंचि आहे स्वभावें । मा कोणें कर्मी वेष्टावें । कर्तेपणें ॥ ' ज्ञा. १८–४२० ' आणि कर्तव्यते-लागीं । जया दुसरें नाहीं जगीं । ऐसिया नैष्कर्म्यता तरी चांगी । बोधला असे ॥ ' ज्ञा. ४–९४ ). आपण ' देहातीत ' आहोत हा बोध त्याच्या ठिकाणीं इतका स्वच्छ असतो कीं, त्याच्या देहादि संघाताकडून जरी अनेक क्रिया होत असल्या तरी त्याचें कर्तृत्व तो आपणांकडे घेत नाहीं ( ' तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी । देहीं नाचविती चागडीं । तो पाहोंही न धाडी । अहंतेतें ' ॥ ज्ञा. १४–३१० ). ज्ञात्याचीं कर्में आभासात्मक असतात.

**ओवी ३९—अमूर्ताचे**–अव्यक्त ( निर्गुण ) परमात्म्याचे. **गुण**–धर्म.— परमात्मा हा गुणातीत आहे ( ' हा गुणत्रयारहितु । व्यक्तीसी अतीतु । अनादि अविकृतु । सर्व रूप ॥ ' ज्ञा. २–१५० ; ' तैसीं गुण इंद्रियें फुडीं । नाहीं तेथ ॥ ' ज्ञा. १३–९०० ; ' जेथें नाहीं गुणागुण । नाहीं कार्यासी कारण । तो तूं गुणीं गुणातीत । परिपूर्णरे ॥ ' नाथ.–३१४४ ). त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुष हाही गुणातीत असतो ( ' सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ ' गीता १४–श्लोक २५ ). परमात्मा हा उत्पत्तिविनाशरहित आहे ( ' सृष्टीचा

होणा न रचे । सर्वसंहारें न वेंचे । आथी नाथी या दोहींचें । पंचत्व तो ॥' ज्ञा. १३-१११२ ). ज्ञानी पुरुषाचा अनुभवही तसाच असतो ('तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते। स्वयंभू आइते केले नव्हों।' तुका-१८९१ 'म्हणोनि जन्मक्षयां-। अतीत ते धनंजया। मी जाले ज्ञाना इया। अनुसरोनि॥' ज्ञा.१४-५९ ). परमात्मा हा अकर्ता आहे ('न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः।' गीता ५-१४; 'जैसा कां सर्वेश्वरु। पाहिजे तंव निर्व्यापारु। परि तोचि रची विस्तारु। त्रिभुवनाचा ॥' ज्ञा. ५-७६ ). त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुषही आपल्याला अकर्ता समजतो ('जो सकल कर्मी वर्ततां। देखे आपुली नैष्कर्म्यता॥' ज्ञा. ४-९३ ). परमात्मा जसा व्यापक आहे, तसा तोही आपल्याला व्यापक समजतो ('अगा हे जेवढी माझी व्याप्ति। तेव्हढीचि तयांचि प्रतीती।' ज्ञा. ९-२५८ ). परमात्मा हा सत्-चिद्-आनंदरूप आहे. ज्ञानी पुरुषाचाही अनुभव तसाच असतो ('मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु। मीचि एकु स्वतःसिद्धु। जो आपणेनसीं भेदु। नेणोनि जाणें ॥' ज्ञा. -१५-५६२ ). तात्पर्य, ज्ञानी पुरुष हा देहधारी असतांनाच अमूर्त परमात्म्याच्या योग्यतेला आलेला असतो ('तो देहसंगें तरी असे। परि चैतन्यासारिखा दिसे। पाहतां परब्रह्माचेनि कसें। चोखाळु भला ॥' ज्ञा.४-११५ ). 'तो चालतें ज्ञानाचें बिंब। तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ। येर माणुसपण तें भांब। लौकिक भागु ॥' ज्ञा. १०-७७; 'तुकितां तुळणेसी। ब्रह्म तुकासी आलें ॥' आरती. 'तेवीं आम्हां तयां परस्परें। बाहेरी नामाचींचि अंतरें। वांचूनि आतुवट वस्तुविचारें। मी तेंचि ते।' ज्ञा. ९-४११ ).

**ओवी ४०—अशेषीं व्यापारीं**—सर्व व्यवहारांत.--बोधसंपन्न पुरुषाची देहाहंता जरी नष्ट झालेली असली तरी आत्मज्ञान झाल्याबरोबर प्रारब्ध-कर्म संपत नसल्यामुळें त्याच्या देहादिसंघांताकडून प्रारब्धकर्मानुसार कर्मे घडतच राहतें. परंतु त्याचा बोध असा असतो कीं, मी कांहींच करीत नाहीं ('पैं तेथूनि मग पाहातां। म्हणे साक्षी मी अकर्ता। हे गुणचि क्रिया जातां। नियोजना॥' ज्ञा.—१४-२९३; 'देखोनी न देखे प्रपंच हा दृष्टी। स्वप्नींचिया सृष्टि चेविल्या जेवीं॥' तुका.—३४६३ ). पूर्वसंस्कारानुसार ज्ञात्या पुरुषाकडून लोकसंग्रहार्थ कर्मेंही घडतात, परंतु तो त्या कर्मांची अहंकृति आपणांकडे घेत नाहीं. ('परि हें मियां केलें। कीं हें माझेनि सिद्धी गेलें।

ऐसें नाहीं ठेविलें। वासनेमाजीं।" ज्ञा.—१३-५२६; 'तुका म्हणे आम्ही या जनाविरहित। होउनि निश्चित क्रीडा करूं॥' तुका.-१९२०; 'जन करी तैसा खेळतील खेळ। अवघा गोपाळ करुनिया॥' तुका.-२४).

**ओवी ४१— पाहे**-पाहतो.-**सर्वथा नोहे**—मुळींच नसतो.—त्याच्या इंद्रियांकडून सर्व व्यापार होतात, परंतु तो त्यांचें तादात्म्य घेत नाहीं ('ऐकोनी नाईके निंदास्तुति कानीं। जैसा कां उन्मनी योगीराज॥' तुका.-३४८३), म्हणून तो कर्मांनीं बद्ध होत नाहीं; जसा सूर्य आपल्या किरणरूपी हातांनीं जगांतील सर्व वस्तूंना स्पर्श करतो, परंतु त्यांनीं तो लिप्त होत नाहीं ('जैसा सूर्य आकाशगतु। रश्मिकरीं जगातें स्पर्शतु। तरी संगदोषें काय लिंपतु। तेथिचेनि॥' ज्ञा.-२-३३३; 'साक्षित्वें या झालों गुणाचा देखणा। करीं नारायणा तरी खरें। तुका.-३४९९). अज्ञानी पुरुष शरिराकडून होणाऱ्या कर्मांचें तादात्म्य घेतात म्हणून ते कर्मपाशांनीं बांधले जातात ('तैसीं शुभाशुभें कर्मे। जियें निफजती प्रकृतिधर्में। तियें मूर्ख मतिभ्रमें। मी कर्ता म्हणे॥' ज्ञा.-३-१७८).

**ओवी ४२—अवसरोचित**-समयोचित.—ज्ञानी झाला म्हणजे त्याच्या इंद्रियांचें ज्ञान नाहींसें होतें असें नाहीं. तो इतर लोकांप्रमाणें सर्व व्यवहार करतो व बोलण्याचा प्रसंग आला असतां समयोचितही बोलतो. परंतु त्या सर्व व्यवहारांमध्यें तो आसक्त होऊन राहत नाहीं ('साच लटिकें दोन्ही। बोलोनि न बोले जाहला मौनी। जे भोगितां उन्मनी। आरायेना॥' ज्ञा. १२-२०९; 'लटिका तुका लटिक्या भावें। लटिकें बोले लटिक्यासवें॥' तुका.-३६१०).

**ओवी ४३-परिहरी**—टाकतो, त्याग करतो.-ज्ञानी झाला म्हणजे त्यास जेवावयास लागत नाहीं असें नाहीं, किंवा तो अन्नाच्याऐवजीं कडबा किंवा गवत खातो असें नाहीं, तर योग्य वेळीं योग्य आहार घेतो.

**ओवी ४४-इच्छावशें**—इच्छेनुसार—इतर लोकांप्रमाणें तोही खांद्यावर पताक घेऊन पंढरपूरला जातांना दिसेल ('माझे जिवींची आवडी। पंढरपुरा नेईन गुढी॥' ज्ञा. गा.-४०१).

**ओवी ४५-निमिषोन्निमिष**—डोळ्याच्या पापण्या मिटणें व उघडणें.

**ओवी ४६—प्रतीति**–अनुभव. —ज्ञानी पुरुष सर्व कर्मे करतो व इतर लोकही सर्व कर्मे करतात; परंतु ज्ञात्याच्या ठिकाणीं मी कर्माचा कर्ता आहें असा अहंकार नसतो व इतरांच्या ठिकाणीं तो असतो. ज्ञानी पुरुष कर्माला कारण देहादिसंघात आहे, आत्म्याचा व कर्माचा मुळींच संबंध नाहीं, असें जाणतो ( ‘ येर आत्मतत्त्व उदासीन । तें ना हेतु ना उपादान । ना तें अंगें करी संवाहन । कार्यसिद्धीचें ॥ ’ ज्ञा.–१८–३०६ ). म्हणून शरिराच्या दृष्टीनें त्याच्याकडून जरी सर्व क्रिया होत असलेल्या दिसल्या तरी त्याच्या अनुभवाच्या दृष्टीनें तो कांहींच करीत नाहीं. ज्या आत्मरूपी अग्नीमध्यें सर्व पापपुण्यात्मक कर्मे जळतात असा आत्मरूपी अग्नि ‘ मी आहें ’ अशा अनुभवावर तो आलेला असतो ( ‘ सर्वारंभा उटकलें । प्रवृत्तीचें तेथ मावळलें । जळती गा कर्मफळें । ते तो आगी ॥ ’ ज्ञा.–१४–३६६ ); ‘ तुका म्हणे आम्ही जालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य अंगा ॥ ’ तुका–३५५२ ).

**ओवी ४७—भ्रांति**—भ्रम, अज्ञान. **सेजे**–शय्येवर, अंथरुणावर, **भ्रांति-सेजे सुतला**—अज्ञानरूप अंथरुणावर निजला.—मनुष्य हा जेव्हां अंथरुणावर किंवा जमीनीवर पडतो त्या वेळींच त्याला गाढ निद्रा लागत असते. झोंप ही दोन कार्यं करीत असते. मनुष्याला आपल्या जागृतींतील स्वरूपाचा ‘ विसर ’ पाडते ( म्ह. ‘ मी अमुक एक नांवाचा गृहस्थ आहें व अमक्या ठिकाणीं निजलों आहें ’ इत्यादि गोष्टीचा विसर पाडते ) व त्याच्या ठिकाणीं मुळांत नसलेलें असें विचित्र ‘ स्वप्न ’ पाडते. अशा ‘ विसराला ’ व ‘ स्वप्नाला ’ शास्त्रीय भाषेंत ‘ आवरण ’ व ‘ विक्षेप ’ म्हणतात. ज्याप्रमाणें झोंपेच्या आवरण व विक्षेप अशा दोन शक्ति आहेत त्याचप्रमाणें अज्ञानाच्याही आवारण व विक्षेप अशा दोन शक्ति आहेत. ज्या स्थितींत यथार्थ स्वरूपाचें ( म्ह. आत्मस्वरूपाचें ) भान नसतें व विपरीत देहादिकांचेंही भान नसतें अशी जी स्फुरणरहित स्थिति त्याला अज्ञान म्हणतात ( ‘तेवीं वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे । परी कांहीं अनारिसें । देखिजेना ॥ ’ ‘ ऐसी कोणी एकी दशा । तिये वादु अज्ञान ऐसा ॥ ’ ज्ञा.–१४–७७,७९ ). ज्या वेळेस जीवात्मा हा अज्ञानरूपी शय्येवर निजतो ( म्ह. ज्या वेळेस जीवात्म्याला अज्ञानरूपी गाढ निद्रा लागते म्हणजे त्याच्या ठिकाणीं अज्ञान बळावतें ) त्या

वेळेस त्याला आपल्या मूळच्या स्वरूपाचा ( म्ह. आत्मस्वरूपाचा ) विसर पडतो. असा विसर पडणें हें अज्ञानाच्या आवारणशक्तीचें कार्य आहे. जीवाला आपल्या स्वरूपाचें ( म्ह. आत्मस्वरूपाचें ) यथार्थरूपेंकरून ( म्ह. सच्चिदानंदरूपेंकरून ) भान होऊं न देण्यास जें कारण त्याला आवरण म्हणतात ( ' आपला आपणपेयां । विसरू जो धनंजया । तेंचि रूप यया । अज्ञानासी ॥ ' ज्ञा.–१४–७१ ). असा आत्मस्वरूपाचा विसर पडल्यानंतर जीवात्म्याच्या ठिकाणीं प्रथमतः ' मी ब्रह्म आहें का शरीर आहें ' असा भ्रम अथवा संशय उत्पन्न होतो, परंतु या संशयाच्या मागें अज्ञानाचा जोर असल्यामुळें जीवात्मा हा सरतेशेवटीं आत्मस्वरूपाहून विलक्षण असें जें शरीर, तें शरीरच मी आहें असा निश्चय करतो व शरिराशीं तादात्म्य घेऊन अनंत दुःखें भोगतो ( ' तैं अज्ञान एक रूढे । तेणें कोहंविकल्पाचें मांडे । मग विवरूनि कीजे फुडें । देहो मी ऐसें ॥ ' ज्ञा.–१५–३४२; ' शुद्धीं अहंकार अळुमाळ । उठतां, शुद्धासि करी शबळ । तेणें देहयोगें धरिल्या बळ । करी तत्काळ विपरीत ॥ '; ' अहंकार खवळल्या जाण । करी आनंदाचें आवरण । बुडे परमात्मस्फूर्तीचें स्फुरण । देहाचें मीपण वाढवी ॥ '; ' तेणें कर्माकर्मांचे आघात । नाना नरकयातना होत । जन्ममरणादि आवर्त । तेणें दुःखी होत अति दुःखें ॥ ए. भा.—१३–४३२–३३–३७ ). अशा प्रकारें जीवात्म्यानें स्थूल व सूक्ष्म शरिरांशीं तादात्म्य करून मी कर्ता, भोक्ता, जन्मणारा, मरणारा, सुखी, दुःखी वगैरे आपणास समजणें व त्याला जगताची प्रतीति होणें ह्याला शास्त्रीय भाषेंत ' विक्षेप ' म्हणतात. प्रस्तुत ओवीमध्यें अशा विक्षेपालाच ' स्वप्न ' असें संबोधिलें आहे.

स्वस्वरूपाच्या ( म्ह. आत्मस्वरूपाच्या ) विस्मृतीच्या रूपानें असणाऱ्या आवरणात्मक अज्ञानांशास ' कारणरूप अज्ञान ' किंवा ' कारणाध्यास ' म्हणतात व देह मी व देहसंबंधी माझें व जगताच्या प्रतीतिरूपानें असणाऱ्या विक्षेपात्मक अज्ञानांशास ' कार्यरूप अज्ञान ' अथवा ' कार्याध्यास ' म्हणतात. प्रस्तुत ओवीमध्यें ' भ्रांतिसेज ' याचा अर्थ ' कारणाध्यास ' आहे व ' स्वप्न ' याचा अर्थ ' कार्याध्यास ' आहे. अशा प्रकारची अज्ञानरूप निद्रा जीवाला आजकालची लागलेली नसून ती अनादिकालापासून लागलेली आहे व हें विश्वरूपी स्वप्नही तो अनादि कालापासून भोगीत आहे ( 'तरी अविद्येचिया निद्रा ।

विश्वस्वप्नाचा हा धांदा। भोगीत होता प्रबुद्धा। अनादि जो ॥' ज्ञा.१८-४०३; 'पैं व्यामोहाचिया शेजे। बळिया अविद्या निद्रित होईजे। ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे। जन्ममृत्यूंचा ॥' ज्ञा.-६-६८ ). **भुतला**-भुल्ला, घेरला, अनुभव घेता झाला.-अज्ञानामुळें जीव हा आपल्या आत्मस्वरूपाला विसरतो व शरिराशीं तादात्म्य करून शब्दादि *पंचविषयांकडे सुखाकरतां धांव घेतो ( 'जैसें स्वप्नीं परिव्राजें। आपणपेयां आपण कुटुंब होईजे । मग तयाचेनि धाविजे। मोहें सैरा ॥'; 'तैसा आपलिया विस्मृती। आत्मा आपणचि प्रकृती-। सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ॥' ज्ञा.-१५-३५३-३५४) व स्वतः सुखरूप असतांना अल्प अशा विषयसुखानें आपणास सुखी मानूं लागतो, जसें एखाद्या राजानें स्वप्नांत भिकारी व्हावें व दोन मुठी भिक्षा मिळाल्यानें आपणास कृतकृत्य मानावें ('राजा चक्रवर्ती निजमंदिरीं। निजेला सुमन शेजेवरी। तो स्वप्नीं होऊनि भिकारी। अंत्यजा घरीं अन्न मागे ॥'; 'तेथ कुटका एक यावया हाता । नीचासि म्हणे राजा रे तूं तत्त्वता। परी "मी राजा" हें नाठवे चित्तां। स्वप्नीं भिक्षुकता दृढ झाली ॥'; 'तैसी विसरोनि निजात्मता। फळें मागे देवां देवतां। मी देवांचा देवो तत्त्वतां। हें त्या सर्वथा नाठवे ॥" ए. भा.-१०-३०९ तें ३११ ). **चेइला** जागा झाला. — स्वप्न नाहींसें होण्याचा खरा उपाय म्हणजे मनुष्याला कायम जागृत ठेवणें हा होय. जप करणें किंवा मंतरलेला ताईत जवळ ठेवणें हा नव्हे ( 'म्हणोनि स्वप्नींचिया घाया। ओखद चेवोचि धनंजया। तेवीं अज्ञानमूळा यया। ज्ञानचि खड्ग ॥' ज्ञा.— १५-२५४ ). त्याचप्रमाणें अज्ञानरूपी निद्रा व विश्वरूपी स्वप्न नाहींसें होण्याचा खरा उपाय म्हणजे आत्मज्ञानरूपी जागृति नित्य प्राप्त होणें हा होय; केवळ कर्मानें या भ्रांतिरूप संसाराची निवृत्ति होत नाहीं ( 'आपुलिया अज्ञानासाठीं। नव्हता थांवला किरीटी । तरी आतां आत्मज्ञानाच्या लोटीं। खांडोनि गा ॥'; 'वांचूनि ज्ञानेंवीण एकें। उपाय करिसी जितुकें। तिहीं गुंफसि अधिकें। रुखीं इये ॥' ज्ञा.—१५-२४८-४९ ). जीवाला अज्ञानरूपी गाढ निद्रा अनादि कालापासून लागलेली असून त्या निद्रेच्या भरांत 'मी सुखी, मी दुःखी' इत्यादि म्हणण्याच्या रूपानें तो घोरत आहे व 'मी व माझें' अशा शब्दांच्या बडबडीनें तो मोठ्यानें बरळतही आहे ('पाठीं तिये निद्रेचेनि भरें;

मी सुखी दुःखी म्हणत घोरें । अहंममतेचेनि थोरें । वोसणाये सादें ॥ '; ' हा जनकु हे माता । हा मी गौर हीन पुरता । पुत्र वित्त कांता । माझें हें ना ॥ ' ज्ञा.—१५–४९१–९२ ). परंतु अशा गाढ निद्रेंतून जीव हा केव्हां तरी जागा होतोच. कारण जागृतीवर येणें हा जीवाचा स्वभाव आहे. ह्या अज्ञानरूपी झोंपेंतून जीव हा क्वचित् प्रसंगीं स्वतःच्या प्रयत्नानें व कर्तबगारीनें जागा होतो ( ' श्रद्धावाल्लँभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः । ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ' गीता–४–३९ ; ' उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् । ' गीता–६–५ ; ' पैं व्यामोहाचिया शेजे । बळिया अविद्या निद्रित होईजे । ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूंचा ॥ ', ' पाठीं अवसांत ये चेवो । तैं तें अवघेंचि होय वावो । ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोहि आपणपांचि ॥ ' ज्ञा.–६–६८–६९ ); परंतु बहुधा श्रीगुरुच आत्मानात्मविवेक व ' तत्त्वमसि ' या महावाक्याचा उपदेश करून त्याला आत्मैक्यबोधाच्या ज्ञानरूपी जागृतीवर आणतात ( ' बाबा अहंकार निशीं घनदाट । गुरुवचनी फुटली पहाट । माता भक्ति भेटली बरवंट । तिनें मार्ग दाविला चोखट गा ॥ ' नामा–२२२५ ' तो महावाक्याचेनि नांवें । गुरुकृपेचेनि थांवें । माथां हातु ठेविला नव्हे । थापटिला जैसा ॥ ' ज्ञा.–१८–४०४ ; तेथें दैवयोगें गडबडितु । अवचटें गुरुचरणीं आदळतु । निकटता देखोनि कृपावंतु । थापटितु निजबोधें ॥ ' ' ब्रह्माहमस्मी वचनी वाणी । एक वेळ पडली कानीं । अविद्यानिद्रा गेली पळोनी । तो तत्क्षणीं जागिन्नला ॥ ' ए. भा.–१०–३१८–१९ ). जो स्वतः जागा असतो तोच दुसऱ्याला जागा करूं शकतो. गुरु हे सदा आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं जागे असल्यामुळें ( ' या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ॥ गीता–२–६९ ) ते शिष्याला अविद्यारूपी निद्रेंतून आत्मबोधरूपी जागृतीवर आणूं शकतात ( ' काय सांगों आतां संताचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ ' तुका.–१९४८ ). झोंपाळूंत दोन वर्ग असतात. कांहीं लोकांची झोंप सावध असते. त्यांना एक हांक मारल्याबरोबर ते जागे होतात व कांहीं फार झोंपाळू असतात. त्यांना जागे होण्याकरितां पुष्कळ हांका माराव्या लागतात. तसेंच आत्मज्ञानाच्या अधिकाऱ्यांतही दोन वर्ग आहेत. जो तीव्र अधिकारी असतो तो गुरूच्या मुखांतून ' तत्त्वमसि ' हें महावाक्य ऐकल्याबरोबर ' मी ब्रह्म आहें ' अशा आत्मज्ञानरूपी जागृतीवर येतो ( ' तैसें जया कोण्हासि दैवें । गुरुवाक्य श्रवणा-

च्चि सर्वे । द्वैत गिळोनि विसंबें । आपणया वृत्ती ॥ '; ' कानावचनाचिये भेटी-। सरिसाचि पैं किरीटी । वस्तु होऊन उठी । कवणि एकु जो ॥ ' ज्ञा-१८-९८८-८९; तुका म्हणे कानीं ऐकिली मात । तोचि झाला घात जीवपणा ॥ ' तुका.-३६२५ ). परंतु जो मंद अधिकारी असतो त्याला गुरूनें सांगितलेल्या ' तत्त्वमसि ' महावाक्यार्थाचें मनन व निदिध्यासन करावें लागतें व नंतर तो ' मी ब्रह्म आहें ' अशा अद्वैत अनुभवावर येतो. **म्हणोनियां**—म्हणून.— अशा प्रकारें अज्ञानरूपी निद्रेंतून व द्वैतरूपी स्वप्नांतून जो ' मी अद्वयानंदरूप ब्रह्म आहें ' अशा आत्मानुभवरूपी जागृतीवर येतो ( ' तैसा विश्वस्वप्नेंसीं माया। नीद सांडूनि धनंजया । सहसा चेइला अद्वया-। नंदपणें जो ॥ ' ज्ञा.-१८-४०५ ), त्याच्या ठिकाणीं ' मी कर्माचा कर्ता आहें ' अशी अहंता राहत नाहीं.

**ओवी ४८-अधिष्ठान**—ब्रह्म चैतन्य—' आधार ' व ' अधिष्ठान " हे वेदांत-शास्त्रांतील पारिभाषिक शब्द आहेत. ब्रह्मचैतन्याचे ' सामान्यचैतन्य ' व ' विशेष-चैतन्य ' असे दोन भेद आहेत. सर्वव्यापक जें चैतन्य त्याला सामान्यचैतन्य म्हणतात व ' अहं ब्रह्मास्मि ' या वृत्तींत प्रतिबिंबित झालेलें जें चैतन्य त्याला ' विशेषचैतन्य ' म्हणतात. ' सामान्य-चैतन्यास ' ' आधार ' म्हणतात व ' विशेषचैतन्यास ' ' अधिष्ठान ' म्हणतात. ब्रह्मानुभव प्राप्त होण्यापूर्वी ' सामान्यचैतन्य ' ' आधार ' रूपानें असतें, परंतु ब्रह्मानुभव प्राप्त झाल्यानंतर तेंच चैतन्य विशेषत्वाला येतें व त्यालाच ' अधिष्ठान ' असें नांव प्राप्त होतें. आत्मा हा ' सत्, चित्, आनंदरूप ' असा आहे. त्यांपैकीं ' सत् ' रूप हें सामान्यरूप आहे. कारण ' मी आहें ' या रूपानें सर्वांना त्याची प्रतीति आहे व ' चित्, आनंद ' हें विशेषरूप आहे. कारण ' मी चिदानंदरूप ब्रह्म आहें ' अशी प्रतीति फक्त ज्ञानी पुरुषालाच असते. ' सत् ' रूपानें असणारें जें सामान्यचैतन्य तें अज्ञानाचें व संसारभ्रमाचें निवर्तक नसतें, परंतु ' चित्, आनंद, कूटस्थ ', इत्यादि रूपानें असणारें जें विशेषचैतन्य तें अज्ञानाचें व संसारभ्रमाचें निवर्तक असतें; जसा काष्ठगत सामान्य अग्नि हा अंधकाराचा विरोधी नसतो, परंतु घर्षणानें प्रगट झालेला अग्नि हा अंधकाराचा विरोधी होतो. **संगती**-आश्रयानें. **आपुलालिया अर्थी**-आपापल्या विषयांच्या ठिकाणीं. प्रत्येक इंद्रियाचा विशिष्ट विषय ठरलेला असतो. ज्या भूताच्या सत्त्वगुणापासून जें

ज्ञानेंद्रिय उत्पन्न झालेलें असतें तें त्या भुताच्याच गुणाला जाणूं शकतें. उदाहरणार्थ, आकाशाच्या सत्त्वगुणापासून उत्पन्न झालेलें श्रोत्रेंद्रिय हें फक्त आकाशाचा गुण जो शब्द त्यालाच जाणूं शकतें. दुसऱ्या भूतांचे जे स्पर्शादि गुण आहेत त्यांना तें जाणूं शकत नाहीं ( 'जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार। येर मास पर हाता न कळे ॥' तुका.–२९८९ ; 'जिव्हां रसाकडे वोढी। तृषा प्राशनालागीं तोडी ॥' ए. भा.–९–३१५ ते ३१८ ). **वर्तत आहाती**—घडत असतात, होत असतात.— ज्ञान प्राप्त झालें कीं ज्ञात्याचे व्यवहार थांबतात असें नाहीं. कारण आत्मज्ञानाचा व प्रारब्धकर्माचा विरोध नाहीं. आत्मज्ञान जरी प्राप्त झालें तरी जोंपर्यंत शरीर आहे म्हणजेच जोंपर्यंत प्रस्तुत जन्माचें प्रारब्धकर्म शिल्लक आहे, तोंपर्यंत ज्ञात्याकडून पूर्वसंस्कारानुसार यथोचित सर्व कर्मे घडत राहतात ( 'ऐसेनि अहंकृतिभावो। जयाचा बोधीं जाहाला वावो। तऱ्ही देहा जंव निर्वाहो। तंव आथी कर्मे ॥' ज्ञा. १८–४२२ ). परंतु आत्मज्ञान प्राप्त होण्यापूर्वीचें इंद्रियाचें वावरणें व तदनंतरचें वावरणें यांत फरक असतो. मनुष्य हा जेव्हां कोणचीही वस्तु पाहतो, तेव्हां ती पाहण्याचे पूर्वी तो प्रथमतः प्रकाश पाहत असतो; परंतु त्याला आपण प्रकाश पाहतों याची जाणीव नसते. तद्वतच सर्व इंद्रियांचे व्यापार हे आत्मप्रकाशाच्या सत्तेवर चाललेले असतात, पण अज्ञानी पुरुषाला त्या सत्तेचें ज्ञान नसतें. म्हणून तो कर्मांचें कर्तृत्व आपणांकडे घेतो. ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं आत्मज्ञानाचा उदय झाला असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं आत्मसत्तेची जाणीव असते व म्हणून तो परमात्म्याच्याच सत्तेनें इंद्रियांचे व्यापार चालतात असें समजतो ( 'इंद्रियें देव इंद्रियवृत्ति। आत्मप्रभा प्रकाशती। 'यस्य भासा सर्वमिदं विभाति'। विश्वाची स्फूर्ति चित्सत्ता स्फुरे ॥'; 'इंद्रियें प्रकाशरूप होतीं। तरी प्रेतदेहीं प्रकाशती। इंद्रियें चित्सत्ता प्रकाशती। तो मी चिन्मूर्ती चिदात्मा ॥' हस्तामलक—१३८–३९ ). इंद्रियें, वाणी, मन इत्यादिकांचा प्रकाशक परमात्माच आहे ( 'यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते ॥' केन० उप. १, ४ ; 'ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ॥' गीता—१३–१७ ; 'जें मनाचें मन। जें नेत्राचे नयन। कानाचे कान। वाचेची वाचा ॥' ज्ञा.–१३–९२९ ). प्रत्येकाचें सर्व कर्म परमात्म्याच्याच सत्तेनें होतें व तें स्वभावतःच परमात्म्यालाच अर्पण होत असतें. परंतु अविवेकी पुरुष 'मीं कर्म केलें' असा वृथा

अभिमान घेतात व नंतर निष्कारण त्या कर्मांचें फल भोगीत बसतात ('आहे तें सकळ कृष्णासी अर्पण। न कळतां मन दुजें भावी॥' तुका.-३७७८). ज्ञानी पुरुष कर्मांचें कर्तृत्व आपणाकडे घेत नाहीं व चैतन्याच्या सत्तेनें सर्व कर्में होतात असें तो समजतो म्हणून त्याचे सर्व व्यापार 'अधिष्ठानसंगतीनें' होतात असें म्हटलें आहे.

ओवी ४९—**प्रकाशें**—प्रकाशानें, उजेडानें.—दिव्याच्या प्रकाशांत कोणी पोथी वाचीत बसला किंवा सोंगट्या खेळत बसला तर त्याचें कर्तृत्व दिवा आपणाकडे घेत नाहीं. एवढेंच नव्हे तर दिव्याला त्याच्या प्रकाशांत जो कर्म करणारा असतो त्याची जाणीवही नसते ('जैसा दीपु टेविला परिवरीं। कवणातें नियमी ना निवारी। आणि कवण कवणिये व्यापारीं। राहाटे तेंहि नेणें॥' ज्ञा. ९-१२८; 'कां घरिंचियां उजियेडु करावा। पारखियां आंधारु पाडावा। हें नेणेचि गा पांडवा। दीपु जैसा॥' ज्ञा.-१२-१९८). तसेंच सूर्याच्या प्रकाशांत लोक पापपुण्यात्मक कर्में करतात, परंतु त्यांचें भान सूर्याला नसतें व तो त्यांच्या कर्मांमुळेंही लिप्त होत नाहीं ('हेंही असो लोकांचिया। राहाटी होतां आघविया। कोण काम सवितया। आंगा आलें॥' ज्ञा. १८-३१२). केवळ दिव्याच्या अथवा सूर्याच्या सत्तेनें लोकांचे व्यवहार चालतात, परंतु त्या व्यवहारांचें कर्तृत्व त्यांच्याकडे येत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञाता हा आपल्या शरिरांत दिव्याप्रमाणें किंवा सूर्याप्रमाणें असतो; म्हणजे त्याच्या स्थूलसूक्ष्मसंघाताकडून सर्व कर्में घडत असतांना 'मी केवळ सत्तारूप असून सर्व कर्मांचा प्रकाशक आहें, माझा व कर्मांचा मुळींच संबंध नाहीं' असा त्याचा अनुभव असतो ('कां तारांगणीं लोपावें। सूर्यकांतीं उद्दीपावें। कमळीं विकासावें। जावें तमें॥' ये कोणाचीं काजीं कहीं। सविता जैसा नाहीं। तैसा अकर्ता मी देहीं। सत्तारूप॥' ज्ञा. १४-२९६-९७). यामुळें त्याच्या इंद्रियांकडून कर्में होत असतांनाही तो आपल्याला अकर्ता समजतो.

ओवी ५०—**सकळें**-सर्व.—तो सर्व कर्में करतो म्हणजे तो निषिद्धही कर्में करतो असा अर्थ नव्हे, तर तो शास्त्रानें सांगितलेलीं सर्व योग्य कर्में करतो असा त्याचा अर्थ आहे ('किंबहुना पुंसा। पांजरियामाजीं जैसा। वेदाज्ञेसी तैसा। बिहूनि असे॥' ज्ञा.-१३-५९८). **कर्मबंधा**-कर्मांच्या पाशाला.—कर्तृत्वमद व फलास्वाद हे कर्मांचे दोन पाश आहेत ('तैसा

कर्तृत्वाचा मदु। आणि कर्मफळाचा आस्वादु। या दोहींचें नांव बंधु। कर्माचा कीं॥' ज्ञा.–१८–२०५ ). जे पुरुष कर्मांचा अहंकार घेतात व कर्मफळाची आशा सोडीत नाहींत त्यांना कर्माचें फल जें जन्ममृत्यु, ते घ्यावे लागतात ('एऱ्हवीं तरी धनंजया। त्रिविधा कर्मफळा गा यया। समर्थ ते कीं भोगावया। जे न सांडितीचि आशा॥' ज्ञा.–१८–२३३; 'अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम्।' गीता–१८–१२ ). **नाकळे**–आकळला जात नाहीं. —बोधसंपन्न पुरुष कर्माचें कर्तृत्व व फलास्वाद हे दोन्ही आपणांकडे घेत नाहीं, जसा मोलानें तीर्थयात्रेला जाणारा पुरुष आपणाकडे यात्रेचें कर्तृत्व घेत नाहीं अथवा गुराखी हा राखणाऱ्या गाईच्या दुधाची इच्छा करीत नाहीं ('जो मोलें तीर्था जाये। तया मी यात्रा करितु आहें। ऐसिये श्लाघ्यतेचा नोहे। तोषु जीवीं॥' ज्ञा.–१८–१६७; सांडूनि दुधाची टकळी। गोंवारी गांवधेनु वेंटाळी। किंबहुना कर्मफळीं तैसें कीजे॥' ज्ञा.–१८–१७४ ). अशा हातवटीनें तो कर्में करून तीं ईश्वराला अर्पण करतो, म्हणून तो कर्माच्या पाशांनीं आकळला जात नाहीं, म्हणजे त्याला पुन्हा जन्मास यावें लागत नाहीं ('म्हणती तद्रूपा ब्रह्मा तया। फळेंसीं क्रिया इयां। तेचि होतु आम्हां भोगावया। काहींचि नुरो।' ज्ञा.–१७–३७१ ). **न सिंपे**–भिजत नाहीं, लिप्त होत नाहीं.—तो पुरुष ब्रह्मार्पणबुद्धीनें कर्में करतो हेंही म्हणणें त्याच्या बोधाच्या दृष्टीनें कमीपणाचें ठरतें, कारण कर्म ब्रह्मार्पण करण्यास त्याच्यावर आपलें थोडें तरी स्वामित्व मानावें लागतें. परंतु या पुरुषाच्या बोधांत कर्ता, कर्म व क्रिया ह्या त्रिपुटीची आटणी झाली असल्याकारणानें कर्मावर स्वामित्व सांगण्यापुरताही तो कर्माहून वेगळा शिल्लक राहत नाहीं, मग त्याच्या ठिकाणीं अहंकार व फलास्वाद हे कोठून राहणार? ('जे पार्था तया देहीं। मी ऐसा आठऊ नाहीं। तरी कर्तृत्व कैचें काई। उरे सांगें॥' ज्ञा.–५–३८; 'तुका म्हणे आम्ही झालों अग्निरूप। लागों नेदूं पापपुण्य अंगा॥' तुका.–३५५२ ).

**ओवी ५१—भाष**–बोली, नांव.–ज्या कर्मांत बुद्धीचें नांवही नसतें. **नेणिजे**–जाणली जात नाहीं. **अंकुर**–कोंब.–ज्या कर्मांत मनाचा अंकुर म्हणजे संकल्पही नसतो. **बोलिजे**–म्हटला जातो —ज्या कर्मांमध्यें बुद्धि व मन ह्यांचा उपयोग केला जात नाहीं व जीं कर्में केवळ शरिरानेंच होतात तीं 'शारीरिक'

कर्मे होत ( श्लोक ८ व ९ या दोन श्लोकांमध्यें ज्या कर्मामध्यें इंद्रियांचे व मनाचे असे दोहोंचेंही व्यापार येतात अशीं सामुदायिक कर्मे सांगितलीं. प्रस्तुत ११ व्या श्लोकामध्ये केवळ एक एक इंद्रियाचें कर्म भगवंत सांगत आहेत ).

**ओवी ५२—मराळें**-सोप्या रीतीनें. **चेष्टा**-क्रिया.-लहान मुलांचीं बुबुळें हालतात किंवा तीं पाय हालवितात, परंतु अशा क्रियेमध्यें त्यांचा कोणचाही हेतु किंवा संकल्प नसतो. हीं सर्व कर्में केवळ शारीरिक होत. तसेंच झोंपेंत लोळणें, किंवा बोलतांना हात हालवणें इत्यादि कर्मांचा शारीरिक कर्मांतच अंतर्भाव होतो.

**ओवी ५३—पांचभौतिक**—पंचमहाभुतांचें—शरीर हें पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंचमहाभूतांच्या पंचीकरणापासून तयार होतें (' मग हें तंव पांचमेळावा । शेखीं अनुसरेल पंचत्वा ॥' ज्ञा. ३-२०८; ' तैसें असतेपण आहाच । नाहीं होइजे हें साच । जयांतें रूपा आणिती पांचपांच । मिळोनिया ॥' ज्ञा. ८-३१; ' देह तंव पांचांचें जालें ॥' ज्ञा.-१३-११०२ ; 'पिंड हा उसना आणिला पांचांचा । सेकी लागे ज्याचा त्यासी देणें ॥' तुका.-१३३६ ). **स्वप्नीं**-स्वप्नांत.—स्वप्नामध्यें बुद्धीचा लय झालेला असतो, म्हणूनच मनुष्य स्वप्नांतील प्राप्त होणाऱ्या मिथ्या वस्तूंनीं आपल्याला आनंदी मानतो. स्वप्नामध्यें केवळ वासनेचा म्हणजे मनाचा व्यापार चाललेला असतो.

**ओवी ५४—संसारा**—विस्तार, पसारा, प्रभाव.—सामान्यतः मनुष्याला जागृतींत ज्या विषयाचें ध्यान असतें त्याचेंच स्वप्न त्याला झोंपेंत पडतें (' आणि जागता जंव असिजे । तंव जेणें ध्यानें भावना भाविजे । डोळा लागत-खेंवो देखिजे । तेंचि स्वप्नीं ॥' ज्ञा.-८-७३ ). एखाद्या मनुष्याला आपण काशीयात्रेला जावें असा ध्यास असतो. मग त्याला असें विचित्र स्वप्न पडतें कीं, आपण काशींत गंगेच्या स्नानाला गेलों आहोंत व स्नान करतां करत आपला पाय घसरून आपण नदींत पडलों आहोंत व गटांगळ्या खात आहोंत. अशा विचित्र स्वप्नाचा प्रभाव येवढा असतो कीं, मनुष्य त्यामुळें भयभीत होतो व त्याच्या अंगाला घामही फुटतो, तरी त्याला स्वतःचें भानही रहात नाहीं (' हां गा स्वप्न हें लटिकें म्हणों ये । परि निद्रावशें बाणलें होये । तंव आठवू काय देत आहे । आपणपेयां ॥' ज्ञा.-७-६१;

' जैसें स्वप्नीं परिव्राजें । आपणपेयां आपण कुटुंब होईजे । मग तयांचेनि धांविजे । मोहें सैरा ॥' ज्ञा.–१५–३५३ ). एकनाथांनीं स्वप्नाच्या प्रभावाची कल्पना येण्याकरतां पतिपत्नीचा एक दृष्टांत दिला आहे. एका गांवांत रोगाची सांथ होती व त्यामुळें एका बाईला असें विचित्र स्वप्न पडलें कीं, आपला नवराच रोगानें मेला. परंतु तिचा नवरा तिच्या शेजारींच होता ( ' भ्रतारशेजे निजोनि नारी । स्वप्नवैधव्यें शंख करी । भ्रतार तिसी पुसें जरी । सांगें ते तरी मी रांडेलें ॥ ' ' पतिसन्मुख बैसोनि जाण । म्हणे आजि चुडियासि पडले खान । बापु भ्रमाचें महिमान । ऐसेंचि सज्ञान जल्पती ॥ ' हस्तामलक–१४५–४६ ).
**उजगरा**—जागृति–वास्तविक स्वप्न खोटें, त्यांतील पदार्थही खोटे, परंतु स्वप्नाला कारण असणारी जी वासना, ती इतकी बलवत्तर असते कीं, ती खोट्या विषयांपासूनही जीवाला सुखदुःखें भोगावयास लावते ( ' स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेवऊनि वेगीं । आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकामु करी ॥ ' ज्ञा. १५–८६ ).

**ओवी ५५—गांवीं**-क्षेत्रांत. **नेणिजे**–जाणला जात नाहीं.—ज्या कर्मांची इंद्रियांना जाणीवही नसते, अशा कर्माला केवळ मानसिक कर्म म्हणतात. ( ' मनोरथांचीं देशांतरें । मनीं प्रकाशूनि नरें । मग तेथें आदरें । हिंडे जैसा ॥ ' अमृ. ७-१६३ ).

**ओवी ५६—योगिये**–( निष्काम ) कर्मयोगी. **करिती**–करतात.–जागृतींत कर्मयोग्यांचे व्यापार चालतात म्हणून त्यांनाही इतरांप्रमाणें स्वप्नें पडतात व अशा प्रकारें त्यांच्याकडूनही केवळ ' मानसिक ' कर्म होतें. परंतु ' मी स्वप्न पाहणारा आहे ' अशी अहंता त्यांच्या ठिकाणीं नसते. **अहंभावाची संगती**–अहंकाराचा संबंध.–अभिनिवेश घेणारी जी ' अहंवृत्ति ' ती त्यांची नाहींशी झालेली असते ( ' तैं मीचि कां कर्मठ । ऐसा न ये श्रीमाठ । कां दरिद्रलिये बुद्धी वीट । तोही नाहीं ॥ ' ज्ञा.–१४–३२८ ): ज्ञानी पुरुषांचे सर्व व्यवहार बालकाप्रमाणें निर्हेतुक असतात. फरक येवढाच कीं, बालकाचे व्यवहार हे अज्ञानमूलक असतात व ज्ञात्यांचे व्यवहार ज्ञानमूलक असतात ( ' ब्रह्मस्वरूपाचीं कर्में ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥ ' तुका.–२७६८ ). जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तिन्हीही अवस्थेत त्यांचें संविद् आत्म्यालाच स्पर्श करून राहतें ( ' जो सुषुप्तिसुख भोगसाक्षी । जो देखणेपणें तिहीं लोकीं । तो मी

आत्मा गा एकाकी । जाण निष्टंकीं निश्चित ॥ ए. भा. १३–४९९ ; ' पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥ ' तुका.–४९९ ).

**ओवी ५७ – भ्रमहत**–भ्रमिष्ट.–**पिशाच**–भूत. **विकळ**–विसंगत.–भूतानें पछाडलेल्या माणसाच्या क्रियेमध्यें एकसूत्रीपणा नसतो.

**ओवी ६० — जाणतें**–जाणणारें. —अपंचीकृत पंचमहाभूतांच्या मिलित ( म्ह. एकत्र झालेल्या ) सत्त्वगुणांपासून अंतःकरण किंवा बुद्धि उत्पन्न होते; म्हणून ती सर्व भूतांच्या गुणांना जाणूं शकते ( ' जे तेज तत्त्वाची आदी । जे सत्त्वगुणाची वृद्धी । जे आत्मया जीवाची संधी । वसवीत असे ॥ ' ज्ञा. १३–८८ ). बुद्धीमध्यें विवेचन व ग्रहण करण्याची शक्ति असते. डोळ्यादि इंद्रियें विषय पाहतात, परंतु योग्य काय व अयोग्य काय हें बुद्धि ठरविते ( ' हें सुख हें दुःख । हें पुण्य हें दोष । कां हें मैळ हें चोख । ऐसें जे निवडी ॥ ' ज्ञा. १३–८६ ). वास्तविक बुद्धि ही जड आहे. परंतु ती शुद्धसत्त्वात्मक होण्यास्तव ती काचेसारखी शुद्ध उपाधि आहे. म्हणून तिच्यांत आत्मप्रकाशाचें भान होतें व त्यामुळें ती सर्व पदार्थांना जाणूं शकते.

**ओवी ६१ — धुरे**–पुढें, प्रामुख्यानें, अग्रभागीं. **चित्त देऊनि**–मन लावून.—( निष्काम ) कर्मयोगी हा कर्मफलाची इच्छा करीत नाहीं, तरी पण तो कर्म करण्यांत हेळसांड करीत नाहीं. तो उचित कर्में कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून मोठ्या निपुणतेनें व दक्षतेनें करतो, म्हणून तो कर्मयोगी, नैष्कर्म्य पुरुषापेक्षांही ( म्ह. ज्ञानपूर्वक कर्मत्याग केलेल्या पुरुषापेक्षांही ) मुक्त असतो. **मुक्त**—मोकळा, अलिप्त.

**ओवी ६२ — ठावूनि**—ठिकाणापासून, स्थानापासून–बुद्धि, मन व स्थूलदेह या तिहींच्या ठिकाणीं त्याची अहंता नसते. या तिहींमध्यें पंचकोश व तीन देहांचा अंतर्भाव होतो. **स्मे**–जाणीव, अहंकार.—' मीं कर्माचा अहंकार टाकला ' अशी जोंपर्यंत स्मृति आहे तोंपर्यंत पूर्ण नैष्कर्म्यता होत नाहीं. ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं हीही जाणीव नसते. ज्या देहादि इंद्रियांकडून कर्म होतें त्या स्थूलसूक्ष्मसंघाताशीं त्याचें तादात्म्य नसतें ( ' तेवीं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडूनि पाहीं । सांडिजे अशेषही । संसारजात ॥ ' ज्ञा.–१७–१३४ ), एवढेंच नव्हे, तर त्याला त्यांची खबरही नसते; मग तो कर्माची अहंता कोठून घेणार ? उंसाची साखर झाल्यानंतर त्या साखरेचा ज्याप्रमाणें पुन्हा उंस

तयार करता येत नाहीं ( ' नातरी साखरेचा माघौता । बुद्धिमंतपणेंही करिता । परि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी ॥ ' ज्ञा. ८-२०० ) त्याचप्रमाणें पंचकोशाच्या अतीत असणारा जो आत्मा त्याच्याशीं तो समरस झाल्याकारणानें तो पुन्हा देहाहंतेवर येऊं शकत नाहीं ( ' तेवीं स्थूळाचें निराकरण । लिंगदेहाचें उपमर्दन । अहंकाराचें निर्दळण । करूनि पूर्ण ब्रह्म पावती ज्ञाते ॥ ' ए. भा. २८-२२४ ). त्याची बुद्धि परमात्मरूप झाली असल्याकारणानें तो कर्मे करीत असूनही तो शुद्धच असतो ( ' म्हणोनि तयाची बुद्धी । नेणे पापपुण्याची गंधी । गंगा मीनलिया नदी । विटाळु जैसा ॥ ' ज्ञा. १८-४५० ; ' तैसें आपणपयापरतें । जो नेणे क्रियाजातातें । तेथ काय लिंपवी बुद्धीतें । तयाचिये ॥ ' ज्ञा. १८-४५२ ).

**ओवी ६३—करितेनवीण**—कर्त्यावांचून.—कर्तेपणाचा अहंकार टाकून केलेलें जें कर्म त्याला नैष्कर्म्य म्हणतात. ज्ञानी पुरुष इतर लोकांप्रमाणें सर्व कर्मे करतो, परंतु त्यांचा अभिनिवेश घेत नाहीं. कर्म हें परस्पर देहादिसंघाताकडून होतें. आत्म्याचा व त्याचा काहींही संबंध नाहीं असें त्याचे ठिकाणीं स्वच्छ ज्ञान असतें. जे पुरुष देहाशीं तादात्म्य करतात व देहादिसंघाताकडून होणाऱ्या कर्मांचा अभिनिवेश घेतात तेच कर्मपाशांनीं बद्ध होतात ( ' देखें पुढिलाचें वोझें । जरी आपुला माथां घेइजे । तरी सागें कां न दाटिजे । धनुर्धरा ॥ ' ज्ञा. ३-१७७ ; ' जो न करितांचि चोरी । ' मी चोर ' म्हणे राजद्वारीं । तो मारिजे लहानथोरीं । तैसी परी जडजीवा ॥ ' ए. भा. ११-२४३ ). जो ज्या कर्माचा कर्तेपणा घेतो, तो त्या कर्माचा ' भोक्ता ' होतो. जो कर्माचा कर्तेपणा घेत नाहीं तो त्या कर्माचा भोक्ताही होत नाहीं ( ' आपणाचि विऊनि दुहिता । कीं न मम म्हणे पिता । तो सुटे कीं प्रतिग्रहिता । जावाई शिरके ॥ ' ; ' विषाचे आगरही वाहती । ते विकितां सुखें लाभे जिती । येर निमाले जे घेती । वेंचोनि मोलें ॥ ' ज्ञा.- १८-२३४-३५ ). कर्माला कारण असणारी जी प्रकृति त्या प्रकृतीच्या ठिकाणीं ज्ञानी पुरुषाचें तादात्म्य नसल्यामुळें तो प्रकृतीकडून होणाऱ्या कर्मांनीं लिप्त होत नाहीं ( ' जे तत्त्वज्ञानियांच्या ठायीं । तो प्रकृतिभावो नाहीं । जेथ कर्मजात पाहीं । निपजत असे ॥ ' ज्ञा.-३-१८१. ' म्हणूनि शरीरीं जरी होती । तरी कर्मबंधा नातळती । जैसा कां भूतचेष्टा गभस्ती । घेपजेना ॥ ' ज्ञा. ३-१८३ ). कर्ता

हा ज्या वेळेस अनुभवानें ब्रह्मस्वरूपांत विलीन होतो, त्या वेळेस तो खरा नैष्कर्म्य ' होतो. अशा पुरुषांकडून होणारें जें कर्म तें नैष्कर्म्य होय. ब्रह्मवेत्त्याकडून जीं कर्मे होतात तीं केवळ आभासात्मक म्हणजे निष्फळ असतात. **गुरूगम्य**–गुरूपासून कळणारें.—कोणतीही गोष्ट योग्य होण्याकरितां त्या गोष्टींतील मर्म कळावें लागतें. तसें मर्म न कळतां ती गोष्ट करीत राहिलें तर त्यांत कष्ट पडूनही यश येत नाहीं ( तु. म्ह. चुकलें वर्म । केला अवघाचि अधर्म ॥ तुका.— २६६३ ). कर्म करूनही कर्माच्या कचाट्यांतून कसें सुटावें हें गुरूकडून कळत असतें. जीवानें ज्ञातेपणानें राहून कर्माचे साक्षी व्हावें, परंतु कर्माचा कर्ता होऊं नये. कर्मे करून त्यांबद्दल कर्तृत्वमद व फलास्वाद न घेतां तीं ईश्वरार्पण करणें, हीच कर्मरहित होण्याची सोपी युक्ति आहे ( ' तें उगाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरण जन्म । जन्मासवें श्रम । तरचिलही गेले ॥', ' म्हणऊनि अर्जुना यापरी । पाहेचा वेलु नव्हेल भारी । हे संन्यासयुक्ति सोपारी । दिधली तुज ॥' ज्ञा.–९–४०४–४०५ ). [ पुढील ६४ व्या ओवींत श्रीज्ञानेश्वरमहाराज त्यांच्यासमोर जी निवृत्तिनाथादि संत मंडळी बसली होती, त्यांना उद्देशून बोलतात. हा प्रसंग त्यांनीं आपल्या व्याख्यानाचें महत्त्व सांगण्याकरतां आणलेला आहे ].

**ओवी ६४—शांतरस**–ब्रह्मरस–शृंगार, वीर, करुण, अद्‌भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र व शांत असे नऊ रस आहेत. रस हा काव्याचा आत्मा आहे. ज्ञानेश्वरींत मुख्यतः शांत रस आहे ( ' नुसंधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा । जे शृंगाराच्या माथां । पाय ठेविती ॥' ज्ञा.–१३–११५५; ' जेथ साहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बोलती ॥ ' ज्ञा.–४–२१८; ' मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥' ज्ञा.–१८–१७६१ ). चवथ्या अध्यायाच्या शेवटीं पुढील अध्यायांत शांतरस अभिनवेल ( ' तो शांतुचि अभिनवेल ॥' ज्ञा. ४–२१४ ) असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें होतें, त्याचीच आठवण श्रोत्यांना देऊन ह्या ठिकाणीं शांतरस प्रकट झाला आहे असें ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. **भरितें**—भर, ऊत.— या ठिकाणीं शांतरस उतूं जात आहे असें म्हणण्याचें कारण, जी नैष्कर्म्यस्थिति शब्दांनीं व्यक्त करितां येत नाहीं ती शब्दांनीं सांगण्यांत आली. आत्मानुभव ही अनुभवण्याची गोष्ट आहे. तो शब्दांनीं व्यक्त करतां येत नाहीं ( ' जेणें

सांगतयाचें बोलणें खुंटे ॥' ज्ञा.-७-९; 'म्हणोनि तेथिंची मातु। न चढेचि बोलाचा हातु॥' ज्ञा.-६-३११; 'वाद निमाला शब्द खुंटला।' नाथ-३७२५; 'मौनपणें वाचा थोटावल्या चारी। ऐसें तुझें हरी रूप आहे॥' तुका.-३४७८). मुक्यानें साखर खाल्ली असतां तो त्या साखरेची गोडी जशी तोंडानें सांगूं शकत नाहीं, तशीच गोष्ट आत्मानुभवाची आहे. अशी शब्दातीत असणारी गोष्ट जर गुरूची कृपा असेल तर ती शब्दांतही व्यक्त करतां येते ('जें ज्ञानासि न चोजवे। ध्यानांसिही जें नागवे। तें अगोचर फावे। गोठीमाजीं॥'; 'येवढें एक सौभग। वळघे वाचेचें आंग। श्रीगुरुपद्मपराग। लाहे जैं कां॥' ज्ञा.-१५-१६-१७).

**ओवी ६५—पांग**-पंगिस्तपणा, पराधीनपणा, आसक्ति.-इंद्रियें हीं बहिर्मुख असल्यामुळें त्यांना आपल्या घरात असलेल्या आत्मसुखाची जाणीव नसते, म्हणून तीं सुखाकरितां दीन होऊन विषयांच्याकडे धांव घेतात. ('पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन्॥' कठ-उप.-२, १, १; 'या विषयांवाचूनि कांहीं। आणीक सर्वथा रम्य नाहीं। ऐसा स्वभावोचि पाहीं। इंद्रियांचा॥' ज्ञा.-२-१२०). परंतु विषयांत खरें सुख नसल्यामुळें तीं विषयसेवनानें कधींही शांत होत नाहींत. **लाग**-संभव, शक्यता, अधिकार.-श्रीज्ञानेश्वरमहाराज नैष्कर्म्य पुरुषाच्या महात्म्याचें वर्णन करण्यांत इतके विरून गेले कीं, त्यांना आपल्यासमोर बसलेले श्रोते हे फार वरच्या भूमिकेवरचे आहेत ह्याचें भान राहिलें नाहीं व समोरील श्रोतेमंडळी ही वास्तविक गीताश्रवणाचे योग्य अधिकारी असतांना, ते या ठिकाणीं गीताश्रवणाचा अधिकारी कसा असावा हें सांगतात. **परिसावया**-ऐकण्यास.-या ओवींत ज्ञानेश्वरमहाराज गीताश्रवणाचा अधिकारी सांगतात. ज्या पुरुषांच्या ठिकाणचा इंद्रियाचा पंगिस्तपणा नाहींसा झालेला आहे, तेच गीताश्रवणाचे अधिकारी होत. इंद्रियांना दृग्गोचर होणारें तेवढेंच सत्य असें जे मानतात ते गीताग्रंथश्रवणाचे अधिकारी नव्हत. गीतेमध्यें जर शब्दादि पंचविषयांची चर्चा असती तर त्यांचा अनुभव इंद्रियांना आला असता. परंतु गीता ही इंद्रियांच्यापलीकडे असणाऱ्या आत्म्याचें वर्णन करीत असल्यामुळें, ज्यांचीं इंद्रियें अंतर्मुख झालेलीं आहेत, त्यांनाच त्याचा अनुभव येतो ('साचाचि बोलाचें नव्हे हें शास्त्र। पैं संसारु जिणतें हें शस्त्र। आत्मा अवतरवितें मंत्र। अक्षरें इयें॥' ज्ञा.-१५-५७६).

'इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः। मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः॥' कठ. उप.–१, ३, १०. 'आतां आत्मप्रभा निच नवी। तेंचि करूनि ठाणदिवी। जो इंद्रियांतें चोरूनि जेवी। तयासीचि फावे॥'–ज्ञा.–६–२३; 'तियांपरी श्रोता। अनुभवावी हे कथा। अतिहळुवारपण चित्ता। आणुनियां॥' ज्ञा.–१–५७). [पुढील दोन ओव्यांत श्रोत्यांचे उद्गार आहेत].

ओवी ६६—अतिप्रसंग—पाल्हाळ, विषयांतर.—'गीतेचा अधिकारी कोण आहे' इत्यादि विषयांतर आतां राहूं दे. असाच प्रसंग ज्ञानेश्वरीच्या १३ व्या अध्यायांत आलेला आहे. ('तंव श्रोते म्हणती असो। न संगे तयाचा अतिसो। ग्रंथोक्ती तेथ आडसो। घालितासी कां॥' ज्ञा.–१३–६३३). पां—पादपूर्णार्थक अव्यय. लाग— संबंध, संगति.

ओवी ६७—आकळितां—समजूत घेत असतां, कुवाडें—कठिण.—मनाचें सामर्थ्य जरी मोठें असलें ('संकल्पें सृष्टी घडी। सवेंचि विकल्पूनि मोडी। मनोरथांच्या उतरंडी। उतरी रची॥' ज्ञा.–१३–११४) तरी तें आत्म्याला जाणूं शकत नाहीं. मन हें रजोगुणाचें असल्यामुळें मनाकडून संकल्प करण्याचें कार्य होतें, परंतु परमात्म्याचे ठिकाणीं संकल्पाचा लाग लागत नसल्यामुळें मन परमात्म्याविषयीं संकल्प करूं शकत नाहीं ('मना संकल्प निके। याहीहूनि॥' अमृ. ७–११०; 'मनाची नखी न लगे। जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे। इंद्रियां कीर जोगें। कायि होईल॥' ज्ञा.–१२–४१; 'यन्मनसा न मनुते॥ केन. उप. ११५). मन हें जर परत्म्याकडे गेलें, तर तें मनरूपानें शिल्लकच राहत नाहीं ('तुका म्हणे मन मुरे। मग जें उरे तेंचि तूं॥' तुका.– ३८००). माशी ही सर्व पदार्थावर बसते, परंतु विस्तवावर बसत नाहीं; कारण तेथें बसण्यांत तिचें मरण असतें. तद्वतच मन हें वाटेल त्या विषयाकडे जातें, परंतु तें परमात्म्याकडे सहसा जात नाहीं, कारण तें त्याकडे गेलें असतां, त्याच्याशींच तद्रूप होऊन जातें; शिवाय मन हें कार्य आहे अतएव तें जड आहे. जें कार्य असतें तें कारणाला जाणूं शकत नाहीं, म्हणून मन हें परमात्म्याला जाणूं शकत नाहीं, म्हणजे तें त्याला 'विषयी-विषयभावानें' जाणूं शकत नाहीं. घांघुसितां—शोध करीत असतांना.—बुद्धि हीसुद्धां आत्म्याला जाणूं शकत नाहीं. ती आत्म्याच्या प्रकाशानें प्रकाशिली जाते, म्हणून ती मनाप्रमाणेंच जड आहे ('बुद्धि बोध्या सोके। ते येवढी

वस्तु चुके ॥ ' अमृ.–७–११० ; ' तैसी जाणीव जेथ न रिघे। विचार मागुता पाउलीं निघे। तर्कु आयणी नेघे। आंगीं जयाच्या ॥ ' ज्ञा.–७–५; ' विज्ञातारमरे केन विजानीयात्। बृह. उप.–४–५–१५ ). शिवाय बुद्धि परमात्म्याला जाणते असें म्हणण्यांत ' कर्मकर्तृत्वविरोध येतो. **सुरवाडें**–अनुकूलतेनें.–दैव अनुकूल असेल तर अशक्यही गोष्टी शक्य होतात (' होय अदृष्ट आपैतें। तैं वाळूचि रत्नें परते। उजू आयुष्य तैं मारितें। लोभु करी ॥ '; ' आधणीं घातलिया हरळ। होती अमृताचे तांदुळ। जरी भुकेची राखे वेळ। श्रीजगन्नाथु ॥ ' ज्ञा.–१५–२२–२३ ). **सांगवलें**–सांगतां आले.–मनाला व बुद्धीला आकलन न करता येणारी अशी जी आत्मसंपन्न पुरुषाची स्थिति, तिचें तूं वर्णन करूं शकलास.

**ओवी ६८—शब्दातीत**–शब्दाच्या पलीकडचें, शब्दाला अगोचर.—आत्म्याचें वर्णन शब्दांनीं करतां येत नाहीं. कारण आत्मा हा शब्दाला विषय होत नाहीं (' अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगन्धवच्च यत्॥ ' कठ. उप. १, ३, १५; ' म्हणोनि तेथिंची मातु। न चढेचि बोलाचा हातु ॥ ' ज्ञा.–६–३११; ' कां परेसी पडे मिठी। तेथें नादा सलु नुठी। मा वाविरिजेल ओंठीं। हें कें आहे ॥ ', अमृ. ५–६३; ' परेहि परतें बोलणें खुंटलें। वैखरी कैसेनि सांगे। ' ज्ञा. गा.–७६४ ). वेदानें जरी आत्म्याचें वर्णन केलेलें असलें तरी तें त्यानें उपाधींचा आश्रय करून केलेलें आहे ( तेथही उपाधीचा वोथंबा। घेऊनि श्रुति उधविली जिभा। मग नामरूपाचा बडंबा। करिती वायां ॥ ' ज्ञा.–१५–२७६ ). **बोलीं**— बोलण्यांत, शब्दामध्यें. **फावे**—सांपडलें. **आणिकें**— अन्य वस्तूनें.

**ओवी ७०—चिन्ह**—लक्षण, खूण. **निरुतें**—चांगलें.—तूं एकाग्र चित्तानें ऐकावें (' आतां इंद्रियजात आघवें। तिहीं श्रवणाचें घर रिघावें। मग संवादसुख भोगावें। गीताख्य हें ॥ ' ज्ञा.–४–५ ; ' म्हणोनि आथिलिया आराणुका। गीतार्थु हा निका। ज्ञानदेवो म्हणे आइका। निवृत्तिदासु ॥ ' ज्ञा.–४–२२५ ; ' तो म्हणे पार्था दत्तचित्तु। होईं आतां ॥ ' ज्ञा.–६–३८ ). चित्त केंद्रीभूत करून ऐकलें असतां विषय मनामध्यें चांगला ठसावतो ( ' वरी अवधानाचा वाफसा। लाधला सोनयाऐसा। म्हणोनि पेरावया धिंवसा। श्रीनिवृत्तीसी ॥ ' ज्ञा.–६–४९१ ). श्रवण किती एकाग्रतेनें करावें याबद्दल

नाथांनीं शरकाराचें उदाहरण दिलें आहे ( ' तावूनि उजूं करितां बाण। दृढ लागलें अनुसंधान। इतुकेन प्रपंचाचें भान। खुंटलें जाण तयाचें॥ '; ' निशाण भेरी वाजंतरें। रथ गज सैन्यसंभारें। राजा गेला अतिगजरें। नेणिजे शरकारें शरदृष्टीं॥ ' ए. भा.-९-१५५-५६ ). ज्याप्रमाणें आई ही चुंकलेल्या मुलाची वार्ता मोठ्या उत्सुकतेनें ऐकते त्याचप्रमाणें श्रवण हें उत्कटतेनें करावें ( ' चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता। जेणें सादरें ऐके माता। तेणें आदरें हरिकथा। सार्थकता परिसावी॥ ' ए. भा.-२-५१९ ).

**ओवी ७१—आत्मयोग**-आत्मरूपता.-गीतेंत कर्मयोग, अष्टांगयोग, भक्तियोग व ज्ञानयोग सांगितलेले आहेत. परंतु हे सर्व योग ' साधनयोग ' आहेत; म्हणजे ' आत्मयोग ' प्राप्त करून देणारीं हीं सर्व साधनें आहेत. ' आत्मयोग ' हा गीतेंतील साध्य-योग आहे ( ' कीं निजकांता आत्मया। आवडी गीता मिळावया। श्लोक नव्हती बाह्या-। पसरू का जो॥ ' ज्ञा.-१८-१६७३; ' म्हणौनि जगीं गीता। मिया आत्मेनि पतिव्रता। जे हे प्रस्तुत तुवां आतां। आकर्णिली॥ ' ज्ञा.-१५-५७५ ). जीवानें, आपल्या स्वरूपाला ब्रह्मरूपेंकरून जाणणें म्हणजे ' मी ब्रह्म आहें ' अशा अपरोक्ष ज्ञानावर प्राप्त होणें याला ' आत्मयोग ' म्हणतात. असें अपरोक्ष ज्ञान जीवाचें ठिकाणीं नसतें, किंतु ' मी देहच आहें ' असें अपरोक्ष ज्ञान त्याचे ठिकाणीं असतें. ' अपरोक्ष ज्ञान ' म्हणजे ' प्रत्यक्ष ज्ञान ' व ' परोक्ष ज्ञान ' म्हणजे ' अप्रत्यक्ष ज्ञान ' होय. ब्रह्मज्ञान हें परोक्ष व अपरोक्ष असे दोन प्रकारचें आहे. ' ब्रह्म आहे ' असें ज्ञान होणें याला परोक्ष ज्ञान म्हणतात व सच्चिदानंदरूप जें ब्रह्म तें मी आहें, असें अनुभवास येणें याला अपरोक्ष ज्ञान म्हणतात. हीच गोष्ट शास्त्रीय परिभाषेंत सांगावयाची तर, अवांतर वाक्याच्या ( म्ह. ज्या वाक्यांत फक्त परमात्म्याचें स्वरूप कथन केलेलें असतें, अशा वाक्याच्या ) श्रवणानें जें ज्ञान प्राप्त होतें त्याला परोक्ष ज्ञान म्हणतात व महावाक्याच्या ( म्ह. ज्या वाक्यांत जीवब्रह्माची एकता सांगितलेली आहे, अशा वाक्याच्या ) श्रवणानें जें ज्ञान प्राप्त होतें त्याला अपरोक्ष ज्ञान म्हणतात ( ' मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे। आणि हृदयीं स्वयंभाचि असे। प्रत्यक्ष फावों लागे तैसें। आपैसयाचि॥ ' ज्ञा.-९-४९ ). ' आत्मयोग ' अथवा ब्रह्माचें अपरोक्ष ज्ञान प्राप्त होण्या-

करितां साधक हा साधनचतुष्टयसंपन्न असावा लागतो ( अधिक माहिती वेदान्त–प्रकरण ओ. ७१ पहा ) व त्याला ' तत्त्वमसि,' या महावाक्याचा उपदेश श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ ( ' परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊन मूर्त । अनुष्ठानें जगा देत । वडील जे जे ॥ ' ज्ञा.–१७–८६ ; ' तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् ॥ शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ॥ ' ए. भा. ३–श्लो. २१ ) अशा गुरूकडून व्हावा लागतो. सामान्यतः या दोन्ही गोष्टी दुर्मिळ आहेत ( ' आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः ॥ ' कठ. उप०–१, २, ७ ). केवळ वेदांतशास्त्राच्या अभ्यासानें मनुष्य हा शब्दज्ञानी होऊं शकतो, परंतु त्याला ' आत्मसंपन्नता ' प्राप्त होत नाहीं. ' मी ब्रह्म आहें ' असें संशयविपर्ययरहित अपरोक्ष ज्ञान प्राप्त होण्याकरतां अंतःकरणांतून मल व विक्षेप हे दोन दोष जावे लागतात व गुरुप्रसाद व्हावा लागतो ( ' याकारणें श्रीगुरुनाथु । जंव मस्तकीं न ठेवी हातु । निवृत्तिदास असे विनवितु । तोंवरी निवांतु केवीं होय ॥ ' ज्ञा. गा.–११ ). असें अपरोक्ष ज्ञान ज्या पुरुषाला प्राप्त होतें त्यालाच आत्मयोगाचा अथवा जीवन्मुक्तीचा लाभ होतो ( ' देहात्मज्ञानवत् ज्ञानं देहात्मज्ञानबाधकम् । आत्मन्येव भवेद्यस्य स नेच्छन्नपि मुच्यते ॥ ' उपदेशसाहस्री ). **कर्मफल**— कर्मापासून प्राप्त होणारें फळ.–अनिष्ट ( नरकादि ), इष्ट ( स्वर्गादि ) व मिश्र ( मनुष्यलोकादि ) असें तीन प्रकारचें कर्माचें फल आहे ( ' अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ॥ ' गीता–१८–१२ ; ' देव मनुष्य स्थावर । यया नांव जगडंबर । आणि हे तंव तिन्ही प्रकार । कर्मफळाचे ॥ ' ज्ञा.–१८–२३९ ). **विटला**–वीट आला, कंटाळला–कर्मानें प्राप्त होणारें फल हें नाशवंत असल्यामुळें प्राप्त पुरुष हा कर्मफलाबद्दल नेहमीं विटलेला असतो ( ' तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ॥ ' तुका.–८३५, ' कर्मफळ म्हणूनि इच्छूं नये काम । तुका म्हणे वर्म दावूं लोकां ॥ ' तुका.–३०७० ). तो तिन्ही लोकांविषयीं उदासीन असतो ( ' तैसे ऐहिकींचे कां स्वर्गींचे । भोग पाइक जालिया इच्छेचे । परि भोगावे हें न रुचे । मनामाजीं ॥ ' ज्ञा.–१६–१६६ ; ' इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ ' तुका.–१९८४ ; ' पाताळींचें आधिपत्य । तें तों मानिती विपत्य ॥ ' तुका.–१९८४ ). **घर रिघोनि**–घरांत शिरून, आपणहून.—तो शांति प्राप्त करून घेतो असें नाहीं तर त्याच्या घरांत

शांति आपणहून शिरते. ‘शांति’ या शब्दाचा अर्थ ‘मोक्ष, स्वरूपावस्था अथवा ब्रह्मस्थिति’ असा आहे (‘तरी गिळोनि ज्ञेयातें। ज्ञाता ज्ञानही मागौतें। हारपे निरुतें। ते शांति पैं गा॥’ ज्ञा.–१६–१३६). श्रीएकनाथांनीं शांतीचे दोन प्रकार सांगितले आहेत: अनुकूल भोग प्राप्त झाला असतां जें तात्पुरतें समाधान प्राप्त होतें किंवा कामक्रोधादिक विकार नष्ट न होतां केवळ रोगामुळें शरिराच्या ठिकाणीं जी निश्चलता प्राप्त होते त्याला ‘सकाम’ शांति म्हणतात. (‘कामक्रोध सलोभता। समूळ मूळेंसि न वचता। देहीं आली जे निश्चलता ते न सरे सर्वथा येथें शांती॥’; ‘मत्स्य धरूनिया मनीं। बक निश्चल राहिला ध्यानीं। ते शांति कोण मानी। अंतःकरणीं सकाम॥’ ए. भा.–१४–१७०–१७१). ही शांति अनुकूल भोग नष्ट झाला असतां बिघडते व त्यामुळें मनुष्याला अधिकच दुःख होतें. आत्मज्ञानानें प्राप्त होणारी जी ‘निष्काम शांति’, जिच्यांत भोक्ता, भोग्य व भोग या त्रिपुटीचा नाश होतो व जिला ‘स्वरूपशांति’ म्हणतात तीच खरी शांति होय (‘तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे। आणि शांतीचा अंकुर फुटे। मग विस्तार बहु प्रकटे। आत्मबोधाचा॥’ ज्ञा.–४–१९०). आत्मयोगसंपन्न पुरुष अशा प्रकारच्या शांतीला प्राप्त होतो.

ओवी ७२— येरु—दुसरा (म्ह० आत्मयोगसंपन्न नसलेला).—ज्ञानी पुरुष सोडून बाकी सर्व लोक, मग ते इहलोकांतील भोगाकरतां खटपट करणारे असोत अथवा परलोकांतील (म्ह० स्वर्गांतील) भोगाकरितां खटपट करणारे असोत, ते सर्व सकाम बुद्धीनें कर्म करणारे असतात (‘मग नानाहेतु प्रकारें। यथोचितें उपचारें। मानिलीं देवतांतरें। उपासिती॥’ ज्ञा.–४–७१; ‘येर बहु जोडती किरीटी। जयांचीं भजनें भोगासाठीं। जे आशा तिमिरें दृष्टी। मंद जाले॥’ ज्ञा.–७–१३८). जे पुरुष इहलोकाच्या भोगाकरितां सकाम कर्में करतात व क्षुद्र देवतांना भजतात त्यांना नाशिवंत असें फल प्राप्त होतें व त्यांच्या कर्मानुसार त्यांना त्या त्या योनींत जन्म मिळतो (‘अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम्। देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि॥’ गीता.–७–२३; ‘किंबहुना ऐसें जें भजन। तें संसाराचेंचि साधन। येर फळभोग तो स्वप्न। नावभरी दिसे॥’ ज्ञा. ७–१४८). तसेंच वेदविद असे जे दीक्षित शास्त्रनिपुण होऊन स्वर्गप्राप्तीकरतां विधिपूर्वक यज्ञादिक कर्में करतात (‘देख पां गा किरीटी। आश्रमधर्मांचिया राहाटी। विधिमार्गा कसवटी। जे आपणचि

होती ॥' ज्ञा. ९-३०७ ) त्यांनाही मरणोत्तर जरी स्वर्ग प्राप्त होतो तरी कांहीं काळानंतर पुन्हा मृत्युलोकांतच जन्म घ्यावा लागतो ( 'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ॥' गीता-९-२१; 'मग तया पुण्याची पाउटी सरे। सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे। आणि येऊं लागती माघारे। मृत्युलोका ॥' ज्ञा. -९-३२८; 'तुका म्हणे जाती। पुण्यक्षयें अधोगती ॥ तुका.-१९०२ ); परंतु ज्ञानी पुरुष हा कर्मानें प्राप्त होणारे जे भोग अथवा लोक आहेत ते सर्व नाशिवंत आहेत असें जाणतो व म्हणून तो तत्प्राप्तीकरितां कोणचेंही सकाम कर्म करीत नाहीं ( 'तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म। जें जें कर्मधर्म नाशिवंत ॥' तुका.-८३५; 'परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायात् ॥' मुण्डकोप.-१-२-१२; 'तयातें योगीश्वर अलौकिकें। दिठीचेनि हाततुकें। अनुमानिती कौतुकें। तंव हलुवट आवडे ॥' ज्ञा.-८-२६६ ); व म्हणून तो कर्मफलानें बांधला जात नाहीं. इतर सर्व लोक कर्मफलानें बांधले जातात म्हणजे त्यांना जन्ममृत्युरूपी फळ भोगावें लागतें. **कर्मबंधें**-कर्माच्या पाशानें.- कर्माचे पाश दोन आहेत : कर्तृत्वमद व फलास्वाद ( 'तैसा कर्तृत्वाचा मदु। आणि कर्मफळाचा आस्वादु। या दोहींचें नांव बंधु। कर्माचा कीं ॥' ज्ञा.-१८-२०५ ). जे पुरुष कर्तृत्वमद व फलास्वाद घेऊन कर्में करतात, त्यांना जन्ममृत्युरूपी फळ भोगावें लागतें. कर्म हें बाधक नसतें तर कर्मफलाची आशा ही बाधक असते. **गांठी**-गांठीनें. **कळासला**-बांधला गेला. **फळभोगाच्या खुंटीं**-फळभोगरूपी खुंट्याला--त्याला कर्माचें फल निश्चित भोगावें लागतें ( 'एऱ्हवीं तरी धनंजया। त्रिविधा कर्मफळा गा यया। समर्थ ते कीं भोगावया। जे न सांडितीचि आशा ॥' ज्ञा.-१८-२३३; 'केलें काम्य कर्म तैसें। फळ भोगावया धरणें बैसे। न फेडितां ऋण जैसें। वोसंडीना ॥' ज्ञा.-१८-१०३ ).

**ओवी ७३**—**उपेक्षी**-अव्हेर करतो, त्याग करतो.-ज्याप्रमाणें फलासक्त पुरुष निपुणतेनें व उत्सुकतेनें कर्म करतो त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुष हाही सर्व कर्में करतो. परंतु मी कर्माचा कर्ता आहे, अशी त्याच्या ठिकाणीं अहंकृति नसते. म्हणून तो कर्में करूनही अकर्ता ठरतो ( 'आणि सचाडाचिये परी। इष्टापूर्तें करी। परी केलेंपण शरीरीं। वसों नेदी ॥' ज्ञा. १३-५२४ ). त्याच्या

देहादिसंघाताकडून जरी कर्में घडत असलीं तरी तीं सर्व कर्में 'प्रकृतीच्या गुणापासून होत आहेत, माझा व त्यांचा कांहींही संबंध नाहीं, अशी त्याची दृढ समजूत असते; म्हणून तो त्या कर्मांनीं बांधला जात नाहीं ( ' ते देहाभिमानु सांडुनी । गुणकर्में वोलांडुनी । साक्षिभूत होउनी । वर्तती देहीं ॥ '; ' म्हणुनि शरीरी जरी होती । तरी कर्मबंधा नातळती । जैसा कां भूतचेष्टा गभस्ती । घेपवेना ॥ ' ज्ञा. ३-१८२-८३. )

**ओवी ७४—वास**-वाट, चेहरा, दृष्टि. **सृष्टि सुखाची होये—सृष्टि** सुखमय होते.—ज्ञानी पुरुषाच्या अंगीं एवढें सामर्थ्य असतें कीं, तो जिकडे दृष्टि फेंकतो तिकडे सुखाचीच सृष्टि होऊन जाते. **महाबोध**-मोठी समजूत, आत्मबोध.—अज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं अल्पबोध असतो, कारण परिच्छिन्न असें जें शरीर त्याच्याशीं तो तादात्म्य करून राहतो व म्हणून तो आपल्याला मर्यादित, परिच्छिन्न, एकदेशी असें समजतो. परंतु प्राप्त पुरुषाच्या ठिकाणीं व्यापक बोध असतो, कारण व्यापक असा जो परमात्मा त्याच्याशीं तो अनुभवानें समरस झाल्याकारणानें तोही आपल्याला परमात्म्याप्रमाणें व्यापक समजतो. अशी जी पूर्णावस्था तिलाच आत्मस्थिति, ब्रह्मस्थिति किंवा महाबोध म्हणतात ( ' तैसें आमुचेनि नांवें । अज्ञान ज्ञान दोन्ही नव्हे । आम्हालागी गुरुदेवें । आम्हीच केलों ॥ ' अमृ. ८-१ ; ' किंबहुना श्रीनिवृत्ती । ठेविलों असों जिया स्थितीं । ते काय देऊं हातीं । वाचेचिया ॥ ' अमृ. ८-८ ; ' येणें थोर बोधलेपणें । तयासि गा देहीं असणें । म्हणूनि तो मी म्हणे । गुणातीत ॥ ' ज्ञा. -१४-३१८ ; ' येणें बोधें आम्ही असों सर्वकाळ । करूनि निर्मळ हरिकथा ॥ ' तुका.-५६२ ; ' तियेपरतें कांहीं । निपजणें येथ नाहीं । म्हणोनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥ ' ज्ञा. १८-९८३ ; ' मी वासुदेव तत्त्वता । कळों येईल विचारितां । आहे ठाउका सभाग्य संतां । नाहीं दुजा आणीक मागता गा ॥ ' तुका.-३४६ ). **राहे**—राहतो.—प्राप्त पुरुषाचें एवढें सामर्थ्य असतें कीं, तो वाटेल त्याला महाबोध ( म्ह. आत्मबोध ) देऊं शकतो ( ' गाढवाचें घोडें । आम्ही करूं दृष्टी पुढें ॥ ' तुका.-१७६९ ; ' पुनीत केले विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ ' तुका.-१९८९ ; ' पंचमहापातकी विश्वासघातकी । त्यासी यमादिकीं गांजियलें ॥ ऐसिया पतीता करीं रे सनाथ । पुरवीं माझे आर्त पंढरीराया ॥ ' नामा-९७२; ' धरती ज्या हातीं संत कृपावंत । पाळी पंढरीनाथ लळा त्याचा ॥ '

निळा.–१०१७ ). श्रीमच्छंकराचार्योनीं त्रोटकाला महाबोध दिला. श्रीएकनाथांनीं गावबाच्या मस्तकावर हात ठेवून त्याला भावार्थरामायणाचें उत्तरकांड लिहिण्यास समर्थ केलें. श्रीज्ञानेश्वरांनीं रेड्याच्या मुखानें वेद वदविले (' ज्ञानदेव म्हणे बोले रे ऋग्वेद । ओंकार मूळ शब्द प्रणवाचा ॥ ' नामा–६९३; ' पशुमुखें वेदाच्या श्रुती । पढवा कीर्ति तुमचिये ॥ ' निळा.–१०३० ). संत हे पशूचाही उद्धार करूं शकतात, मग मनुष्याचा उद्धार करूं शकतील यांत नवल तें काय? त्यांच्या ठिकाणीं मोठा–लहान, अधिकारी–अनधिकारी, पापी–पुण्यवंत, व मित्र–शत्रु असा भेद नसतो. कोणी कसाही असो, परंतु जो त्यांच्याजवळ येईल त्याचा ते उद्धार करतात (' तुका म्हणे खळ । करूं समर्यी निर्मळ ॥ ' तुका.–१७६९; ' खेचराचियाही मना । आणी सात्त्विकाचा पान्हा । श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ' ज्ञा.–१३–११५८; ' फिटो विवेकाची वाणी । हो काना मनाची जिणी । देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ' ज्ञा.–१३–११६०; ' जे खळाची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ ' ज्ञा.–१८–१७९४; ' कैवल्यकनकाचिया दाना । जो न कडासि थोर साना । द्रष्टयाचिया दर्शना । पाठाउ जो ॥ ' अमृ.–२–५; ' कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपुल्या पदीं बैसविलें । बापरखुमादेवीवरें विठ्ठलें । भक्तां दिधलें वरदान ॥ ' ज्ञा. गा.–३५३ ) साक्षात् भगवंत संताच्या ताब्यांत असतात (' तुम्ही अच्युतात्मे निजनिर्धारी । म्हणोनि देवो तुमचा आज्ञाधारी । तुम्ही म्हणा त्यातें उद्धरी । येऱ्हवीं हातीं न धरी आनातें ॥ ' ए. भा.–२–७७ ); म्हणून ते वाटेल त्याला महाबोध व तद्वारां मोक्ष देऊं शकतात (' कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडीबांधी करी ॥ ' ज्ञा.–१२–२२०; ' धर्म जागो गुरुमहिमा देहीं दाविला देव । निवारूनी भवरजाळें अवघा निरसला भेव ॥ ' नाथ–३७१३.). ते स्वतः तर वाटेल त्याचा उद्धार करूं शकतातच, परंतु त्यांच्या ठिकाणीं इतकें पावित्र्य असतें कीं, त्यांचें केवळ चिंतन केलें असतां सर्व पातकें नाहींशीं होतात (' तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ॥ ' तुका.–१९८५; ' विपायें जरी आठविला चित्ता । तरी दे आपुली योग्यता । हें असो तयातें प्रशंसिता ॥ लाभु आथि ॥ ' ज्ञा.–६–१०४ ).

**ओवी ७५—नवद्वारें देहीं**– नऊ द्वारांनीं युक्त अशा देहांत.—दोन

डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, तोंड, शिस्न व गुद अशीं शरिरास नऊ छिद्रें आहेत; यांनाच द्वारें म्हणतात. **तो असतुचि परी नाहीं**—तो असतोच; परंतु ( देहतादात्म्यानें ) नसतो.—प्राप्त पुरुषाचा अनुभव 'मी देही म्हणजे देहांत राहणारा, अतएव देहाहून भिन्न' असा असतो; म्हणून देहाचे ठिकाणीं असणारे जे त्रिविध ताप ( आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक ) व पंचक्लेश ( अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश ) यांनीं तो आकळला जात नाहीं. शरिराच्या मागें अनेक अनर्थ आहेत ( 'शरीर दुःखाचें कोठार। शरीर रोगाचें भांडार। शरीर दुर्गंधीची थार। नाहीं अपवित्र शरीराऐसे ॥' तुका.–४३८; 'मग क्लेशतरूची वाडी। जे तापत्रयाग्नीची सगडी। जे मृत्यु-काकासी कुरोंडी। सांडिली आहे॥' ज्ञा.–८–१४०; 'जें वैरियाचा पाहुणेरु। जें दुर्जनाचा आदरु। हें असो जें सागरु। अनर्थांचा॥' ज्ञा.–८–१४९ ) व ते अनर्थ, जो शरिराशीं तादात्म्य करतो त्याला भोगावे लागतात. प्राप्त पुरुषाचा बोध, आपण देहाचे 'प्रकाशक' आहोंत, देहाचा व आपला अर्थाअर्थीं संबंध नाहीं, असा असल्यामुळें तो या दुःखरूप शरिरांत राहूनही दुःख न भोगतां आनंदानें असतो. त्याच्या ठिकाणीं देहाची वार्ताही नसते ( 'देहं च नश्वरमवस्थितमुत्थितं वा सिद्धो न पश्यति यतोऽध्यगमत्स्वरूपम्। दैवा-दपेतमुतदैववशादुपेतं वासो यथा परिकृतं मदिरामदांधः॥' ए. भा.–१३–३६. 'कांहींच मी नव्हे कोणिये गांवींचा। एकटा ठायींचा ठायीं एक॥' तुका.–१९२२; 'तुका म्हणे तुम्ही आइका हो मात। आम्ही या अतीत देहाहूनि॥' तुका.–३५५८ ). **न करी**–करीत नाहीं.—त्याचें देहादिसंघाताशीं तादात्म्य नसल्यामुळें त्याच्याकडून होणारीं कर्में हीं निर्हेतुक व निरहंकार बुद्धीनें होत असल्यामुळें तीं निष्कर्मांतच जमा होतात.

**ओवी ७६—सर्वेश्वर**–परमेश्वर, ब्रह्म.– कर्में करूनही प्राप्त पुरुष अकर्ता कसा असतो ह्याची कल्पना येण्याकरितां ज्ञानेश्वरमहाराज या ओवींत परमेश्वराचा दृष्टांत देतात. परमात्म्याशीं मनानें समरस झालेल्या आत्मानुभवी पुरुषाचें वर्णन करीत असतांना नेहमीं परमात्म्याचीच उपमा देतात ( 'हरी तैसे हरीचे दास।' तुका.–४५१; 'तुका म्हणे सखे। विठोबाच ते सारखे॥' तुका.–१९९१; 'ऐसें तनुत्यागेंवीण। अमूर्ताचे गुण। दिसती संपूर्ण योगयुक्ता॥' ज्ञा.–५–३९ ). वेदान्तशास्त्रामध्यें जगताची उत्पत्ति करणारा

जो ‘ ईश्वर ’ सांगितला आहे व ज्याची व्याख्या ‘ मायाविशिष्टचैतन्य ’ अशी केलेली आहे तो ‘ ईश्वर ’ येथील ‘ सर्वेश्वर ’ या पदानें ग्रहण करावयाचा नाहीं. येथील ‘ सर्वेश्वर ’ या शब्दाचा अर्थ ‘ शुद्धब्रह्म ’ किंवा गीता ज्याला ‘ उत्तम पुरुष ’ म्हणते, तो आहे. ह्या ईश्वराची म्हणजेच ‘ सर्वेश्वराची ’ श्रीज्ञानेश्वरांनीं व्याख्या ‘ ईशितव्येंवीण ईशु ’ अशी केलेली आहे ( ‘ जो प्रकाश्येंविण प्रकाशु । जो ईशितव्येंवीण ईशु । आपणेंनीचि अवकाशु । वसवीत असे जो ।। ’ ज्ञा.–१५–५४५). **निर्व्यापार**-क्रियाशून्य.–व्यापार म्हणजे क्रिया करण्याकरतां कर्त्याला, कर्त्याहून पृथक् असा अवकाश असावा लागतो. परंतु सर्व रूपानें व सर्व ठिकाणीं परमात्माच ओतप्रोत भरलेला असल्यामुळें परमात्म्याच्या ठिकाणीं कोणचीही क्रिया संभवत नाहीं ( ‘ तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया । म्हणौनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा ।। ’ ज्ञा.–१८–९७८.; ‘ सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् । सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ।। ’ गीता– १३–१३ ). **रची**–तयार करतो, निर्माण करतो.–परमात्मा जगत् निर्माण करतो किंवा परमात्म्यापासून जगत् निर्माण होतें असें म्हटलें जातें ( ‘ जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षी देवां संस्थापिलें । एकवीस स्वर्गीतें धरिलें सत्तामात्रें आपुलिया ।। ’ तुका.– २३३८ ; ‘ जयापासोनि सकळ । महीमंडळ जालें ।। ’ तुका.– ३४७२ ; ‘ अव्यक्त निराकार नाहीं त्या आकार । जेथोनी चराचर हरीसी भजे ।। ’ ज्ञा. गा.– ५५०; ‘ यतो वा इमानि भूतानि जायन्ते ।। ’ तैत्ति. उप. ३–१ ). परंतु वास्तविक परमात्मा स्वतः कांहींही करीत नाहीं तर ब्रह्मचैतन्याश्रित असणारी जी त्रिगुणात्मक माया अथवा अविद्या ती परमात्म्याच्या सत्तेनें सर्व सृष्टि निर्माण करते ( ‘ तरी धनुर्धरा धैर्या । निकें अवधान देईं वा धनंजया । पैं सर्व भूतांतें माया । करी हरी गा ।। ’ ज्ञा.–९–९७. ‘ स्थावरा आणि जंगमा । स्थूळा अथवा सूक्ष्मा । हे असो भूतग्रामा । प्रकृतीचि मूळ ।। ’ ज्ञा.– ९–१२१ ).

**ओवी ७७—कर्ता**–करणारा, रचणारा.—कोणत्याही कर्माचें कर्तृत्व येण्याकरतां कर्त्याच्या ठिकाणीं इच्छा, ज्ञान व प्रयत्न असे तीन धर्म असावे लागतात. परंतु परमात्म्याचे ठिकाणीं या तिन्ही धर्मांचा अभाव असल्यामुळें तो जगताचा कर्ता ठरत नाहीं. **म्हणिपे**–म्हणावें.—अविवेकी लोक जगताचा कर्ता परमात्मा आहे असें म्हणतात. ज्याप्रमाणें राजानें नगर तयार केलें असें

लोक म्हणतात; परंतु तें तयार करण्यांत जसें राजाला कोणचेही शारीरिक कष्ट पडत नाहींत, त्याच्या केवळ सत्तेनें नगर तयार होतें; त्याचप्रमाणें जगताची उत्पत्ति परमात्मा करीत नाहीं तर त्याच्या सत्तेनें हें सर्व कार्य प्रकृति करते (' अगा नगर हें रायें केलें। या म्हणणया साचपण कीर आलें। परि निरुतें पाहतां काय शिणले। रायाचे हात ॥' ज्ञा. ९-११०; ' किंबहुना यापरी। मी निजप्रकृती अंगिकारीं। आणि भूतसृष्टी एकसरी। प्रसवोंचि लागे ॥' ज्ञा.-९-११७). **कर्मीं न शिंपे**-कर्मांनीं लिप्त होत नाहीं.—परमात्म्याच्या सत्तेनें सर्व त्रैलोक्याची घडामोड होत असते, परंतु तो त्यापासून अलिप्त असतो (' ब्रह्म न लिंपे त्या मेळें। कर्माअकर्माविेगळें॥' तुका. ३४७६). ज्याप्रमाणें दिवा हा सत्कर्म करणाऱ्यास प्रोत्साहनही देत नाहीं किंवा निंद्य कर्म करणाऱ्यास हरकतही करीत नाहीं; परंतु त्याच्या प्रकाशानें जसे गृहांतील बरे-वाईट सर्व व्यापार चालतात व तो जसा त्याबद्दल उदासीन असतो, त्याचप्रमाणें परमात्म्याच्या सत्तेनें सर्व जगताचे व्यवहार चालतात, पण परमात्मा हा त्या सर्व कर्मांमध्यें उदासीन असतो (' जैसा दीपु ठेविला परिवरीं। कवणातें नियमी ना निवारी। कवण कवणिये व्यापारीं। राहाटे तेंहि नेणे ॥'; ' तो जैसा कां साक्षिभूतु। गृहव्यापारप्रवृत्ति हेतु। तैसा भूतकर्मीं अनासक्तु। मी भूतीं असे ॥' ज्ञा.-९-१२८-२९).

**ओवी ७८—योगनिद्रा**- (ब्रह्माची) सहजस्वरूपस्थिति, स्वरूपनिद्रा.—ज्या ठिकाणीं कोणत्याही उपाधींचा संबंध नाहीं अशी जी केवळ निरुपाधिक अथवा निर्धर्म ' ब्रह्मस्थिति ' तिला ' योगनिद्रा ' म्हणतात. या स्वरूपस्थितीचें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं; कारण त्या ठिकाणीं अस्तिबोधक अथवा नास्तिबोधक या दोन्हीही धर्मांचा लाग लागत नाहीं (' दृश्यपणें देखिजे। कां ज्ञेयत्वें जाणिजे। अमुकें ऐसें म्हणिजे। तें जें नव्हे ॥' ज्ञा.-१५-३०७). ती ब्रह्मस्थिति अज्ञानाने आवृतही होत नाहीं व ज्ञानानें प्रकाशिलीही जात नाहीं (' म्हणोनि ज्ञानें उजळे। कां अज्ञानें रुळे। तैसे नव्हे निर्वाळे। ज्ञानमात्र जे ॥' अमृ.-४-१७). एवढेंच नव्हे, उपाय, दृष्टान्त, लक्षण, अनुभव, इत्यादिकांची तेथें डाळ शिजत नाहीं (' सर्व सिद्धांताचिया उजरिया। सांडोनियां निदसुरिया। आपुलिया हाता चोरिया। आपणची जो ॥' अमृ.-५-३९). परंतु एवढ्यावरून ती वस्तु नाहींच असें म्हणतां येत नाहीं. निर्जन अशा

वनांत एकटा निजलेला पुरुष दुसऱ्याला ज्ञात नसतो व तो झोंपेंत असल्यामुळें त्याचें त्याला स्मरणही नसतें, परंतु ज्याप्रमाणें तो पुरुष नाहीं असें म्हणतां येत नाहीं, त्याचप्रमाणें परमात्मा नाहीं असें म्हणतां येत नाहीं. त्याचें अस्तित्व निरपेक्ष आहे ( ' जो निरंजनीं निदेला । तो आणिकीं नाहीं देखिला । आपुलाहि निमाला । आठउ तया ॥ '; ' परी जीवें नाहीं नोहे । तैसें शुद्ध असणें आहे । हें बोलणें न साहे । आहे नाहींचे ॥ अमृ.— ४–३३–३४ ). जगताचा भ्रम (म्ह. अध्यास) होतो, एवढ्यावरूनच परमात्मा आहे असें सिद्ध होतें, कारण ' मिथ्या ' वस्तूला ' सत् ' अधिष्ठान लागतें व अशी सत् वस्तु एक परमात्माच आहे. पाण्याच्या अस्तित्वावरच ज्याप्रमाणें लाटेची सिद्धि अवलंबून आहे त्याचप्रमाणें परमात्मा हा जर जगताला अधिष्ठान नसता तर जगताची सिद्धि झाली नसती. तात्पर्य, भाव-अभावविरहित पण भावरूप अशी जी केवळ निर्धर्म ' ब्रह्मस्वरूपस्थिति ' तिला ' योगनिद्रा ' म्हणतात ( ' म्हणोनि कांहीं नाहींपण । देखता नोहे आपण । नोहुनि असणेनवीण । असणें जे ॥ अमृ.–४–३१; ' तेवि समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जैं बुडोनि जाये । तऱ्हीं जें नाहीं कीर नोहे । आणि न साहे असणेंही ॥ '; ' पैं विश्व घेऊनि गेला मागेंसीं । तया चोरातें कवण कें गिवसी । जे कोणी एकी दशा ऐसी । शुद्ध ते मी ॥ ' ज्ञा.–१५–४४०–४१ ). **सळु**—न्यूनता, खंड.—या परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं जरी आकार उत्पन्न झालेला व नष्ट झालेला दिसत असला तरी आकारवान् पदार्थाच्या उत्पत्तीबरोबर ब्रह्मवस्तु जन्मरूपी विकाराला पावत नाहीं व आकारवान् पदार्थ नाहींसे झाल्यानें ती नाशही पावत नाहीं. म्हणून जगताची उत्पत्ति व नाश हे जरी ब्रह्माच्या ठिकाणीं भासत असले तरी त्याच्या सहजस्थितींत मुळींच न्यूनता येत नाहीं ( ' आणि आकाराचेनि जालेपणें । जन्मधर्मातें नेणे । आकारलोपीं निमणें । नाहीं कहीं ॥ '; ' ऐशिया आपुलियाची सहजस्थिती । जया ब्रह्माची नित्यता असती ॥ ' ज्ञा.–८–१८–१९ ) **महाभूतांचे दळवाडें उभारी**—महाभूतांचे समुदाय उत्पन्न करतो.—परमात्म्याच्या सहजस्वरूपस्थितींत व अकर्तेपणांत यत्किंचितही बिघाड न होतां परमात्मा हा महाभूतादि सर्व चराचर सृष्टि निर्माण करतो याचा अर्थ त्याच्या सत्तेनें प्रकृति ही सर्व कार्य करते असा आहे ( ' तरी केवळ जे सत्ता । ते पुरुष गा पांडुसुता ।

प्रकृति ते समस्ता । क्रिया नाम ॥ '; 'बुद्धि इंद्रियें अंतःकरण। इत्यादि विकार-भरण । आणि ते तीन्ही गुण । सत्त्वादिक ॥ '; 'हा अवघाचि मेळावा । प्रकृती जाहला जाणावा । हेचि हेतु संभवा । कर्मांचिया ॥ ' ज्ञा.-१३-९६५ ते ९६७) परंतु परमात्मा हा प्रकृतिकार्यानें लिप्त होत नाहीं ('नच मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय। उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥' गीता-९-९ ; 'हें असो पर्वताचिये हृदयींचें। जेविं पर्जन्यधारास्तव न खोंचे । तेविं कर्मजातप्रकृतीचें । न लगे मज ॥' ज्ञा.-९-१२६ ). शिवाय, परमात्मा हा आप्तकाम असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कोणचीही स्पृहा नाहीं व म्हणून त्यानें आपल्या लीलेकरतां ('येकलें न कंठेचि म्हणोनियां येणें। केलीं निर्माण वो चौदाही भुवनें । गगनचंद्र सूर्य मेघ तारांगणें । पांचही महाभूतें भौतिकें भिन्नें भिन्नें वो ॥' निळा-११७४ ). मायेच्या आश्रयानें सृष्टि निर्माण केली असें म्हणतां येत नाहीं. ज्याप्रमाणें ज्वालासह असणें व नसणें हा अग्नीचा स्वभाव आहे ('गुंफी ज्वाळांचिया माळा । लेइलियाही अनळा । भेदाचिया आहाळा । काय पडणें आहे ॥' अमृ.- ७-१३६ ). त्याचप्रमाणें परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं जगताची प्रतीति होणें अथवा न होणें हा परमात्म्याचा 'स्वभाव' आहे अथवा हें त्याचें 'ऐश्वर्य' आहे ('देवस्य महिमा एष ॥'; 'जें अनादिच दृश्यपणें । अनादिच देखणें । हें आतां काय कोणें । रचूं जावें ' ॥ अमृ. ७-१५७ ). अमूर्त व विशुद्ध अशा परमात्म्याचें ठिकाणीं ब्रह्मांडाचे आकार उत्पन्न झाल्यासारखे दिसणें हें त्याचें त्यालाच साधतें ('तैसें अमूर्ती तिये विशुद्धें । महदादि भूतभेदें । ब्रह्मांडाचे बांधे । होंचि लागती ॥' ज्ञा.-८-२१ ; 'अगाध तुझी लीला आकळ कैसेनी कळे ॥' नाथ.-३२८७). प्रस्तुत ओवीमध्यें श्रीज्ञानेश्वरांनीं जगत् हें मायाकार्य नसून तें 'वस्तुस्वभाव' आहे असें ध्वनित केलें आहे ('प्रकाशु तो प्रकाश कीं । यासी न वंचे घेईं चुकी । म्हणोनि जग असकी । वस्तु प्रभा ॥' अमृ.-७-२८९ ).

**ओवी ७९**—**जग**–सृष्टि, विश्व. **जीवीं**–प्राणिमात्रांत.—परमात्मा हा सर्वांच्या हृदयांत आहे ('ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ॥' गीता-१८-६१; 'सर्वांघटीं राम देहादेहीं एक । सूर्य प्रकाशक सहस्ररश्मी ॥' ज्ञा. गा.-५६२ ; 'घटीं अलिप्त असे रवि । अग्नि काष्ठामाजी जेवीं । तैसा

नारायण जीवीं । जीवसाक्षी वर्तनें ॥' तुका.–३५८६ ; 'विश्वाचें जीवन तें म्यां सार देखियलें ।' ज्ञा. गा.–६ ). परंतु सूर्य जसा घटांतील पाण्यांत जरी प्रतिबिंबित झालेला असला तरी त्यापासून अलिप्त असतो, तसा परमात्मा हा जरी सर्वांच्या हृदयांत राहत असला तरी तो त्यांच्यापासून अलिप्त असतो ('सूर्य नाहीं जागें करीत या जना । प्रकाशकिरणा कर म्हण ॥' तुका.–१९८० ). **कहीं नोहे**–कधींही लिप्त होत नाहीं.—परमात्मा हा जरी आकाशाप्रमाणें सर्वव्यापक असला ('तुजवीण एकादियाकडे । परमाणुही एतुला कोडें । अवकाशु पाहतसें परि न सांपडे । ऐसें व्यापिलें तुवां ॥' ज्ञा.–११–२७२ ; 'तो नाहीं ऐसा ठाव उरला कवण । सर्वत्र संपूर्ण गगन जैसे ॥' नामा–६२२ ), तरी तो प्राणिमात्रांच्या गुणदोषांनीं लिप्त होत नाहीं ('परि ते अवकाश जैसे । नोहिजतीचि कां आकाशें । जे विकार होऊनि तैसें । विकारी नोहे ॥' ज्ञा.–१३–८९८ ). परमात्मा हा अविकारी आहे ('हा गुणत्रया-रहितु । व्यक्तीसी अतीतु । अनादि अविकृतु । सर्वरूप ॥'. ज्ञा.–२–१५० ). एवढेंच नव्हे तर त्याच्या सत्तेनें जगताची उत्पत्ति, स्थिति व लय होत असतांही त्याची त्याला जाणीवही नसते.

**ओवी ८०—पासीं असतु न देखे**–जवळ असतांना पाहत नाहीं.—पापपुण्यात्मक वासना या अंतःकरणांत राहतात. प्रथमतः अंतःकरणांत पुण्यात्मक अथवा पापात्मक वृत्ति उत्पन्न होते व नंतर तिचेंच रूपांतर तदनुसार क्रियेंत होतें ('आवडे ते वृत्ती किरीटी । आधीं मनौनी उठी । मग ते वाचे दिठी । करांसी ये ॥' ज्ञा.–१३–२९८ ). परमात्माही सर्वांच्या अंतःकरणांतच राहतो ('तैसा हृदयामध्यें मी रामु ।' ज्ञा. ९–६० ) व तोच सर्वांच्या अंतःकरणाला अधिष्ठान आहे. अंतःकरणविशिष्टचैतन्यालाच प्रमाता अथवा जीव म्हणतात. तात्पर्य ; परमात्मा हा प्राणिमात्राकडून होत असलेल्या पाप-पुण्याच्या अगदीं सन्निध असतो ('हे चैतन्याचे शेजारीं । वसती ज्ञानाच्या एका हारीं ॥' ज्ञा.–३–२५६ ). तरीपण परमात्मा हा कोणाचें पापही जाणत नाहीं व पुण्यही जाणत नाहीं. तो त्यापासून अलिप्त असतो. ज्याप्रमाणें दिवा हा त्याच्या प्रकाशांत होणाऱ्या पापपुण्यात्मक कर्मांच्या अगदीं सन्निध असतांना तो त्या कर्मांना जाणत नाहीं, त्याचप्रमाणें परमात्मा हाही प्राणिमात्राकडून होणाऱ्या सर्व पापपुण्यात्मक कर्मांच्या अगदीं जवळ असतांना, किंबहुना त्याच्याच सत्तेनें

जगताचे सर्व व्यवहार चालले असतांना तो त्यांना जाणत नाहीं. **साक्षी**–द्रष्टा. **न ठके**—राहत नाहीं.—कोणच्याही व्यवहाराला 'साक्षी' राहण्यानेंही कित्येक वेळां त्रास होतो. साक्षी राहिलें असतां मनुष्याला प्रसंगविशेषीं न्यायकचेरींत जावें लागतें. परमात्मा हा कोणाच्याही कर्माला साक्षी होऊन राहत नाहीं. मग तो कर्मांचा कर्ता व भोक्ता कसा होणार? परमात्मा हा साक्षी आहे, द्रष्टा आहे असें जें म्हटलें जातें त्याचा अर्थ, ज्याप्रमाणें आकाशांत सर्व व्यवहार होतात परंतु आकाश जसें सर्व बाबतींत उदासीन व अलिप्त असतें त्याचप्रमाणें परमात्म्याच्या सत्तेनें सर्व व्यवहार होतात, परंतु परमात्मा हा सर्व व्यवहारांत उदासीन व अलिप्त असतो, ('ऐसा जो समर्थु। तो मी जगाचा नाथु। आणि गगनाऐसा साक्षीभूतु। तोही मीचि॥' ज्ञा. ९–२८५ ). परमात्म्याहून जर कांहीं भिन्न असतें तर तो त्याचा साक्षी ठरला असता. परमात्मा हा सूर्याप्रमाणें वेगळा राहून जगताचें प्रकाशन करीत नाहीं तर तो अभेदत्वानें सर्व जगताचा प्रकाशक आहे.

**ओवी ८१—मूर्त होऊनि**–साकार होऊन, देहधारी होऊन.—वास्तविक परमात्मा हा निर्गुण, निराकार व उन्मनी अवस्थारूप असा आहे ('जें आकाराचें पैल तीर। जें नादाची पैल मेर। तुर्येचें माजघर। परब्रह्म जें॥' ज्ञा. १३–१०७३; 'जें उन्मनियेचें लावण्य। जें तुर्येचें तारुण्य। अनादि जें अगण्य। परमतत्त्व॥' ज्ञा. ६–३२० ). परंतु तो धर्मरक्षणार्थ व भक्तानुग्रहार्थ मायेचा आश्रय करून अवतार घेतो म्हणजे सगुण साकार होतो. ('यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥' गीता ४–७). साधकबाधक व्यवहार होण्याकरतां नेहमीं समान सत्ता लागते. भक्त हे व्यावहारिक सत्तेंत असल्यामुळें भगवंत हा आपली पारमार्थिक सत्ता टाकून, भक्ताकरतां व्यावहारिक सत्तेंत येतो म्हणजे देहधारी होतो. **खेळे**–क्रीडा करतो, व्यापार करतो.—भक्तांचें पुण्य व दुर्जनांचें पाप असा पापपुण्यरचित भगवंताचा विग्रह असल्यामुळें त्याच्यापासून भक्तांना सुख मिळतें व दुर्जनांचा नाश होतो. ('भक्ता राखे पायांपाशीं। दुर्जनासी संहारी॥' तुका.–२९४६ ). भगवंत हे अवतार घेऊन धर्मरक्षणार्थ अनेक कर्में करतात; तरीपण त्यांच्या अमूर्तपणांत यत्किंचितही बिघाड होत नाहीं. ('यादवांचा पोर एक गोप्या भला। तो बहुताचि खेळ खेळलारे। लहान थोर अवघे मारिलीं। खेळचि मोडुनि गेला

रे ॥' नामा.–२२४५ ), **न मैळे**–मळत नाहीं.—परमात्म्याच्या अजत्वपणांत कर्मीपणा येत नाहीं. ( 'माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें । हें अविकार जो जाणे । तो परममुक्त ॥' ज्ञा. ४–५८, 'आणि आकारा आलिया जयाचें । निराकारपण न वचे ॥' ज्ञा. –८–१८०; 'सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा। निराहारी दुर्वासा नवल नव्हे ॥' तुका.–७१० ). शिवाय, सगुण व निर्गुण हीं दोन्ही रूपें परमात्म्याचींच आहेत. जसें थिजलेलें तूप व पातळ तूप हीं दोन्ही एकच होत ( थिजावें कीं विघरावें । हें अप्रयोजक आघवें । घृतपण नव्हे । अनारिसें ॥' अमृ.–७–२४२ ; 'दोन्ही टिपरी एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे ॥' तुका.–२३६ ; 'सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाहीं नामीं॥' तुका.–२२६९ . **दादुला**—मर्द, समर्थ, शूर पुरुष.—शास्त्रीय परिभाषेंत जो स्वतंत्र असतो म्हणजे प्रकृतितंत्र नसतो त्याला समर्थ पुरुष अथवा दादुला म्हणतात. परमात्मा हा प्रकृतीचा स्वामी होण्यास्तव ( 'प्रकृतीही कां अधीनी । हृदयस्था जया ॥' ज्ञा.–१८–१३१८ ). दादुला हा शब्द त्याच्या बाबतींत अन्वर्थक ठरतो.

**ओवी ८२—अज्ञान**—अजाणतेपण, भ्रमात्मक ज्ञान, ज्ञानाचा अभाव.—जगतामध्यें लोक म्हणतात कीं, परमात्मा हा ब्रह्मदेवाच्या रूपानें जगत् उत्पन्न करतो, विष्णूच्या रूपानें पालन करतो व रुद्राच्या रूपानें संहार करतो, परंतु हें त्यांचें सर्व म्हणणें केवळ अज्ञानांतील आहे. वास्तविक सर्व ठिकाणीं व सर्व रूपानें परमात्माच असतांना ( 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म', 'नेहनानास्ति किंचन॥' बृह. उ. ) तेथें कोणी कोणाला निर्माण करावें ? ( 'आमुचा प्रकृतीपैलीकडील भावो । जरी कल्पनेवीण लागसी पाहों । तरी मजमाजि भूतें हेंही वावो । जे मी सर्व म्हणउनी ॥' ज्ञा.–९–७१ ). जगताची उत्पत्ति, स्थिति व लय परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं भासणें हा केवळ त्या वस्तूचा स्वभाव आहे. ( 'देवस्यैष स्वभावोऽयम्'।). ज्याप्रमाणें ज्वाळा ही अग्नीहून वेगळी नाहीं त्याप्रमाणें जगत् हें परमात्म्याहून वेगळें नाहीं किंतु जगत् हें परमात्माच आहे. ( 'म्हणोनि जग असकी । वस्तु प्रभा ॥'. अमृ. ७–२८९ ; 'म्हणोनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचिं केवळ । तेवीं मी गा सकळ । संबंधु वावो ॥' ज्ञा.–१४–१२२ ; 'म्हणोनि जगपरौतें। सारूनि पाहिजे मातें । तैसा नोहे उखिते । आघवें मीचि ॥' ज्ञा.–१४–१२७ ). परंतु असा अनुभव येण्याकरतां

प्रथमतः परमात्म्याचें व जगताचें व्यतिरेकानें यथार्थ स्वरूप कळावें लागतें. हें समजल्यानंतर ज्याला ब्रह्मस्वरूपाचा अपरोक्षरीत्या अनुभव येतो त्यालाच सर्व जगतांत परमात्म्याचा अन्वय आहे असें दिसतें.

**ओवी ८३—अज्ञान**–( परमात्मा हा जगताची उत्पत्ति, पालन व संहार करतो अशी ) भ्रमात्मक समजूत. **मसैरें**–( ढगाची ) काळोखी, काजळ, अंधकार.—काजळी ही ज्याप्रमाणें प्रकाशावर आवरण घालते त्याप्रमाणें भ्रांति ही यथार्थ ज्ञानावर आवरण घालते. **फिटे**–नष्ट होतें. **अकर्तृत्व**–अकर्तेपणा.– ज्याचें अज्ञान ज्ञानानें नष्ट झालेलें आहे, ज्याला सर्व ठिकाणीं व सर्व रूपानें परमात्माच नटलेला आहे व परमात्म्यावांचून दुसरें कांहींच नाहीं, असें अपरोक्षरीत्या अनुभवास आलेलें आहे, त्याला परमात्म्याहून जगत् वेगळें असें दिसतच नाहीं. म्हणून त्याला परमात्म्याचें अकर्तृत्व वास्तवरूपानें पटतें (‘ तेचि कल्पना सांडूनि पाहीं । तरी मी भूतीं भूतें माझिया ठायीं । हें स्वप्नीं- ही परि नाहीं । कल्पावयाजोगें ॥ ’ ज्ञा.–९–८२ ; ‘ तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपीं केहीं न जाये । जैसा रात्री दिवसें नोहे । द्विधा रवि ॥ ’ ज्ञा.–१५–५५४ ).

**ओवी ८४—आदीचि**—मुळांतच.–जीव हा मूलतः परमात्माच आहे (‘ तुका म्हणे कैंची कींव । कोठें जीव निराळा । ’ तुका.–३५६३; ‘ तुका म्हणे हा तो स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥ ’ तुका.–२७६८; ‘ जीवो ब्रह्मैव नापरः । ’ ). त्याला जीवत्वदशा ही देहाहंकाराच्या योगानें प्राप्त होत असते, परंतु हा देहाहंकार आत्मानात्मविवेकाच्या योगानें ज्याच्या ठिकाणचा समूळ नष्ट झाला व मी आत्मा आहें, असें ज्याच्या अनुभवास आलें त्याला आत्मा म्हणजे परमात्मा ज्याप्रमाणें अकर्ता आहे त्याचप्रमाणें मीही अकर्ता आहें, असें प्रत्ययास येतें.

**ओवी ८५—भेद**–भिन्नता, द्वैत.—ज्याप्रमाणें स्वप्नाला कारण निद्रा आहे त्याप्रमाणें भेदप्रतीतीला कारण अज्ञान आहे. अज्ञानामुळें मनुष्याच्या ठिकाणीं अहंकार उत्पन्न होतो व मग तो आपल्याला देहच समजूं लागतो ( ‘ तैं अज्ञान एक रूढे । तेणें कोहं विकल्पाचें मांडें । मग विवरूनि कीजे फुडें । देहो मी ऐसें ॥ ” ज्ञा.–१५–३४२ ). ‘ मी देह आहें ’ असें समजणें यालाच

जीवत्वदशा म्हणतात व ह्या जीवत्वदशेबरोबरच विश्वाची कल्पना उठत असते. जीवत्वदशेचा निरास झाला कीं त्याबरोबर विश्वकल्पनेचाही निरास होतो. ज्याच्या ठिकाणचा अहंकार अज्ञानासह नाहींसा झालेला आहे त्याच्या ठिकाणीं भेदप्रतीति राहत नाहीं ('एथ भेदु तरी कीं देखावा। जरी अहंभाव उरला होआवा। तो आधींचि नाहीं आघवा। आतां विषय काई॥' ज्ञा.–५–९९). **प्रतीतो**–अनुभवानें.—तो आपल्या अनुभवानुरूप सर्व जगच मुक्त आहे असें पाहतो. आपण ज्या जातीचे असलों तसें जग दिसतें. आपलें जागृतींत ज्या वेळेस स्थूल शरिराशीं तादात्म्य असतें त्या वेळेस आपल्याला जग स्थूल दिसतें, ज्या वेळेस आपण स्वप्नांत म्हणजे सूक्ष्मांत शिरतों, त्या वेळेस जग सूक्ष्म दिसतें व आपण झोंपेंत असलों म्हणजे त्या वेळीं आपल्याला जगताची प्रतीति येत नाहीं. किंबहुना ज्याचें ज्या जातीचें अंतःकरण असतें तसें त्याला जगत् दिसतें. उदाहरणार्थ, दुर्योधनाला सर्व जगत् दुर्जन दिसे व धर्मराजाला सर्व जगत् सज्जन दिसे. आंधळ्याला जसें सर्व जगत् आंधळें दिसतें तद्वतच जो आत्मरूप झालेला असतो त्याला सर्व जगत् आत्मरूपच दिसतें ('तैसा आत्मत्वें वेष्टिला होये। तो जयातया दृश्यातें पाहे। तें दृश्य द्रष्टेपणेंसी होत जाये। तयाचेंचि रूप॥' ज्ञा.–१८–४१०; 'होईल जाला अंगें देव जो आपण। तयासी हे जन अवघे देव॥' तुका.–३८०१; 'देखती जे डोळे। रूप आपुलें ते खेळे॥ तुका.–३६७८). आपली दृष्टि गुणावर व आकारावर असते, परंतु प्राप्तपुरुषाला सर्व ठिकाणीं आत्मवस्तूचेंच दर्शन होतें. सूर्याला ज्याप्रमाणें अंधकाराची प्रतीति नाहीं त्याप्रमाणें बोधसंपन्न पुरुषाला द्वैताची प्रतीति नसते. ('लोहाचें सांकडें परिसा। न जोडे अंधारु रवि जैसा। द्वैतबुद्धीचा तैसा। सदा दुकाळ जया॥' ज्ञा.–१५–२९२). त्याला विषय हा विषयरूपानें प्रतीत होत नाहीं किंतु वस्तुरूपानेंच प्रतीत होतो ('तैसा उदैलियानि विषयें। ज्ञानी विषयीं हो लाहे। तंव दोन्ही न होनि होये। काय नेणों॥' अमृ.–९–२५; 'भूतीं देव म्हणोनि भेटतो या जना। नाहीं हे भावना नरनारी॥' तुका.–१८५७; 'जनातें जनें देखतां। द्रष्टाचि दृश्य तत्त्वतां। कोण्ही न होनि आइता। सिद्धांताचि हा॥' अमृ. १०–१०) [ज्याच्या ठिकाणीं आत्मज्ञानाचा उदय झालेला आहे अशा पुरुषाला, सर्व ठिकाणचें अज्ञान नष्ट

होऊन त्या ठिकाणीं आत्मप्रकाश कसा दिसतो, याची कल्पना येण्याकरतां श्रीज्ञानेश्वरमहाराज पुढच्या ओवींत सूर्याचा दृष्टान्त देतात ].

**ओवी ८६—राउळीं**—राजवाड्यांत. **दिवाळी**—प्रकाश, लखलखाट.-सूर्याला सर्व दिशा प्रकाशमय करण्याकरतां प्रत्येक दिशेस स्वतंत्रपणें उगवावें लागत नाहीं. तो पूर्व दिशेस उगवल्याबरोबर ज्याप्रमाणें इतर सर्व दिशांतील अंधकार नाहींसा होतो, त्याप्रमाणें ज्या पुरुषाच्या अंतःकरणरूपी पूर्वदिशेस आत्मज्ञानरूपी सूर्य उगवला आहे त्याला सर्व ठिकाणीं आत्मप्रकाशच दिसतो म्हणजे आत्म्याचेंच दर्शन होतें ( ' चेइलिया आपुलें ज्ञान । जैसे नाहींचि होय स्वप्न । तैसें स्फुरतें जया त्रिभुवन । वावों जालें ॥ ' ज्ञा.–१५–५५९ ; ' मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिद्धु । जो आपणेनसी भेदु । नेणोनि जाणे ॥ ' ज्ञा. –१५–५६२ ; ' येऱ्हवीं आडोळलिया डोळा । शिवदर्शनाचा सोहळा । भोगिजे भलते वेळां । भलतेणें ' ॥ अमृ. ९–१५ ). ह्याच्या ठिकाणीं ज्ञानाची दिवाळी झाल्याकारणानें तो जिकडे पाहील तिकडे त्याला ज्ञानच दिसतें ( ' जो हा विज्ञानात्मकु भावो । तया विवरिता जाहला वावो । मग लागला जंव पाहों । तंव ज्ञान तें तोचि ॥ ' ' आतां व्यापकु कीं एकदेशी । हे ऊहापोही जे ऐसी । ते करावी ठेली आपैशी । दुजेनवीण ॥ ' ज्ञा.–६–८८–८९ )

**ओवी ८७**—प्रस्तुत ओवी श्रीज्ञानेश्वरांची दिसत नाहीं. श्रीज्ञानेश्वरांची ओवी सामान्यतः साडेतीन चरणांची असते ; पण ही ओवी चार चरणांची आहे. शिवाय ८६ व्या ओवींत दृष्टान्त आला आहे व त्यानंतर लगेच द्राष्टान्त यावयास पाहिजे. असा द्राष्टान्त ८८ व्या ओवींत आला आहे. अतएव ही ओवी कोणीतरी मागाहून घातली असावी व ती श्रीएकनाथमहाराजांची असावी असें दिसतें. परंतु श्लोकार्थाची परिस्फुटता होण्यास या ओवीची आवश्यकता आहे. **बुद्धिनिश्चयें**–बुद्धीच्या निर्णयानें.—मनुष्याच्या जवळ जी साधनसामुग्री आहे त्यांत बुद्धीला प्राधान्य आहे. विशेषतः आत्मप्रातीच्या साधनांत बुद्धीला फार महत्त्व आहे. ( ' आत्मनिश्चयाची बरव । जया आरिसा पाहे सावयव ॥ ' ज्ञा.–१८–६९१ ). इतर इंद्रियांनीं केलेल्या साधनांचा परिणाम जर बुद्धीवर होत नसेल तर त्यांचा परमार्थांत फारसा उपयोग होत नाहीं. श्रुति, स्मृति व संत हे परमात्मा सर्व विश्वांत व्यापून आहे ( ' विठ्ठल विस्तारला

जनीं । सप्तही पाताळें भरूनी । विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥' तुका.-४३१ ). असें सांगूनही, परमात्मा हा सर्वांच्या अंतःकरणांत राहतो असें सांगतात. असें सांगण्याचें कारण त्याला अनुभवण्याचें ठिकाण हें अंतःकरण अथवा बुद्धिच होय. गाईच्या सर्व शरिरांत दूध आहे, पण तत्प्राप्तीकरतां ज्याप्रमाणें गाईच्या कासेलाच हात घालावा लागतो किंवा, पृथ्वी गंधरूप आहे, परंतु गंधाचा आस्वाद घेण्याकरतां ज्याप्रमाणें फुलांचा आश्रय करावा लागतो, त्याप्रमाणें आत्मा हा जरी सर्व ठिकाणीं व्याप्त असला तरी त्याचा अनुभव येण्याकरितां बुद्धीचाच आश्रय करावा लागतो ( 'एष सर्वेषु भूतेषु गूढोत्मा न प्रकाशते । दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥' कठ. उप.-१, ३, १२ ). परमात्म्याची व्याप्ति जरी सर्वांच्या अंतःकरणात असली तरी त्याची प्रतीति सत्त्वसंपन्न अंतःकरणांत अथवा बुद्धींत येते. रजोगुणी अथवा तमोगुणी बुद्धींत त्याची प्रतीति येत नाहीं. तात्पर्य, ज्या बुद्धिरूप आरशामध्यें जीव हा आपल्या आत्मस्वरूपाची शोभा पाहूं शकतो, तो बुद्धिरूप आरसा स्वच्छ असावा लागतो. एवढ्याकरतां प्रथमतः बुद्धि शुद्ध करावी लागते ( 'एकी जाती तव्या आरिशासी । आरिसां उपलब्धि तवां मसी । तेवी चित्त-शुद्धि परमार्थासी । विकल्पवंतासी अभावो ।' हस्तामलक-२७५ ). निष्कामकर्म व उपासना यांनीं बुद्धीच्या ठिकाणचे असलेले मल ( म्ह. पापवासना ) व विक्षेप ( म्ह. चंचलता ) हे दोन दोष नाहींसे होतात. म्हणून साधक हा प्रथमतः निष्कामकर्म व उपासना करून बुद्धींतील मल व विक्षेप हे दोष घालवितो, व ईशप्रसादानें प्राप्त झालेल्या वैराग्याच्या योगानें अंतःकरणांतील विषयांच्या वासना अथवा संस्कार नष्ट करतो ( 'एऱ्हवीं स्वकर्माचेनि वन्ही । काम्यनिषिद्धाचिया इंधनीं । रजतमें कीर दोन्ही । जाळिलीं आधीं ॥' ज्ञा.-१८-९९२ 'आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पूनि बळ । घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद ॥' ज्ञा.-१८-९९५, 'तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय दवडूनि बाहिरें । शरीरीं एकंदरें । केलें मन ॥' ज्ञा.-५-१५१ ). परंतु अंतःकरणशुद्धि व वैराग्यलाभ जरी झाला तरी देहतादात्म्य नष्ट होत नाहीं. एवढ्याकरतां साधकाला नित्यानित्यवस्तुविवेक म्हणजेच आत्मानात्मविवेक करावा लागतो ('नित्यानित्यविवेक-व्युत्पत्ती । इहामुत्रफलभोगविरक्ती । शमदमादि संपत्ती । अढळ चित्तीं दृढ होवावी ॥' हस्तामलक-२७७). संत्संगतीनें व सच्छास्त्रश्रवणानें आपण 'आत्मा'

आहोंत व आत्मा हा 'सच्चिदानंदरूप' आहे असें त्याला परोक्ष ज्ञान झालेलें असतें. नंतर तो आत्म्याचें 'सदत्व' लक्षण हें देहादि 'अनात्म' वस्तूंच्या ठिकाणीं जुळतें कां ? असा तो विचार करूं लागतो. वर्तमान, भूत व भविष्य या तीन कालांपैकीं देहाचें अस्तित्व फक्त वर्तमानकालांतच असतें म्हणून देह हा 'सत्' नाहीं, अतएव 'तो मी नाहीं' असा साधक निश्चय करतो ("देह आधीं काय खरा। देहसंबंधपसारा। बुजगावणें चोरा। रक्षणसें भासतें॥' तुका.-२७३३) त्याचप्रमाणें इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि ह्यांपैकींही मी कोणी नाहीं असें तो विचारानें ठरवितो ('देह नव्हें मी जडमूढत्वें। इंद्रियें नव्हें मी एकदेशत्वें। प्राण नव्हें मी चपळत्वें। मन चंचलत्वें कदा मी नव्हे॥'; चित्त नव्हें मी चेतकत्वें। बुद्धि नव्हें मी बोधकत्वें। अहं नव्हें मी बाधकत्वें। मी तो आदि अनादिसिद्ध॥' ए. भा. २५-३५३-५४; 'न त्वं देहो नेंद्रियाणि न प्राणो न मनो न धीः। विकारित्वाद्विनाशित्वाद् दृश्यत्वाच्च घटो यथा' सदाचारानुसंधानम्-२१). याप्रमाणें पंचकोश व तीन देहांचा तो निरास करतो (अधिक माहिती १२ अध्याय प्रकरण २ रें पान १२४-१२५ पहा). अशा प्रकारें जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांतून प्रतीत होणारा जो स्थूल, सूक्ष्म व कारणरूप प्रपंच तो मी नसून या तिन्ही अवस्थेंत अनुस्यूत असलेला, सर्वांचा प्रकाश असा जो आत्मा, तो मी आहें अशा बुद्धीच्या निश्चयावर तो येतो ('यो जागरे बहिरनुक्षणधर्मिणोऽर्थान् भुङ्क्ते समस्तकरणैर्हृदि तत्सदृक्षान्। स्वप्ने सुषुप्त उपसंहरते स एकः स्मृत्यन्वयात् त्रिगुणवृत्तिदृगिंद्रियेशः॥ ए. भा. १३-श्लो. ३२. 'कोणी एकु सुभटा। विचाराचा आगिटां। आत्मनात्मकिटा। पुटें देउनी॥'; छत्तीसही वानी भेद। तोडोनियां निर्विवाद। निवडती शुद्ध। आपणपें॥' ज्ञा.-१३-१०३६-३७). **ब्रह्मरूप भावी**—ब्रह्मरूप मानतो म्हणजे 'मी ब्रह्म आहें' असें चिंतन करतो.—मी आत्मा आहें असा साधकानें जरी निश्चय केला तरी अनेक जन्मांच्या संस्कारामुळें व अध्यासामुळें त्याच्या ठिकाणीं मधून मधून प्रमेयगत-असंभावना (म्ह. जीव व ब्रह्माचा अभेद सत्य आहे किंवा भेद सत्य आहे याविषयीं संशय) व विपरीत-भावना (म्ह. देह सत्य आहे व जीव-ब्रह्माचा भेदही सत्य आहे असा विपरीत निश्चय) उत्पन्न होत असतात (अधिक माहिती वेदान्त-प्रकरण, ओ. ७१ पहा) हे संशय

घालविण्याकरितां साधक हा ' अहंग्रह ' ध्यान करतो म्हणजे ध्येय जें ब्रह्म त्या ब्रह्माचा आपल्याशीं अभेद करून चिंतन करतो. ('पैं ध्याता आपणचि परी। ध्यानरूप वृत्ति माझारीं। ध्येयत्वें घे हे अवधारीं। ध्यान रूढी गा॥' ज्ञा.-१८-१०३३ ). **ब्रह्मनिष्ठा राखे**— 'ब्रह्मस्थिति राखतो', म्हणजे ध्येयरूपता प्राप्त होईपर्यंत अहंग्रह ध्यानाची तो सातत्यता राखतो. ('तेथ ध्येय ध्यान ध्याता। ययां तिहीं एकरूपता। होय तंव पंडुसुता। की जे तें गा॥' ज्ञा.-१८-१०३४ ). अशा सातत्यतेच्या परिपाकास निदिध्यासन म्हणतात ('सिंधू आणि जळधरा। माजीं लागली अखंड धारा। तैसी वृत्ति वीरा। प्रवर्ते ते॥' ज्ञा.-१४-३८९ ). श्रुतीनेंही आत्मरूपता प्राप्त होण्याकरतां 'निदिध्यासन' करावें असेंच सांगितलें आहे ('आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेयी' बृह. उप. २, २, ५ ). अशा प्रकारें ध्यानानें ब्रह्मरूपता प्राप्त करून ('तुका म्हणे सुख देहनिरसनें। चिंतन चिंतनें तद्रूपता॥' तुका.-३७४१ ). घेतल्यानंतर साधकाला परमात्म्याच्या 'अन्वयाचा' म्हणजे 'सर्व ठिकाणीं व सर्व रूपानें परमात्माच नटलेला आहे अशा अनुभवाचा' प्रत्यय येतो.

**ओवी ८८—ऐसें**-अशा प्रकारचें ( म्ह. संशयविपर्ययरहित ज्ञान अथवा दृढ अपरोक्ष ज्ञान ). **व्यापक**— अमर्यादित, सर्वव्यापक.— सर्व ठिकाणीं 'मीच मी' ओतप्रोत भरलेलों आहें, अशा व्यापक ज्ञानावर जो येतो त्याला सर्व ठिकाणीं परमात्म्याचेंच दर्शन होतें ( तुका म्हणे जें जें भेटे। तें तें वाटे मी ऐसें॥ तुका.-४०५७ ). आत्मज्ञान प्राप्त होऊन जर सर्व ठिकाणीं 'सम-दर्शन' म्हणजे वस्तुदर्शन होत नसेल, तर तें खरें ज्ञानच नव्हे ('म्हणोनि ज्ञान जेतुलें दावी। तेतुली ही वस्तुचि आघवी। ते देखे ऐसी व्हावी। बुद्धि चोख॥' ज्ञा.-१३-६२८ ). 'मी ब्रह्म आहें' अशा बोधावर जो पुरुष येतो त्याला सर्व जग ब्रह्मच दिसतें ('तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे। आणि शांतीचा अंकुर फुटे। मग विस्तार बहु प्रगटे। आत्मबोधाचा॥'; 'मग जेउती वास पाहिजे। तेउती शांतीचि देखिजे। तेथ अपारा पारु नेणिजे। निर्धारितां॥' ज्ञा.-४-१९०-९१ ). **गिंवसित**—शोधित.—ही ज्ञानेश्वरांची 'अपूर्वता' वर्णन करण्याची एक विशिष्ट प्रकारची भाषाशैली आहे. अशा आपणहून हृद-यांत शिरणाऱ्या ज्ञानाला 'घरघुसें' ज्ञान म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं ('तया-

तेंचि गिंवसित । तें ज्ञान पावे निश्चित । जयामाजि अचुंबित । शांति असे ॥' ज्ञा.-४-१८९ ). **समतादृष्टि**—अभेददृष्टि—त्याला सर्व ठिकाणीं 'सम' दिसतें असें म्हणण्याऐवजीं त्याला सर्व ठिकाणीं 'एकच' म्हणजे 'आत्म-वस्तु' दिसते असे म्हणण्यास हरकत नाहीं. सर्व जाती एक करून जी 'समता' केली जाते ती भिन्नत्वांतील समता आहे, पण सर्व ठिकाणीं एकच एक परमात्मा दिसणें ही अभिन्नत्वांतील समता आहे ('उदया येतां गभस्ती । नाना नक्षत्रव्यक्ती । हारवीजती दीप्ती । आंगिका जेवीं ॥'; 'तेवीं उठलिया आत्मप्रथा । हे भूतभेद व्यवस्था । मोडीत मोडीत पार्था । वास पाहे तो ॥' ज्ञा.-१८-१०९७-९८; 'भूतीं देव म्हणोनि भेटतो या जनां । नाहीं हे भावना नरनारी ॥' तुका.-१८५७ ). ही समदृष्टि ज्याला प्राप्त होते त्याच्या ठिकाणचे शोक व कामना नष्ट होतात ('तेव्हां आत्मत्वें शोचावें । कांहीं पावावया कामावें । हें सरलें समभावें । भरितें तया ॥' ज्ञा.-१८-१०९६ ).

**ओंवी ८९—आपणपें**-आपणाला, स्वतःला. **देखती**-पाहतात.-आपण जसें असावें तसें जग दिसतें. 'मी ब्रह्म आहें' असा ज्याला अनुभव आलेला असतो त्याला सर्व जग ब्रह्मरूपच दिसतें ('आदौ ब्रह्माहमस्मीत्यनुभव-उदिते खल्विदं ब्रह्म पश्चात्'-शतश्लोकी-२, 'मग जयातयाकडे । ब्रह्मेंचि दिठी उघडे । किंबहुना जोडे । अपार सुख ॥' ज्ञा.-१३-१०८७ ). परीस हा ज्याप्रमाणें कोणच्याही प्रकारच्या लोखंडाला लागला असतां त्याला उत्तम प्रकारचें सोनें करतो त्याप्रमाणें याची दृष्टि जरी भिन्न भिन्न प्रकारच्या व जातीच्या वस्तूंवर पडली तरी तिला सर्व ठिकाणीं वस्तुदर्शनच होतें ( ते जैशी निर्वाण वर्णुचि करी । तैशी जयाचि बुद्धी चराचरीं । होय साम्याची उजरी । निरंतर ॥' ज्ञा.-६-९७ ).[ ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं द्वैतबुद्धीचा अभाव कसा असतो याची कल्पना येण्याकरितां श्रीज्ञानेश्वरमहाराज ९० ते ९२ ओंव्यांतून दृष्टांत देतात ].

**ओंवी ९०—कवातिकें**-गमतीनें, कौतुकानें, लीलेनें.—**कहींचि**-केव्हां-ही.—खरें भाग्य तेंच कीं, ज्या भाग्याला स्वप्नांतसुद्धां दारिद्र्य दिसत नाहीं. प्रपंचांतील भाग्याला खरें भाग्य म्हणतां येत नाहीं. कारण, त्याच्यामागें नाश असतो ('जेथ मंगळाचिया अंकुरीं । सवेंचि अमंगळाचि पडे पारी । मृत्यु उदराचिया परिवरीं । गर्भु गिंवसी ॥' ज्ञा.-९-५०३; 'भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतांपायीं ॥' तुका.-२१३८ ). **एवढा**

मोठा भाग्यवान् रावण, परंतु त्याच्या संपत्तीचाही कालांतरानें नाश झाला ('तुका म्हणे त्याची संपदा एवढी। सांगातें कवडी गेली नाहीं ॥' तुका.–३१४२; 'तुका म्हणे धन। भाग्य अशाश्वत जाण ॥' तुका.–३१३२). तात्पर्य, सांसारिक भाग्य अशाश्वत असल्यामुळें शाश्वत व आनंदरूप असा जो आत्मा त्याचा लाभ ज्याला झाला तोच खरा भाग्यवान होय ('तुका म्हणे भाग्य या नांवें म्हणिजे। संसारीं जन्मीजे याचिलागीं ॥' तुका.–३५५१). **भ्रांति**–भ्रम, मिथ्याज्ञान.—विचाराच्या अभावांत भ्रम असतो. विचाराच्या पुढें भ्रांति अथवा भ्रम टिकत नाहीं ('आणिकही एक असे। जें विचारावेळे न दिसे। वार्ती पाहतां जैसें। आंधारें कां ॥' ज्ञा.–१४–७२).

**ओवी ९१—वानी**—मासला, प्रकार. **स्वप्नीं**—स्वप्नांत—सूर्याला अंधकार ही काय चीज आहे ह्याची कल्पनाच नसते ( मग सूर्य आंधारालागीं। रिघो कां भलते सुरंगीं। परी तो तयाच्या मार्गीं। नाहींचि जैसा ॥' ज्ञा.–१८–४०९; 'लोहाचें साकडें परिसा। न जोडे अंधारु रवि जैसा। द्वैतबुद्धीचा तैसा ॥ सदा दुकाळ जया ॥–' ज्ञा.–१५–२९२; 'कां अंधकाराचिया ठाया। दैवें सूर्य आलिया। तो अंधारुचि जगा यया। प्रकाशु नोहे ॥' ज्ञा.–१६–३७; 'अगा रात्री आणि दिवो। हा तंवचि द्वैतभावो। जंव न रिगिजे गावो। गभस्तीचा ॥' ज्ञा.–१८–१२५६). **नायके**—ऐकत नाहीं.—अमृताच्या कानावर मृत्यूची वार्ता कधींहि पडत नाहीं. एवढेंच नव्हे तर अमृताच्या योगानें मेलेल्यासही पुन्हां जीवित लाभतें ('कीं मृतही जीवित लाहे। अमृतसिद्धी ॥' ज्ञा.–१–७७).

**ओवी ९२—संतापु**—दाह, उष्णता.—चंद्रकिरण हे शीतल असतात. म्हणून तप्त झालेलाही मनुष्य चंद्रकिरणांनीं शांत होतो. ('का तेज परी शीतळ। शशांकाचें ॥' ज्ञा. १६–११५). **भेदु**—भिन्नता, फरक, वेगळेपणा.–आत्मसंपन्न पुरुषाच्या ठिकाणीं ज्ञानाचा उदय झाला असल्यामुळें त्याला हें सर्व भेदात्मक जगत् ब्रह्मरूपानें दिसतें. ('तैसा बुद्धयादिकांपुढां। असतु विश्वाभासु हा येवढा। तो न देखे कवणीकडां। आकाश जैसें ॥' ज्ञा. १८–२११; 'जीवनाचा झाला ओलावा अंतरीं। विश्व विश्वंभरीं सामावले ॥' तुका. ३५४०; 'तरी दोन्ही पालववेरी। जैसा एक तंतू अंबरीं। तैसा मी वांचूनि चराचरीं। जाणती ना ॥' ज्ञा.–९–२२०). ज्याप्रमाणें घटांत अथवा घरांत

आकाश एकच असतें त्याप्रमाणें भिन्न भिन्न आकाराच्या भूतसमुदायांत व्यापून असणारी जी आत्मवस्तु ती एकच आहे असें त्याचें ज्ञान असतें. ('हे भूतग्राम विषम । परी वस्तु ते एथ सम । घटमठीं व्योम । जियापरी ॥' ज्ञा.–१३–१०६४; 'अवघी एकाचीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥' तुका.–३६७९). ज्ञानी पुरुष हा ज्ञानाच्या दृष्टीनें सर्व ठिकाणीं अभेद पाहतो, परंतु तो क्रियेच्या दृष्टीनें अभेद पहात नाहीं म्हणजे योग्य वेळीं व योग्य ठिकाणीं त्याच्या क्रिया अनुरूप होतात. उदाहरणार्थ, सर्वत्र परमात्मा आहे. म्हणून तो पक्वान्नें जनावरास खावयास घालीत नाहीं, ती माणसांनाच घालतो. सर्व चित्रविचित्र भूतांच्या ठिकाणीं ज्याला आत्मदर्शन होतें तोच खरा डोळस व भाग्यवान् होय. ('ज्ञानाचा डोळा·डोळसां ।· माजीं डोळसु तो वीरेशा । हे स्तुति· नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥' ज्ञा.–१३–१०६७).

**ओवी ९३—मशकु**–चिलट, मच्छर. **श्वपचु**–चांडाल.–श्रीज्ञानेश्वरमहाराज 'मशकु' व 'गजु' ह्या उदाहरणानीं आकारांतील भेद दर्शवितात. 'श्वपच' व 'ब्राह्मण' या उदाहरणांनीं जातींतील भेद दर्शवितात व 'इतर' व 'आत्मज' असें म्हणण्यांत आपपर भाव दाखवितात. आत्मसंपन्न पुरुषाच्या ठिकाणीं हे तिन्हीही भेद नसतात (ब्राह्मणे पुल्कसे स्तेने ब्रह्मण्येऽर्के स्फुलिंगके । अक्रूरे क्रूरके चैव समदृक्पंडितो मतः ॥" ए. भा. २९ श्लोक १४; 'पुल्कस आणि ब्राह्मण । जातिभेदें विषमपण । आत्मदृष्टीं पाहतां जाण । दोघे समान चिद्रूपें ॥' ए. भा. २९–२९४). तो चित्रविचित्र उपाधीमध्यें एकत्व पहात नाहीं तर या उपाधीमधून स्फुरद्रूप असणारें जें चैतन्य तें एकच आहे असें जाणतो.

**ओवी ९४—श्वान**–कुत्रें. **गुरु**–थोर, श्रेष्ठ. **हीन**–नीच, क्षुद्र.–९२ व ९३ या दोन ओव्यांतून संबोधिलेल्या प्राण्यांपैकीं ब्राह्मण हा सत्त्वप्रधान प्राणी आहे. गाय व हत्ती हे रजोगुणप्रधान आहेत. व बाकीचे सर्व प्राणी तमोगुणप्रधान आहेत. तात्पर्य, प्रकृति सत्त्वगुणाची असो, रजोगुणाची असो अथवा तमोगुणाची असो, ज्ञानी पुरुषाला या प्रत्येक प्रकृतीच्या ठिकाणीं आत्मवस्तूचेंच दर्शन होतें. सोन्याचा खंडोबा हा सोन्याच्या कुत्र्यापेक्षां पूज्यतेच्या दृष्टीनें श्रेष्ठ ठरतो, परंतु सोन्याच्या दृष्टीनें हे दोन्हीही सारखेच ठरतात.

('सुवर्णविष्णु सुवर्णश्वान। एक पूज्य एक हीन। विकूं जातां मोल समान। वंद्य निंद्य जाण आत्मत्वीं तैसें॥' ए. भा.-२९-२९५) किंवा पावित्र्याच्या दृष्टीनें ब्राह्मणाचें सोवळें वस्त्र हें दारुड्याच्या वस्त्रापेक्षां श्रेष्ठ आहे. परंतु सुताच्या दृष्टीनें या दोहोंची किंमत सारखीच आहे ('द्विजांचें सोवळें धोत्र । कां मद्यपांचें मलीन वस्त्र । सूत्रदृष्टीं समान सूत्र । मद्भक्तदृष्टीं आत्मत्वीं तैसी॥' ए. भा.-२९-३०६). तद्वतच उपाधिदृष्ट्या वस्तूंमध्यें जरी फरक असला तरी आत्मस्वरूपदृष्ट्या सर्व वस्तूंची किंमत सारखीच आहे. ज्ञानी पुरुषाची दृष्टि नाम, रूप, आकार व गुण यांच्यावरून उठून सर्व वस्तूंमध्यें व्याप्त असलेलें जें चैतन्य त्याच्यावर जडलेली असते म्हणून त्याच्या ठिकाणीं 'आपपरभाव' नसतो ('तरी वस्त्रासि पाठीं पोटीं। नाहीं सुतावांचूनि किरीटी। ऐसें सुये दिठी। चराचर मद्रूपें॥' ज्ञा.- १४-३४९; 'कां स्वरूपें तरी बहुतें आहाती। परी तैसीं सोनीं बहुवें न होती। ऐसी ऐक्याचळाची स्थिती। केली जेणें॥ ज्ञा.- ६-३९९; 'सरी चिताक भोंवरी। अलंकाराचिया परी। नामें जालीं दुरी। एक सोनें आटितां॥' तुका.- ३४९७; 'खडा खाळी साकर। झाला नामाचाचि फेर। न दिसे अंतर। गोडी ठायीं निवडितां॥ तुका.- ३४९८). **घागतया**—जाग्रत माणसाला.-स्वप्नाला कारण जशी निद्रा आहे (कां स्वप्नासि कारण निद्रा॥' ज्ञा.- ९-१२०) तशी, भेदरूपी स्वप्नाला कारण अज्ञानरूपी निद्रा आहे, ('तरी अविद्येचिया निदा। विश्वस्वप्नाचा हा धांदा। भोगीत होता प्रबुद्धा। अनादि जो॥' ज्ञा.- १८-४०३). परंतु जागा असलेल्या पुरुषाला जसें स्वप्न कधींही पडत नाहीं ('स्वप्न कां गा जियापरि। जागतयातें न सिंतरी॥' ज्ञा.- १४-३४२.). तसें, आत्मस्वरूपरूपी जाग्रति प्राप्त झालेल्या पुरुषाला भेदरूपी स्वप्न पडत नाहीं.

**ओवी ९९—अहंभाव**-अहंकार, मीपणा.—प्रस्तुत ओवीमध्यें श्रीज्ञानेश्वर-महाराज प्राप्त पुरुषाला भेद कां दिसत नाहीं ह्याचें कारण सांगतात. भेदाला अथवा द्वैताला कारण परिच्छिन्न (म्ह. अल्प) अहंता आहे. 'मी अमुक एक आहें' अशी परिच्छिन्न अहंता ज्याच्या ठिकाणीं असते त्याला आपल्याहून अन्य वस्तूंची प्रतीति होते. 'तूं' याला कारण 'मी' आहे. जेथें 'मी' ही कल्पना नाहीं त्या ठिकाणीं 'तूं' या कल्पनेलाही वाव नसतो. सुषुप्तीमध्यें मीचें भान नसतें म्हणून तेथें जगताचीही कल्पना नसते. प्राप्त पुरुषाच्या

ठिकाणचा देहाहंकार व देहाहंकाराला कारण असणारें जें अज्ञान, या दोहोंचा-ही नाश झालेला असतो (‘ सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय आपैसी । गेली देहअहंता तैसी । अविद्येसवें ॥’ ज्ञा.–१५–२९० ). म्हणून त्याच्या ठिकाणची द्वैतप्रतीति निःशेष गेलेली असते. हा पुरुष आत्मजागृतीवर आला असल्यामुळें त्याला आतां विश्वरूपी स्वप्न पडत नाहीं (‘ तैसा विश्वस्वप्नेंसीं माया । नीद सांडूनि धनंजया । सहसा चेइला अद्वया- । नंदपणें जो ॥’ ज्ञा.–१८–४०५ ; ‘ तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळ-विले ॥’ तुका.–३६०० ; ‘ जीवनाचा झाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वं-भरीं सामावलें ॥’ तुका.–३५४० ; ‘ तैसें माझिये साक्षात्कारीं । सरे अहं-काराची वारी । अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय ॥’ ज्ञा.–११–६९४ ).

**ओवी ९६—सर्वत्र**—सर्व ठिकाणीं. **सदा**—सर्वकाळीं — ब्रह्म हें देशकालवस्तुपरिच्छेदशून्य ( अधिक माहिती १२ वा अध्याय–प्रकरण २–पान १३२ पहा ) असें आहे. ( सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् । सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥’ गीता.–१३–१३; ‘ जैसी भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असें जें वस्तु ॥’, ‘ आघ-वांचि देशीं काळीं । नव्हता देशकाळांवेगळीं ’ । जे क्रिया स्थूळास्थूळीं । तेचि हात जयाचे ॥’ ज्ञा.–१३–८७२–७३ ; ‘ देशकालवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥’ तुका.–३५४९ ). **सम**—सारखें.—ब्रह्माच्या ठिकाणीं सजातीय, विजातीय व स्वगत असे तीन्हीही भेद नाहींत (‘ बहिरंतश्च भूतानामचरं चरमेवच । सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥’ गीता–१३–१५; ‘ब्रह्म सर्वगत सदा सम । जेथें आन नाहीं विषम ॥’ तुका.–१९३९ ; ‘ समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ॥’ गीता–१३–२७ ; ‘ हे भूतग्राम विषम । परी वस्तु ते एथ सम । घटमठीं व्योम । जियापरी ॥’ ज्ञा.–१३–१०६४ ; ‘ ब्रह्मा मुंगी धरूनी तुझें स्वरूप सांवळें ॥ ’ नाथ–३२८७). ब्रह्म सर्वांमध्यें सारखेंपणानें व्याप्त आहे. मुंगींत लहान ब्रह्म असतें व हत्तींत मोठें ब्रह्म असतें असें मुळींच नाहीं. मिठाच्या अनेक कणांच्या ढिगाऱ्यांतून जसा एकच खारेपणा असतो किंवा कोट्यवधि उंसांत जसी गोडी एकच असते, तसें ब्रह्म हें सर्व भूतमात्रामध्यें सारखें व्यापून आहे. सर्व रूपांनीं तेंच नटलेलें असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं लहान–मोठा असा भेद नाहीं. **अद्वय**—अद्वितीय,

द्वितीयभावशून्य.—ब्रह्म हें एकटें एकच असल्यामुळें व त्याच्याखेरीज दुसरें कांहींही नसल्यामुळें तें 'अद्वितीय' असें आहे ('वरी एकपणें गणिजे। तें गणितेनसी दुजें। म्हणोनि हें न गणिजे। ऐसें एक॥' अमृ०-५-३४; 'ऐक्याचें एकपण सरे। जेथ आनंदकणुही विरे। कांहींचि नुरोनि उरे। जें कांहीं गा॥' ज्ञा. १८-१००५' 'एकमेवाद्वितीयम्॥' छांदो. उप. ६-२-१; 'आनंद अद्वय नित्य निरामय। जें कां नित्य ध्येय योगियांचें॥' तुका.-५७८) **आपणाचि**—आपणच. --अद्वय असें जें ब्रह्म तें मीच आहे, अशा अनुभवावर तो आलेला असतो ('तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग। तेंचि जाला अंगें तुका आतां॥ तुका.- ३५४९; 'आतां व्यापकु कीं एकदेशी। हे ऊहापोही जे ऐसी। ते करावी ठेली आपैशी। दुजेनवीण॥' ज्ञा.-६-८९). **समदृष्टीचें वर्म**—समदृष्टी पुरुषाचें रहस्य.—ह्या ओवीमध्यें समदर्शन कोणाला प्राप्त होतें तें सांगतात. जगत् हें वैषम्यावर किंवा द्वैतावर उभारलेलें असल्यामुळें त्याच्यात समता ही कधींच येणारी नाहीं. परंतु ज्या वेळेस द्रष्टा हा ब्रह्मरूप होतो ( म्ह. मी ब्रह्म आहें, अशा अपरोक्ष अनुभवावर येतो ), त्याच वेळेस विषम असणारें जग त्याला 'सम' दिसतें. या पुरुषाची दृष्टि आकारावर नसून आकारांतून प्रतीत होणारें जें आत्मतत्त्व त्याच्यावर जडलेली असल्यामुळें तो अज्ञानी पुरुषाप्रमाणें बाह्य आकारानें फसला जात नाहीं. त्याला सर्व ठिकाणीं ओतप्रोत परमात्माच भरलेला आहे असें दिसतें ('तेंवि शिवोनि पृथ्वीवरी। भासती पदार्थांचिया परी। प्रकाशे तें एकसरी। संवित्ति हे॥' चांगदेवपासष्टि १२- ).

**ओवी ९७—विषयसंगु**-विषयांचा संबंध.—ज्ञानी पुरुष अद्वैतानुभवावर जरी प्राप्त झालेला असला तरी त्याच्या इंद्रियांचे सर्व व्यापार यथायोग्य चालतात. त्याचीं इंद्रियें योग्य वेळीं योग्य विषयांचें सेवन करतात. उदाहरणार्थ, जनक हे राज्य करीत होते व नाथांचा संसार शेवटपर्यंत व्यवस्थित चालला होता. **कामेंविण**—इच्छेच्या अभावामुळें. **निःसंगता भोगिली**—अलिप्तता अनुभविली.—प्राप्त पुरुष संसारांत राहून मुक्त असतात; याच्या उलट अविवेकी पुरुष परिग्रहाचा त्याग करूनही लिप्त असतात. याचें कारण जें मुख्यतः टाकावयास पाहिजे तें, अविवेकी पुरुषांनीं टाकलेलें नसतें. विषय हे खरे बाधक नाहींत तर त्यांच्याबद्दल अंतःकरणांत असलेली जी कामना ती बाधक

असते. जसें लहान मुलाच्याजवळ विषय असतात, परंतु त्याचें मन विषयांमुळें विकारी होत नाहीं. या पुरुषानें, भोग घेणारें जें मन तें कामनारहित केलेलें असतें, त्यामुळें तो संसारांत राहूनही निःसंग असतो ( ' आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें । जे घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणऊनि ॥ ' ज्ञा.–५–२२ ; ' असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ॥ ' गीता–१८–४९ ; ' तैसा वियोग जेणें दुःखें । विपत्ति शोक पोखे । तें स्नेह सांडुनि सुखें । उदासु होय ॥ ' ज्ञा.–१३–५८९ ). इच्छेनें प्रेरित होऊन केलेली गोष्ट सुखदुःखाला कारणीभूत होते. इच्छेला कारण देहाहंकार आहे ( ' जें अहंकारतनूंसी । वालभ पडले ॥ ' ; ' तैं इच्छा हे कुमारी जाली ॥ ' ज्ञा.–७–१६५–६६ ). या पुरुषाच्या ठिकाणची इच्छा व इच्छेला कारण असणारा देहाहंकार हे दोन्हीही नष्ट झाले असल्यामुळें हा सर्व व्यवहार करूनही अलिप्त असतो.

**ओवी ९८—निद्सुरें**–अज्ञान.–लोकरूढीप्रमाणें आत्मज्ञानी पुरुष सर्व व्यवहार करतात. उदाहरणार्थ, गोरोबा कुंभार मडकी तयार करीत असत; सावता माळी, शेतांत काम करीत होते ; रोहिदास चांभार चर्मकाराचें काम करीत ; नरहरी सोनार सोनाराचें काम करीत व सजन कसाई मांसही विकीत होते; एवढेंच नव्हे तर भगवंतही त्यांना त्यांच्या कामांत मदत करीत असत. ( ' सजन कसाया विकूं लागे मास । मळा सांवत्यास खुरपूं लागे ॥ ' तुका.–२९६८ ) परंतु यांनीं अज्ञानाचा त्याग केलेला असतो. म्हणून यांचीं सर्व कर्मैं निरहंकार बुद्धीनें होतात. लोक व्यवहार करतात तेव्हां ते आपणांस कर्माचे कर्ते संमजतात ( ' तैसीं शुभाशुभें कर्मैं । जियें निफजती प्रकृतिधर्मैं । तियें मूर्खें मतिकामें । मी कर्ता म्हणे ॥ ' ज्ञा.–३–१७८ ), म्हणून ते कर्मबंधानें बांधले जातात. या प्राप्त पुरुषांनीं कर्तेपणाचा अहंकार टाकलेला असल्यामुळें त्यांच्या संघाताकडून जरी पापपुण्यात्मक कर्मैं झालीं, तरी ते त्यांनीं लिप्त होत नाहींत. ( ' जन करी तैसा खेळतील खेळ । अवघा गोपाळ करुनियां ॥ ' तुका.–२४ ; ' जैसी बहुरुपियांची रावो राणी । स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं । परी लोकसंपादणी । तैसीच करिती ॥ ' ज्ञा.–३–७६ ).

**ओवी ९९—खेचरु**–पिशाच. **शरीरी**–देहधारी. **संसार**–जग, लोक. **नोळखे**–ओळखत नाहीं.—लोकांप्रमाणें तो सर्व व्यवहार करतो यामुळें सामान्य लोकांना प्राप्त पुरुष ओळखतां येत नाहीं ( ' हांसती रुसती शिव्या

देती एका। दिसती लौकिका सारखेची।' निळा.-१२७- प्र. ३-चांगदेव-चरित्र ); कारण, त्यांच्या मतें, जो लोकविलक्षण वागतो, उदाहरणार्थ, दाढी व जटा वाढवितो, अंगाला विभूति लावतो व केवळ कौपीन धारण करून सर्व-संगाचा त्याग करतो, तो ज्ञानी अथवा साधु पुरुष होय. साक्षात् तुकाराम-महाराज हे महान् साधु असतांना ('तुकितां तुळणेसी ब्रह्म तुकासी आलें। म्हणोनि रामेश्वरीं चरणीं मस्तक ठेविलें॥' आरती; 'तुका म्हणे नव्हे दिसतों मी तैसा। पुसणें तें पुसा पांडुरंगा॥' तुका.-२६०१). त्यांच्या हयातींत लोकांनीं त्यांची उपेक्षा केली व मंबाजीबुवानें त्यांना काठीनें मारलें. वास्तविक साधुत्व हें बाह्य वेषावर अवलंबून नसून, ही एक अंतःकरणाची विशिष्ट भूमिका आहे, हें मर्म लोकांना समजत नसल्यामुळें त्यांना ज्ञानी पुरुष ओळखूं येत नाहीं ('दिसती जनीं वनीं प्रत्यक्ष लोचनीं। एकाजनार्दनीं ओळखिले॥' नाथ.-११२२). एक भगवंत किंवा जो स्वतः ज्ञानी झाला आहे तो, असे दोघेच बोधसंपन्न पुरुषाला ओळखूं शकतात (संत ते कवण संत ते कवण। हे जाणवी खूण केशवराज॥' ज्ञा. गा.-६१५; 'तुका म्हणे हें तों ठावें पांडुरंगा। काय कळे जगा अंतरींचें॥' तुका.-२६९१; 'तुका म्हणे अंगें व्हावें ते आपण। तरीच महिमान येईल कळों॥' तुका.-२०३९; 'भक्तांचा महिमा भक्तचि जाणती। दुर्लभ या गति आणिकांसी॥' तुका-१९९८).

**ओवी १००—पवनाचेनि मेळें**-वाऱ्याच्या संयोगानें-वाऱ्याचा व पाण्याचा संयोग झाला कीं तरंग उत्पन्न होतो ('ना तरी पवनें स्पर्शिलें नीर। पढियासें तरंगाकार॥' ज्ञा. - २-१६७). परंतु लाटेला पाण्याखेरीज वेगळें अस्तित्वच नाहीं हें ज्यांना समजत नाहीं ते, लाट ही पाण्याहून वेगळी मानतात व मोठी लाट लहान लाटेला गिळंकृत करते असें समजतात, परंतु वस्तुतः लाट ही पाण्याहून भिन्न नसून ती पाणीरूपच आहे ('वेंचूनि आणूं कल्लोळ। म्हणोनि घापे करतळ। तेथें तरी निखिळ। पाणीच फावे॥' अमृ०- ९-१३. 'पैं कल्लोळातें कल्लोळें। ग्रसिजत असे ऐसें कळे। परि ग्रसितें ग्रासा वेगळें। असे काई॥' ज्ञा.-१३-८९५; 'अगा थोरीं कल्लोळीं कल्लोळ-साने। लोपतां तिरींचेनि जनें। एकीं एक गिळिलें हें मनें॥ मानिजे जऱ्ही॥' 'तऱ्ही उदकाप्रति पाहीं। कोण ग्रसितसे काई॥ ज्ञा.- १८-४४२-४३'; 'उदकावरी तरंग। तरंग उदकाचें अंग॥' तुका.- ३४९०; 'उदकावेगळा।

नव्हे तरंग निराळा ॥ तुका.– ३६०५; ‘ कल्लोळ कंचुक । न फेडितां उघडें उदक । तेंवी जगेंसी सम्यक् । स्वरूप जो । ’ चांगदेवपासष्टि ५ ).

**ओवी १०१—तैसें**—त्याप्रमाणें.— ज्याप्रमाणें पाणी व तरंग यांच्यांत नामाखेरीज वस्तुतः भेद नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुष व ब्रह्म यांच्यांत तत्त्वतः भेद नाहीं. ज्ञानी पुरुष हा जरी परिच्छिन्न देहधारी असला व परमात्मा जरी व्यापक असला तरी अनुभवाच्या दृष्टीनें त्या दोहोंमध्यें भेद नसतो (‘तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेरी नामाचींचि अंतरें । वांचूनि आंतुवट वस्तुविचारें । मी तेचि ते ॥ ’ ज्ञा.–९–४११ ) जसा परमात्म्याचा बोध असतो (‘ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च । शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ ’ गीता १४–२७ ). तसाच बोध प्राप्त पुरुषाचा असतो (‘ मी वासुदेव तत्त्वता । कळो येईल विचारितां ॥ ’ तुका.–३४६; ‘ जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता । परिपूर्ण पूर्णता । माझियाचि ॥ ’; ‘ मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सत्यसिंधु । तैसेंचि ते भेदु । उरेचिना ॥ ’ ज्ञा.–१४–५२–५३ ‘ तो देहसंगें तरी असे । परि चैतन्यासारिखा दिसे । पाहतां परब्रह्माचेनि कसें । चोखाळु भला । ’ ज्ञा.–४–११५). **साम्या**–ऐक्याला.–ज्ञानाच्या योगानें त्याचें मन परमात्म्याशीं समरस झालें असल्यामुळें तो जिकडे पाहील तिकडे त्याला वस्तूचेंच दर्शन होतें. असें मन साम्यदशेला येणें यांतच मनुष्यजन्माची खरी कृतार्थता आहे; (‘ऐसें भाग्य कई लाहाता होईन । अवघे देखे जन ब्रह्मरूप ॥ ’ तुका.–१२८७; ‘ नर नारी बाळें अवघा नारायण । ऐसें माझें मन करीं देवा ॥ ’ तुका.–८६१; ‘ म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे । ऐसें साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ॥ ’ ज्ञा.–६–४०९ ).

**ओवी १०२—लक्षण**–चिन्ह.–ज्या बाह्य लक्षणांवरून अंतःकरणांत आत्मज्ञान उत्पन्न झालें आहे असें कळतें तीं लक्षणें भगवंत पुढील श्लोकांतून सांगतात. आत्मज्ञान प्राप्त होऊन जर आचरणांत म्हणजे इंद्रियव्यापारांत योग्य फरक पडत नसेल तर अशा पुरुषाला आत्मज्ञान प्राप्त झालेंच नाहीं असें समजावें. ज्याप्रमाणें वसंतऋतूचें आगमन झाडांना नवी पालवी फुटल्यानें कळून येतें, त्याचप्रमाणें आत्मज्ञानी पुरुष हा त्याच्या इंद्रियांच्या व्यापारांवरून ओळ-

खतीं येतो ( 'पैं वसंताचें रिगवणें । झाडांचेनि साजेपणें । जाणिजे तेवीं करणें । सांगती ज्ञान ॥' ज्ञा.–१३–१७८ ).

**ओवी १०३—लोटिजे**—लोटत नाहीं, ढळत नाहीं.–आत्मज्ञान प्राप्त झालें म्हणजे प्राप्त पुरुषाचें प्रारब्ध संपतें असें नाहीं. प्रारब्धानुसार त्याच्यावर चांगले–वाईट प्रसंग येतातच. परंतु असे प्रसंग प्राप्त झाले असतांही प्राप्त पुरुषाच्या अंतःकरणाचें स्थैर्य बिघडत नाहीं. नदी वाहत असतांना तिच्या प्रवाहांत लहान टेकडी आली तर नदी दुभंगते, मग 'गिरिवर' म्हणजे 'मोठा पर्वत' प्राप्त झाला असतांना ती दुभंगेल यांत मुळींच आश्चर्य नाहीं. सत्य पाण्याचे पुरानें पर्वत हालला जात नाहीं, मग मिथ्या जें 'मृगजल' त्यानें तो कसा हालला जाईल ? ज्ञानी पुरुष 'इष्टानिष्ट' गोष्टी मृगजलाप्रमाणें असत्य समजतो म्हणून त्या गोष्टी जरी प्राप्त झाल्या तरी त्यामुळें त्याचें अंतःकरण विकाराला पावत नाहीं ( 'गोमटे कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभवे । जो ओखटेनि नागवे । विषादासी ॥' ज्ञा.–२–२९९ ). त्याच्या अनुभवांत लाभ व अलाभ असें द्वैतच स्फुरत नाहीं ( 'तैसे शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे । जंव येकु न प्रकाशें । सर्वत्र मी ॥' ज्ञा.–१८–१२५५ ; 'तुका म्हणे हरिच्या दासा । शुभकाळ अवघ्या दिशा ॥' तुका.–१९२९ ; 'त्रिविध मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे । वरि पडिलिया नव्हे । वांकुडा जो ॥' ज्ञा.–१३–३४३ ; 'आंगा जें पातलें । तें करुनि घालीं आपुलें । तेथ साहतेनि नवलें । घेपिजेना ॥' ज्ञा.–१३–३५१ ; 'तें आइकें देखे अथवा भेटे । परि मनीं कांहींचि नुमटे । मेघरंग न कांटे । व्योम जैसें ॥' ज्ञा.–१३–४७७ ). तो सदा आत्मानंदांतच मग्न असतो.

**ओवी १०४—निफ्ता**–खरोखर. **तत्त्वता**– निःसंशय, वस्तुतः.—अशा आत्मसंपन्न पुरुषाला 'ब्रह्म' म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. ब्रह्म जसें कर्माकर्मातीत असतें ( 'ब्रह्म न लिंपे त्या मेळें । कर्म अकर्मा वेगळें ॥' तुका.–३४७६ ), त्याचप्रमाणें प्राप्त पुरुषाचाही अनुभव असतो ( 'तुका म्हणे आम्ही जालों अग्निरूप । लागो नेदूं पापपुण्य अंगा ॥' तुका.–३५५२; 'ऐसे तनुत्यागेंवीण । अमूर्ताचे गुण । दिसती संपूर्ण । योगयुक्ता ॥' ज्ञा.–५–३९; 'तुकीं तुकला तुका । विश्वीं भरोनि उरला लोकां ॥' तुका.–४०६६ ).

**ओवी १०५—आपणपें**-आपल्याला, आत्मस्वरूपाला. -श्रीज्ञानेश्वरमहाराज 'आपण' हा शब्द 'आत्मस्वरूप' या अर्थानें बहुधा योजतात. 'आपण' या शब्दाची व्याख्या श्रीज्ञानेश्वरांनीं १५ व्या अध्यायांत दिली आहे ('मग इदंतेसि वाळलें । जें मीपणेंवीण डाहारलें । तें रूप पाहिजे आपलें । आपणचि ॥' ज्ञा.-१५-२६७). जें 'इदंभावा'ला विषय होत नाहीं व 'इदं'च्या सापेक्ष असलेल्या 'अहंभावाला' ही विषय होत नाहीं असें 'इदं-अहं-वृत्तिशून्य' जें आत्मस्वरूप, त्या आत्मस्वरूपाला श्रीज्ञानेश्वरमहाराज 'आपण' म्हणतात. **इंद्रियग्रामावरी येणें नाहीं**-इंद्रियरूपी गांवावर येत नाहीं म्हणजे इंद्रियांशीं तादात्म्य करीत नाहीं.-प्राप्त पुरुषाची वृत्ति आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं समरस झाली असल्यामुळें तो देहतादात्म्यावर येत नाहीं. इंद्रियरूपी गांव हा अन्नमयकोशावर (म्ह. देहावर) आहे. प्राप्त पुरुष हा 'अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय' ह्या पंचकोशांच्या (अधिक माहिती १२ वा अध्याय-प्रकरण २, पान १२४-२५ पहा.) पलीकडे असलेला जो आत्मा त्याच्याशीं वृत्तीनें एकरूप झाल्यामुळें तो पुन्हा आत्म्यापासून फार दूरवर असलेला, अन्नमयकोशावरील जो इंद्रियरूपी गांव, त्या ठिकाणीं येऊं शकत नाहीं. त्याच्या ठिकाणीं अन्नमयकोशाची म्हणजे देहाची जाणीव नसते मग देहाच्या आश्रयानें राहणारीं जीं इंद्रियें त्यांची त्याला दाद कोठून राहणार ? ('ऐसें आपणपां रिगोनि ठाये । मग देहाची वास न पाहे । आणिकाचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ॥' ज्ञा.- ६-३७१; 'निरंजनीं आम्हीं बांधियेलें घर । निराकारीं निरंतर राहिलों आम्ही ॥' तुका.- ३५४८; 'ज्ञानदेवा घर चिदानंदी ॥' ज्ञा. गा.-३३०; 'आतां उभयां उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गहन कवण तयाचें । म्हणोनि प्रतीतीचिये पोटींचें । पाणी न हाले ॥' ज्ञा.-८-६३). **विषय न सेवी**—विषयसेवन करीत नाहीं. इंद्रियांच्या पलीकडे विषय असतात. या प्राप्त पुरुषाची वृत्ति देहावर व इंद्रियांवर येत नाहीं. म्हणून इंद्रियांच्या पलीकडे असणारे जे विषय, त्यांची त्याला जाणीवही नसते. शिवाय मनाचें साहाय्य घेतल्याखेरीज इंद्रियांना विषयांचा भोग घेतां येत नाहीं. याचें मन आत्मस्वरूपांत विलीन झालें असल्यामुळें विषयांचा भोग घेण्यास तें वेगळेपणानें शिल्लकच राहत नाहीं. अशा परिस्थितींत तो विषयांचें सेवन करीत नाहीं यांत नवल मुळींच नाहीं ('अनुहातीं गुंतला

नेणे बाह्यरंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥ ' तुका.–३६०२ ; ' विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ' तुका.–३५८४ ; ' निळा म्हणे विरक्त देही । आठवचि नाहीं विषयांचा ' निळा.–१३१६ ; ' विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे धन, जन मातापिता ॥ ' तुका.–१९९७ ; ' तेथ कें उठिती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव । घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे ते ॥ ' ज्ञा.–१७–२३४ ). ज्याच्या ठिकाणीं देहाहंकार असतो व ज्याचें देहाशीं व इंद्रियांशीं तादात्म्य असतें, त्याच्या ठिकाणीं विषयोपभोगाची इच्छा असते व अशा पुरुषाकडूनच विषयांचें सेवन घडतें.

**ओवी १०६—बाहिरें**–बाहेर.—तो इंद्रियग्रामावर येऊन विषयांचें सेवन कां करीत नाहीं, याचें कारण या ओवींत श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात. ज्यांना घरीं जेवावयास मिळत नाहीं ते ज्याप्रमाणें मधुकरी मागतात, त्याप्रमाणें ज्यांना आत्मसुख प्राप्त होत नाहीं तेच पुरुष या पंचविषयांकडे धांव घेतात ( ' तैसें आपणपें नाहीं दिठे । जयातें स्वसुखाचे सदा खराटे । तयासीचि विषय हे गोमटे । आवडती ॥ ' ज्ञा.–५–११२ ). आत्मज्ञानी पुरुषाला आत्मसुख प्राप्त झालेलें असल्यामुळें त्याची वृत्ति अनात्माकार होतच नाहीं ( ' तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग एकविध ॥ ' तुका.–३६३९ ; ' नित्यानंदापुढें आनंद तो कोण । विषयसुख बाई बापुडें तें क्षीण ॥ ' निळा–११६६ ). **सहजे**–स्वाभाविक, क्रियारहित.–विषय सुख हें नैसर्गिक सुख नसून तें कृत्रिम आहे. जें क्रियेनें प्राप्त होतें त्याला कृत्रिम म्हणतात. अनुकूल विषयांचा व इंद्रियांचा संयोग झाला असतां विषयसुख प्राप्त होत असतें. परंतु आत्मानंद हें अकृत्रिम सुख आहे. कारण तो प्राप्त होण्याकरितां कोणचीही क्रिया करावी लागत नाहीं ( ' न करवे हाली चाली । निवारिली चिंता हे ॥ ' तुका.–२०४४ ). आत्मानंद हा द्वैतांत प्राप्त होत नाहीं. त्या ठिकाणीं भोक्ता, भोग्य व भोग ही त्रिपुटी नसते ( ' परी तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षिये फळ चुंबिजे । तैसें नव्हे तेथ विसरिजें । भोगितेपणही ॥ ' ज्ञा.–५–१३१ ). ' आनंद ' हा आत्म्याचा गुण नाहीं, किंतु आनंद हा आत्म्याचें स्वरूप आहे ( जो अंगाथिला आनंदु सुरतेंविण ॥ ' ज्ञा.–१५–७४ ). आत्मा हा ' आनंदी ' नव्हे तर तो आनंदरूप आहे ( ' आनंद अद्वय नित्य निरामय । जें

कां निजध्येय योगियांचें ॥ ' तुका.-५७८ ). म्हणून आत्म्याचे ठिकाणीं सुख हें स्वाभाविकच आहे. अंतरें-आत ( अंतःकरणामध्यें ) असणारें. -आनंदरूप असा जो आत्मा तो प्रत्येकाच्या अंतःकरणामध्यें आहे. त्याच्या शोधाकरतां बाहेर जाण्याची जरूरी नाहीं ( ' तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्व सुखाचा आरामु । कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ॥ ' ज्ञा.-९-६० ). अशा आत्म्याचा आनंद प्राप्त पुरुष हा बसल्याठिकाणींच अनुभवीत असतो व म्हणून तो बाहेर विषयांच्याकडे जात नाहीं. अपारें—अमर्याद, अनंत. सुखाडें-विपुलतेनें.—आत्म्याच्या ठिकाणीं विपुल आनंद आहे, त्याचें मोजमाप देशानें, कालानें किंवा अनुभवानें घेतां येत नाहीं ( ' देशें काळें वेदानुवादा । ज्या सुखाची न करवे मर्यादा । त्या सुखाची सुखसंपदा । मद्भक्त सदा भोगिती ॥ ' ए. भा.-१४-२०१ ; ' यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमास्ति ॥ ' छां. उप.-७-२३ ). तैत्तिरीयोपनिषदामध्यें ब्रह्मानंदाच्या विपुलतेची मीमांसा केलेली आहे. ब्रह्मानंद हा किती अमर्याद असतो याची कल्पना येण्याकरतां प्रथमतः, तुलनेकरतां म्हणून त्या ठिकाणीं मनुष्यानंदापासून प्रारंभ केला आहे. तरुण, उत्तम वेदाध्ययन केलेला, आशावान्, दृढस्वभावी व बलवान्, अशा पुरुषाला सर्व पृथ्वी वित्तपूर्ण अशी मिळाली असतां त्याला जो आनंद होईल तो एक ' मानुष आनंद ' होय ( ' युवा स्यात्साधु युवाध्यायकः ॥ आशिष्ठो द्रढिष्ठो बलिष्ठः ॥ तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् ॥ स एको मानुष आनन्दः ' ॥ तैत्ति. उप.-१, २-८ ). असे शंभर मानुषानंद म्हणजे मनुष्य-गंधर्वांचा एक आनंद होय. अशी तुलना करतां करतां, सरतेशेवटीं प्रजापतीच्या आनन्दाच्या शंभरपट जो आनंद तो ब्रह्माचा आनंद होय असें म्हटलें आहे. बटाटे व केळीं यांच्यांत जसा जातीचा फरक आहे, त्याचप्रमाणें विषयानंद ( म्ह. मानुषानंद ) व आत्मानंद यांच्यांत जातीचा फरक आहे. विषयानंद हा वृत्तिजन्य, मर्यादित, संयोगजन्य, दुःखमिश्रित व विनाशी असा आहे ; याच्या उलट आत्मानंद हा वृत्तिशून्य अवस्थेंत प्राप्त होणारा, अमर्याद, क्रियारहित केवळ सुखरूप व अविनाशी असा आहे. म्हणून त्याची तुलना आत्मानंदाबरोबर करतां येत नाहीं. परंतु लोकांना विषयानंदाचा अनुभव असल्यामुळें त्यांना ब्रह्मानंदाच्या विपुलतेची कल्पना यावी एवढ्याकरितां श्रुतीनें

तुलनेकरितां म्हणून विषयानंद अथवा मानुषानंद घेतला आहे. परंतु ही तुलना गौण आहे. प्रस्तुत ( म्ह. २१ व्या ) श्लोकांत भगवंतांनीं, वृत्ति अंतर्मुख करून समाधिकालीं विरक्त पुरुषाला जें आत्मसुख प्राप्त होतें त्या आत्मसुखाचें माप, प्राप्त पुरुषाला किती विपुल सुख प्राप्त होतें याची कल्पना येण्याकरितां घेतलें आहे. समाधिकालीं प्राप्त होणारें जें आत्मसुख, तें आत्मसुख प्राप्त पुरुषाला अखंड म्हणजे असमाधिकालींही प्राप्त असतें, असें भगवान् या श्लोकांत सांगतात. या दोन्ही सुखांची जात एक असल्यामुळें प्रस्तुत तुलना अनुरूप ठरते.

**ओवी १०७—वाळुवंटें**—वाळूचे कण. **चकोरु**—चकोर.—चकोरपक्षी हा एक कविकल्पित पक्षी आहे. तो केवळ चंद्रकिरणांचें सेवन करून राहतो. त्याला चंद्रकिरणांतून होणाऱ्या अमृताचा स्राव सेवन करतां येतो ( 'जैसें शारदीयेचे चंद्रकळे- । माजीं अमृतकण कोवळे । ते वेंचिती मनें मवाळें । चकोरतलगें ॥' ज्ञा.-१-५६; 'चकोरा चंद्रामृत फावलें ॥' ज्ञा.-११-९६; 'चंद्रातें आंगवणें । भोगूनि चकोर शाहाणे ॥' ज्ञा.-१८-१७४८ ).

**ओवी १०८—उपाइलें**-उत्कृष्ट.-आत्मसुख हें अनुच्छिष्ट, निर्विषय, अमर्याद, अविनाशी व स्वतःच्या ठिकाणींच प्राप्त होणारें असल्यामुळें त्याला उत्कृष्ट असें म्हटलें आहे. **फावलें**—प्राप्त झालें.-हें आत्मसुख श्रीगुरूच्या कृपेनें प्राप्त होत असतें ( 'मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयं-भचि असे । प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपैसयाचि '॥ ज्ञा.-९-४९ ). **सांडवलें**—टाकलें गेलें.—मोठ्या गोष्टीचा लाभ झाला असतां मनुष्याकडून लहान गोष्टीचा त्याग सहजगत्या होतो ( 'पुढें चढे हात । त्याग मागिला उचित ॥' तुका.- ३१७५ ). ज्याला आत्मानंदरूपी अमृत प्यावयास मिळालें तो विषयानंदरूपी कांजी प्यावयास मुळींच प्रवृत्त होणार नाहीं ( 'कां जो दैवयोगें पालखीं चढे । तो पूर्वील तुटके मोचडे । आहेत कीं गेले कोणीकडे । हें स्मरेना पुढें तेणें हरिखें ॥' ए. भा.-१३-५९२; 'दृष्टे भवति प्रभवति न भवति किं भव तिरस्कारः ।'—शंकराचार्य; 'तुका म्हणे मग नये वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडेन ' ॥ तुका.-१९५३ ).

**ओवी १०९—पां**-पादपूर्णार्थक अव्यय. **निकें**-चांगलें. **झकवती**—फसविले जातात.—प्राप्त पुरुष विषयसुखानें फसला जात नाहीं. विषयसुखानें कोण फसले जातात ते भगवान् पुढच्या श्लोकांत सांगतात.

**ओवी ११०—आपणपें**–आत्मस्वरूपाला. **देखिलें नाहीं**—पाहिलें नाहीं. ज्यांनीं 'इदं–अहं–वृत्तिशून्य' असें जें निरुपाधिक आत्मस्वरूप तें मी आहे असें अपरोक्षरीत्या जाणलें नाहीं म्हणजे आपण ब्रह्मरूप आहोंत असें ज्यांना ज्ञान नाहीं ('तुका म्हणे हा तो स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥' तुका.–२७६८). आत्मा हा जेव्हां अज्ञानाला वश होतो तेव्हां तो आपल्या आत्मस्वरूपाला विसरतो व आत्मस्वरूपाच्या विरुद्ध स्वभाववान् जो देह, तो मी आहे असें समजूं लागतो ('तें अज्ञान एक रूढे । तेणें कोहंविकल्पाचें मांडें । मग विवरूनि कीजे फुडें । देहा मी ऐसें ॥' ज्ञा.–१५–३४२). आत्म्यानें आपल्याला देह समजणें हीच आहे जीवत्वदशा. अशा विपरीत समजुतीमुळें अथवा विपरीत भावनेंमुळें जीव हा आपल्या हृदयांत असलेल्या आत्मसुखाला दुरावतो व देहाशीं व इंद्रियांशीं तादात्म्य करून विषयांच्याकडे सुखाकरतां धांव घेतो ('शुद्धी अहंकार आळुमाळ । उठतां शुद्धासि करी शबळ । तेणें देहयोगें धरिल्या बळ । करी तत्काळ विपरीत ॥' ए. भा.–१३–४३२ ; 'तेवीं खुंटलिया आनंदअभिव्यक्ती । जीवासि वाटे विषयासक्ती । कामिनी कामापांगिस्त होती चिंता चित्तीं विषयांची ॥' ए. भा. –१३–४३५ ). **इंद्रियार्थ**—विषय.—शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध असे पांच विषय आहेत. **आळुकेलें**—भुकेलेला, **तुष**–भूस, कोंडा–ज्याप्रमाणें कासवीचें पिलूं आपल्या आईस चुकलें असतां चिखल खातें त्याप्रमाणें आत्मस्वरूपाला विसरलेले असे अविवेकी पुरुष विषयसुखरूपी कर्दम सेवन करतात ('जेवीं कूर्मीच्या पिलियां । चक्षुरमृतें तृप्ती तयां । तेंचि मातेसि चुकलिया । मग भुकेलिया कर्दम सेवी ॥' ए. भा.–१३–४३४). ते विषयसुखाकरतां अगदीं दीन होतात ('इंद्रियांची दीनें । आम्ही केलों नारायणें ॥' तुका.–१४६३ ). विषयांच्या ठिकाणीं अत्यंत अल्पसुख असल्यामुळें विषयसुखाला 'तुष' असें म्हटलें आहे ('विषयांच्या बरडी । अखंड घासिती तोंडीं । ते इंद्रियें गोडी । न घेती हे ॥' अमृ.–७– १११ ). विषयाच्या सेवनानें मनुष्याची तृप्ति तर होत नाहींच, परंतु उलट त्याची वासना अधिक बळावते. विषयसेवनानें जर मनुष्याची तृप्ति होत असती तर मनुष्य पुनः पुनः विषयांच्याकडेगेलाच नसता ('विषय सेवितां कोण तृप्त झाला । इंधनीं निवाला अग्नि कोठें ॥' तुका.–४१६७). तात्पर्य, विषयांत तृप्ति देण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें त्यांना 'तुष' असें जें म्हटलें आहे तें अन्वर्थक ठरतें.

**ओवी १११—मृगें**-हरिणें. **संभ्रमें**-भ्रमानें. **बरडीतें**-बरड जमिनीला, माळरानाला.—मृगजळ हा भ्रम भरदिवसा होत असतो. तो भ्रम, सूर्याचे प्रखर किरण व बरड जमीन यांच्या संयोगांत होतो ('का तेजा आणि उखरा। भेटी जालिया वीरा। मृगजळाचिया पूरा। रूप होय॥' ज्ञा.-१३-१०५२). मृगजळाला 'असार म्हणण्याचें' कारण, तें जरी दिसत असलें तरी त्याच्या-ठिकाणीं कार्यकर्तृत्व नसतें, म्हणजे तहान भागवण्याचें पाण्याचें कार्य त्यानें होत नाहीं. खोटें जें मृगजळ त्याच्या ठिकाणीं सत्यबुद्धि (म्ह. तोयबुद्धि) ठेवून हरिणें धांव घेतात व शेवटीं ऊर फुटून मरतात ('मृगजळाचीं गा तळीं। तिये दिठी दुरूनिचि न्याहाळीं। वांचूनि तेणें पाणियें साळी केळी। लाविसी काई॥' ज्ञा.-१५-२२२; 'मृगजळ दिसे साचपणा ऐसें। खोटि-याचें पिसें ऊर फोडी॥' तुका.-२४४०; 'फुटोनि पडे तंव। मृग वाढवी हाव। परि न म्हणे ते माव। रोहिणीची॥' ज्ञा.-१३-७०७; 'मृगजळ जेथें नुमंडे। तेथें असे पा कोरडे। मा उमंडे तेथें जोडे। वोल्हांसु काई॥' अमृ.-६-३४). हरिणाच्या दृष्टीनें मृगजळ हें सत्य आहे; मनुष्याच्या दृष्टीनें तें असत्य आहे व सूर्याच्या दृष्टीनें मृगजळाला अस्तित्वच नाहीं. त्याप्रमाणें अज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें विषय हे सत्य आहेत ('पडिली हे रूढी जगा परिचार। चालविती वेव्हार सत्य म्हणूं॥' तुका.-२४५१). तत्त्ववेत्त्याच्या दृष्टीनें ते दग्धपट-न्यायवत् असत्य आहेत व मुक्ताला विषय हे, विषयरूपानें प्रतीत होत नाहींत किंतु त्याला सर्व ठिकाणीं आत्मवस्तूचेंच दर्शन होतें.

**ओवी ११२—आपणपें**-आपणाला, आत्मस्वरूपाला.—आत्मस्वरूप हें इदं-अहं-वृत्तिशून्य असें आहे. पंचकोश व तीन देह याचें ग्रहण 'अहं' शब्दानें होतें व पातालापासून ब्रह्मलोकापर्यंत असलेल्या सर्व जगताचा समावेश 'इदं' या शब्दांत होतो. आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं या सर्वांचा व्यतिरेक आहे. अहं व इदं हे दोन्ही शब्द उपाधीला घेऊन उठत असतात. त्यांतील उपाधींचा त्याग केल्यानंतर जी केवळ अधिष्ठानरूप निर्धर्म अशी जी उर्वरित आत्मवस्तु राहते तिलाच 'आपण' या शब्दानें संबोधिलें जातें. **दिठें नाहीं**-पाहिलें नाहीं, अनुभविलें नाहीं.—ज्याप्रमाणें मनुष्य, आपुलें मुख आरशामध्यें एकाचें दोन करून पाहतो, त्याप्रमाणें आत्मस्वरूप पाहतां येत नाहीं ('परि दर्पणाचेनि आधारें। एकाचि करून दुसरें। मुख पाहाती गव्हारें। तैसे नको

हो ॥ ' ज्ञा.–१५–२६८ ). द्वैत न करतां म्हणजेच द्रष्टा, दृश्य व दर्शन या त्रिपुटीचा व्यवहार न होतां आत्मस्वरूपाचें पाहणें असतें ('हें पाहाणें ऐसें असें वीरा । जैसा न मोडलिया विहिरा । मग आपलिया उगमीं झरा । भरोनि ठाके ॥ ' ज्ञा.–१५–२६९ ते २७३; 'आपणचि आपणयातें । पाहिजे जें अद्वैतें । तें ऐसें होय निरुतें । बोलिजतु असे ॥ ' ज्ञा.–१५–२७४). ज्ञाता किंवा द्रष्टा होऊन आत्मस्वरूपाला पाहतां येत नाहीं. द्रष्टयानें त्याच्याशीं तद्रूप होऊन जाणें हेंच त्याचें पाहणें होय ( 'तो हा रे श्रीहरी पाहिला डोळे-भरी । पाहतां पाहणें दुरी सारोनिया ॥ ' ज्ञा. गा.–५७२ ). **स्वसुखाचे**-आत्म-सुखाचे. **खरांटा**-खराटा, दुष्काळ, पूर्ण अभाव, ठणठणाट. **गोमटे**-गोड. चांगले.–जोंपर्यंत जीवाला आत्मसुखाचा लाभ होत नाहीं तोंपर्यंत जीवाची ओढ विषयसुखाकडे असते. ( 'म्हणे विषय हे कैसे गोड । माझ्या देहाचें पुरे कोड । तंव इंद्रियाची खवळे चाड । विषय वाड भोगावया ॥ ' ए. भा.–३–१३१ ). परंतु आत्मसुख प्राप्त झालें असतां विषयसुखाचा त्याग आपोआप होतो. ( 'जंव तुझें रूप नोव्हे दिठें । तंव जगासि संसारिक गोमटें । आतां देखिलासि तरी विषयविटें । उपनला त्रासु । ज्ञा.–११–३२१ ).

**ओवी ११३—विषयीं**-विषयांमध्यें. **बोलणें**—म्हणणें. **विद्युत्स्फुरणें**—विजेच्या प्रकाशानें.—विषयांत किती अल्प सुख आहे याची कल्पना येण्या-करतां विजेच्या प्रकाशाचा दृष्टांत देतात. विद्युत्प्रकाश हा अल्प असतो व क्षणभर टिकतो ( 'कां विजूचे उदैजणे । तोचि अस्तु ॥ ' अमृ.–४–९ ). तद्वतच विषयाचें सुख अल्प व क्षणिक असतें. हेंही सुख, ज्याची प्राप्त विषया-संबंधीं अनुकूल वृत्ति असते त्यालाच होतें. उदाहरणार्थ, बहुतेकांना प्रिय असणारा आंबा, ज्याला आवडत नाहीं त्याला तो प्राप्त झाला असतां आनंद होत नाहीं. वास्तविक विषयांत सुख नाहीं, परंतु जीव हा तद्विषयक अनुकूल वृत्तीनें त्या विषयांत सुख आहे असे समजतो व तो विषय प्राप्त झाला असतां आपल्याला आनंदी मानतो ( 'जीव आपुल्या प्रकाशता । झाला वृत्तीतें प्रकाशिता । वृत्ति जीवासि नानावस्था । निजस्वभावतां देतसे ॥ ' ए. भा.–१३–४०९; 'एवं वृत्तीचिया संगती । वाढली विषयांची आसक्ती । तेणें संसारबंध प्राप्ती । झाली निश्चिती जीवासी ॥ ' ए. भा.–१३–४१३ ). विषयां-मध्यें जर सुख असतें तर संतांनीं त्यांचा त्याग केला नसता ( 'प्रपंचामाजीं

असतें सुख । तरी कां त्यजिती सनकादिक ॥ ' ए. भा.-१०-२४७ ; ' प्रपंचीं जरी सुख जोडे । तरी कां सेविती गिरीकडे ॥ आनंदलहरी.-९४ ; ' तरी कां नेणतें मागें होते ऋषी । तिहीं या जनासी दुराविलें । ' तुका.-८८८ ).

**ओवी ११४—धरे**—आवरून धरणें, निवारली जाणें. **अभ्रच्छाया—** ढगाच्या साउलीनें.—ढगाची साउली चिरकाल टिकणारी नसते. तद्वतच विषयसुख हें फार वेळ टिकत नाहीं ( ' विषयाचें समसुख बेगडाची बाहुली । अभ्राची साउली त्राया जाईल रया ॥ ' ज्ञा. गा.-२० ; ' अभ्राच्छायेचिया जोडी । निदैवु घर मोडी ॥ ' ज्ञा.-१६-२२८; ' स्वप्नीचें धन तें धनचि नव्हे । मृगजळींचें जळ तें जळाचि नव्हे ॥ अभ्रींची छाया तें छायाचि नव्हे । तैसें विषयसुख नव्हे नव्हे रया ॥ ' ज्ञा. गा.-१२२ ). **त्रिमाळिकें**—तीन मजली—श्रीज्ञानेश्वर-महाराजांच्या काळीं तीनमजलीं घरें असावींत असें दिसतें. **सरे**—सरेल, पुरी पडेल.

**ओवी ११५—नेणतां**–न कळतां. **वायां**–व्यर्थ, निरर्थक.—ज्याप्रमाणें लुगड्याला चंद्रकळा म्हणणें व्यर्थ होय, त्याप्रमाणें विषयसुखाला सुख म्हणणें हें व्यर्थ होय. **जाल्पिजे**–बडबडले जातें. **महुर**–मधुर, गोड.—विषयसुख हें आरंभीं गोड वाटतें ( ' आणि विषयेंद्रियां । मेळु होतां धनंजया । जें सुख जाय थडिया । सांडूनि दोन्ही ॥ ' ज्ञा.-१८-७९४ ). परंतु त्याचा परिणाम अंतीं दुःखांत होतो ( ' पैं नामें विष महुरें । परी मारूनि अंतीं खरें । तैसें आदि जें गोडिरें । अंतीं कडु ॥ ' ज्ञा.-१८-८०४ ; ' बापा विषाची मधुरता । झणें आवडी उपजे चित्ता । परी तो परिणाम विचारितां । प्राणु हरी ॥ ' ज्ञा.-३-२१२ ; ' मंजुळवदनीं बचनागाची कांडी । शेवटीं बिघडी जीवप्राण ॥ ' तुका.-२७५१ ; ' अगा विषाचे कांदे वाटुनी । जो रसु घेइजे पिळुनी । तया नाम अमृत ठेउनी । जैसें अमर होणें ॥ ' ; ' तेविं विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख । परी काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे । ' ज्ञा.-९-४९८-९९ ).

**ओवी ११६—भौमा**—भूमिपुत्राचें, मंगळाचें.—आकाशांतील ' मंगळ ' हा ग्रह पृथ्वीचा मुलगा असल्यामुळें त्याला ' भौम ' म्हणतात. हा पापग्रह असून ' अशुभ ' फल देणारा आहे, परंतु याचें नांव मात्र मंगळ आहे. ( पै ग्रहांमाजीं इंगुळु । तयातें म्हणिजे मंगळु ॥ ' ज्ञा.-१८-७५१ ). **रोहिणीतें–**

मृगजळाला.—रोहिणी नक्षत्रांत ऊन फार कडक पडतें; त्या वेळीं मृगजळ दिसतें म्हणून मृगजळाला 'रोहिणी' असें म्हणतात. **बरळु**—बडबड.—ज्याप्रमाणें नांव 'लक्ष्मी' व धंदा गोवऱ्या विकण्याचा, किंवा नांव 'धनपाल' उदरनिर्वाह भिक्षेवर, हीं नांवें जशीं अर्थशून्य आहेत ('कुबेर नांव मोळी वाहे। कैसी पाहें फजिती ॥' तुका.–२८८६ ; 'घोळण्या नांव लक्षुमण। करितें भर्जन लाह्यांचें ॥' निळा.–६६९ ); त्याप्रमाणें विषयसुखाला सुख म्हणणें, ही केवळ निरर्थक बडबड आहे. या मृत्युलोकांतील भाषा व व्यवहार हा उफराटाच दिसतो ('जो बहुवे विषयविलासें गुंफे। तो म्हणती उवायें पडिला सापें। जो अभिलाषभारें दडपे। तयातें सज्ञान म्हणती ॥' ज्ञा.–९–५०९ ते ५१२ ).

**ओवी ११७**—**शीतल**–थंड, सुखावह. **मूषकासि**–उंदराला.—उन्हानें तप्त झालेला उंदीर जर सर्पाच्या फडेखालीं साउलीकरतां येऊन बसला, तर ती साउली त्याला ज्याप्रमाणें सुखकारक होत नाहीं, त्याप्रमाणें सुखाकरता विषयांचा आश्रय केला असतां त्यांत परिणामीं हित होत नाहीं ('दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा। कीं तो मासिया वेटाळी जिभा। तैसें प्राणिये कवणा लोभा। वाढविती तृष्णा ॥' ज्ञा.–९–५१४ ).

**ओवी ११८**—**आमिषकवळ**—गळास लावलेली उंडी, मासाचा घास—मासा जोंपर्यंत उंडीला तोंड लावत नाहीं तोंपर्यंत ठीक असतें. त्यानें तोंड लावल्याबरोबर धीवर हा गळ ओढतो व त्यामुळें माशाचें तोंड फाटून तो मरतो ('आमिषाच्चिये आसें गळ गिळी मासा। फुटोनिया घसा मरण पावे ॥' तुका.–२२८०; 'परी तयामाजी गळु आहे। जो प्राणातें घेउनि जाये। तो जैसा ठाउवा नोहे। झांकलेपणें ॥' ज्ञा.–३–२१४ ; 'तुका म्हणे गळ लागलिया मत्स्या। तळमळेचा तैसा लवलाहो ॥' तुका.–१६७८). तद्वतच जोंपर्यंत जीव हा विषयाचा द्रष्टा असतो तोंपर्यंत विषय हा त्याला बाधक होत नाहीं; परंतु मनुष्यानें एकदां का विषयाचा संग केला कीं तो त्याला घातक होतो ('धरूं जातां संग। तंव तो होतो बाधक ॥' तुका.–३९०६; 'पतंगा दीपीं आलिंगन। तेथ त्यासी अचुक मरण। तेवीं विषयाचरण। आत्मघाता ॥' ज्ञा.–३–२०१; 'विषय सेवितां गा जन्ममरणाचा बाधु।' नाथ.–३७०६ ).

**ओवी ११९**—**विरक्तांचिये**—विरक्तांच्या–वैराग्यांत दोन प्रकार आहेत. एक जिहासा वैराग्य व दुसरें जिज्ञासा वैराग्य (अधिक माहिती **१२** वा

अध्याय प्रकरण २, पानें १३५–३६ पहा ). परमार्थांत जिज्ञासा वैराग्य लागतें ( ‘ विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगितो ज्वाळ अग्नि जैसा ॥ ’ तुका.–१२८७). अशा वैराग्यवान् पुरुषाला विषय हे वमनासारखे वाटतात ( ‘ विटलें हें चित्त प्रपंचापासूनी । वमन हें मनीं बैसलेंसें ॥ ’ तुका.–१८७२ ; ‘ तुका म्हणे कडु वाटतो प्रपंच । रोकडे रोमांच कंठ दाटे ॥ ’ तुका.–२१८२ ‘ उठिलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्गु ऐसा सांडणें । जैसें वमुनिया सुणें । आतांचि गेलें ॥ ’ ज्ञा.–१५–२५६). **दिठी**–दृष्टीनें.–विषयांच्याकडे कविदृष्टीनें किंवा विषयासक्त-पुरुषाच्या दृष्टीनें पाहूं नये कारण त्यांची दृष्टि विकारयुक्त असते. विकाररूपी चष्म्यांतून विषयांच्याकडे पाहिलें असतां विषय हे सुखरूप दिसतात, विरक्त पुरुषांच्या दृष्टीनें पाहिलें असतां विषयांचें यथार्थ स्वरूप दृष्टीस पडतें; कारण विरक्त पुरुषाची दृष्टि निर्दोष व स्वच्छ झालेली असते. नित्य काय व अनित्य काय, सार काय व असार काय, हें त्यांच्या दृष्टीला झट्कन् कळतें ( ‘ तयातें योगीश्वर अलौकिकें । दिठीचेनि हाततुकें । अनुमानिती कौतुकें । तंव हलुवट आवडे ॥ ’ ज्ञा.–८–२६६ ); म्हणून विषयसेवनानें प्राप्त होणारी पुष्टि ही, पांडुरोग्याच्या अंगास आलेल्या सुजेप्रमाणें घातुक असते, असें ते समजतात ( ‘ पांडुरोगें आंग सुटलें । तें तयाचि नांवें खुंटलें । तैसें नेणें भुलले । आहार-निद्रा ॥ ’ ज्ञा.–१३–७४६ ).

**ओवी १२०**—**साद्यंत**—आरंभापासून शेवटपर्यंत, **दुःख**–क्लेश, कष्ट.—विषयोपभोगांत दुःख असतें. उदाहरणार्थ, द्रव्य विषय घेतला तर द्रव्य मिळवितांना दुःख होतें, तें जतन करतांना दुःख होतें व तें नष्ट झाल्यावरही दुःख होतें ( ‘ द्रव्यार्जनीं वसे प्रयास । द्रव्यरक्षणीं चिंतेचा वास । द्रव्यव्ययीं सबळ त्रास । भ्रमाचा रहिवास धननाशीं ॥ ’, ‘ आदिमध्यावसानीं पाही । द्रव्य तें समूळ अपायी । तेथ सुखाचा लेश नाहीं । हे ऐसें पाही मज जाहलें ॥ ’ ए. भा.–२३–२००–२०१ ). द्रव्याच्या मागें स्तेयादि पंधरा अनर्थ आहेत ( ‘ स्तेयं हिंसाऽनृतं दंभः कामः क्रोधः स्मयो मदाः । भेदो वैरमविश्वासः संस्पर्धा व्यसनानि च ॥ ’ ए. भा.–२३, श्लोक १८ ). असेच इतर विषयही अनर्थ-कारक आहेत. गीतेमध्यें राजस सुखाचें वर्णन करतांना राजस सुखांत आरंभीं सुख असतें ( ‘ विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ॥ ’ गीता–१८–३८ ), असें जरी म्हटलेलें आहे, तरी तें वर्णन विषयी लोकांच्या दृष्टीनें केलेलें आहे,

शाल्याच्या दृष्टीनें केलेलें नाहीं. **मूर्ख**—अविवेकी, अज्ञानी.—जे शास्त्रसंस्कार-विहीन आहेत, ज्यांना वैराग्य कशाशीं खातात हें माहीत नाहीं, अशा अज्ञ लोकांना विषय सेवन केले नाहींत तर करमत नाहीं. विषय हे त्यांचें जीवनच होऊन बसतें ( 'तैसे वैराग्याची शिंव न देखती । जे विवेकाची भाष नेणती । ते मूर्ख केंवी पावती । मज ईश्वरातें ॥' ज्ञा.–४–२५ ; 'परि यमनियमांचिया वाटा न वाचिजे । कहीं वैराग्याची से न करिजे । केवळ विषयजळीं ठाकिजे । बुडी देउनी ॥' ज्ञा.–६–४२२ ).

**ओवी १२१-अंतर**-आंतली बाजू, सत्यस्वरूप.–जीव विषयांच्याकडे धांव घेतात याचें कारण, त्यांना विषयांचें यथार्थ स्वरूप कळलेलें नसतें. त्यांना विषय हे सत्य वाटतात म्हणून त्यांची विषयांच्या ठिकाणीं आलंबनबुद्धि असते. मिथ्या वस्तूचें ठिकाणीं मनुष्याची प्रायः आलंबनबुद्धि नसते; जसें रस्त्यात पडलेला रुपया दिसला तर मनुष्य त्या ठिकाणीं थाबतो. परंतु तोच रुपया कथलाचा आहे असें दृष्टोत्पत्तीस आलें कीं तो त्याचा त्याग करून पुढें चालूं लागतो. मिथ्या वस्तूचा त्याग आपोआप होत असतो. उदाहरणार्थ, मातीच्या बाहुलाबाहुलींचा किंवा काठीच्या घोड्याचा त्याग, मोठेपणीं स्वाभाविकच होतो. तद्वतच विषयांबद्दल मिथ्यत्वाची कल्पना झाली कीं, त्यांचा त्याग आपोआपच होतो. सामान्यतः जीवाची विषयांबद्दल सत्यत्वाची, सुखरूपत्वाची व सुंदरपणाची बुद्धि असते. परंतु सत्संगतीनें व सच्छास्त्रश्रवणानें ज्या जीवाला विषय हे अनित्य, दुःखरूप व अमंगल म्हणजे अशुचि आहेत असें अपरोक्ष-रीत्या पटतें, त्याच्याकडून विषयांचा त्याग सहजगत्या होतो ( 'जे विषें रांधिली रससोये । जैं जेवणारा ठाउवी होये । तैं तो ताटाचि सांडूनि जाये । जयापरी ॥', 'तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवाडितां । पाठीं लागे ॥' ज्ञा.–१५–३८–३९ ). जीव हे, विषयांच्या बाहेरच्या भपक्याला भुलतात ( 'आणि शब्दादिक सुहावे । सहज रंगे हवावे । विषय-पल्लव नवे । नित्य होती ॥' ज्ञा. –१५–१६१ ). वास्तविक विषय हे दुःखरूप आहेत, परंतु ते, आपण सुखरूप आहोंत असें भासवितात व त्यामुळें जीव फसतात ( 'दुःख लेऊनि सुखाची आंगी । सळित जगातें ॥' ज्ञा.–९–५०२ ). **बापुडे**-गरीबबिचारे, वेडगळ, मूर्ख. **अगत्य**-अवश्य.—विषय सेवन केले नाहींत तर त्यांचें भागतच नाहीं. कित्येकांना वैद्यानें जरी

सागितलें कीं, तुमच्या प्रकृतीला दारू पिणें व विडी ओढणें हें अपायकारक आहे तरीही त्यांचे हे विषय सुटत नाहींत. कांहीं अविवेकी पुरुष इतके विषयासक्त असतात कीं, ते योग्य काळ व योग्य वेळ पाहत नाहींत व लोकापवादाची पर्वा करीत नाहींत ( 'तैसा जो विषयांलागीं। उडी घाली जळतिये आगीं। व्यसनाची आंगीं। लेणीं मिरवी॥' ज्ञा.-१३-७०६). **चिळसी**-किळस, तिटकारा, शिसारी.—मांसाहारी लोकांना मिष्टान्न आवडत नाहीं. त्यांना मांसच गोड लागतें ( 'शूकरासी विष्ठा माने सावकाश। मिष्टान्नाची त्यास काय गोडी॥' तुका.-२७५५ ; 'परउपकार पुण्य त्या वावडें। विषाचें तें किडे दुग्धीं मरे॥' तुका.-२७२५ ).

**ओवी १२२—दुःखियां**-दुःखी लोकांचें. **जिव्हार**—जीवन.-संवयीनें व कालानें मनुष्याला दुःखच सुखासारखें होऊन बसतें. ओझीं वाहणारे जे मजूर असतात त्यांना सबंध दिवसांत ओझें वाहण्यास मिळालें नाहीं तर बरें वाटत नाहीं. कित्येक सेवानिवृत्त झालेले लोक, करमत नाहीं म्हणून, पुन्हा नोकरी करतात. कित्येकांचीं मुलें फार रडकीं असतात, परंतु तीं जर परगांवाला गेलीं तर त्यांना करमत नाहीं. **दर्दुर**—बेडूक.-बेडकांचा चिखल खाणें हा स्वभाव आहे ( 'बेडकानें चिखल खावा। काय ठावा सागर॥' तुका.-३११९; 'कां कमलकंदा आणि दर्दुरी। नांदणूक एकेचि घरीं। परि परागु सेविजे भ्रमरीं। जवळिलां चिखलुचि उरे॥' ज्ञा.-९-५८ ). तसेंच विषयासक्त पुरुषांचा मरेपर्यंत विषय सेवणें हा स्वभावच होऊन बसतो. वयाला सत्तर वर्षें झालीं तरी पुन्हा लग्न करतात व नवीन प्रपंच थाटतात ( 'जरी मरों टेंकलें शरीर। तरी व्यवहारी साधी वृत्ति क्षेत्र। पाया शोधोनि बांधे घर। पुत्रपौत्र नांदावया॥' ए. भा.-९-३६५ ). **जलचर**—पाण्यांतील प्राणी, मासे.—पाण्याशिवाय ज्याप्रमाणें मासे जगूं शकत नाहींत त्याप्रमाणें विषयासक्त पुरुष विषयोपभोगांवांचून राहूं शकत नाहींत. कांहींना विडीचें किंवा चहाचें इतकें व्यसन असतें कीं, त्याना विडी किंवा चहा जर मिळाला नाहीं तर त्यांच्या डोक्यांत भ्रमण सुरू होतें. स्वतःचीं इंद्रियें जरी विषयोपभोग घेण्यास असमर्थ झालीं तरी हे पुरुष दुसऱ्याला विषय भोगावयास लावतात व आपण तें पाहत बसतात.

**ओवी १२३—दुःखयोनि**—क्लेशकारक जन्म, पशुपक्ष्यादिकांचे जन्म.—

**योनि** म्हणजे प्राण्यांच्या जाती किंवा वर्ग. या योनि एकंदर ८४ लक्ष मानिलेल्या आहेत. त्यांत २० लक्ष वृक्ष, ९ लक्ष जलचर, ११ लक्ष किडे, १० लक्ष पक्षी, ३० लक्ष पशु व ४ लक्ष मानव असे आहेत. **निरर्थका**—व्यर्थ, फजूल, फुकट.—या ठिकाणीं श्रीज्ञानेश्वरांची भाषा उपरोधिक पण कळकळयुक्त अशी आहे. सगळेच जर विरक्त झाले तर मग नरकाचा उपयोग होणार नाहीं ! सगळेच लोक जर सदाचरणी झाले तर मग तुरुंगांना वावच राहणार नाहीं. किंबहुना काहीं दुष्ट लोकांचा पुरुषार्थ या दुःखमय योनींना सार्थकता आणणें हाच असतो म्हणून जन्मभर ते पापच करीत राहतात.

**ओवी १२४—संकट**—त्रास, आपत्ति.—गर्भवासामध्यें फार दुःख असतें. आईच्या पोटांत, टिचभर जागेंत, मांसमलमूत्राच्या थरांत खालीं डोकें व वर पाय अशा स्थितींत नऊ महिने राहावें लागतें ( ‘ काय सांगो गर्भींची यातना। मज भोगितां नारायणा । मांस मळमूत्र जाणा । तुज क्षणक्षणा ध्यात असे ॥ ’ तुका.–४६१ ; ‘ प्रथम केला गर्भीं वास । काय ते सांगावे सायास । दुःख भोगिलें नवही मास । आलों जन्मास येथवरी ॥ ’ तुका.–४६३; ‘ मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्ठेच्या दाथरीं । उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मोनि मरती ॥ ’ ज्ञा.–९–३३१; ‘ मातेचिया जठरकुहरीं । विष्ठामूत्रांच्या दाथरीं। अधोमुख नवमासवरी। उकडी भारी जठराग्नी ॥ ’ ए. भा.–१०–४२८ ते ४३५). **कष्ट**—दुःख.—जन्ममरणामध्येंही फार दुःख असतें. संसारदुःखाला कारण शरीर आहे व शरीराला कारण पापपुण्यात्मक कर्मे होत ( ‘ अगा कर्मे जें उरावें । तें तिहीं सुखदुःखीं फळावें । आणि तयातें भोगावया यावें । देहा एका ॥ ’ ज्ञा.–९–४०३ ). जन्मतांना जीवाला दुःख होतें व त्याबरोबर त्याच्या आईलाही फार दुःख होतें ( ‘ नवमास कष्टलासि दहाव्यानें प्रसूत झाली । येतांचि कर्मजाड तुझी मान अडकली । आकांतु ते जननीये दुःखें धाय मोकली । स्मरे त्या हरिहरा ध्यायीं कृष्णमाउली ॥ ’ ज्ञा. गा.–४१३ ; ‘ म्हणे पूयगर्ते रिगाला । अहा मूत्ररंध्रें निघाला । कटा मियां चाटिला। कुचस्वेदु ॥ ’, ‘ ऐसिऐसिया परी । जन्माचा कांटाळा धरी । म्हणे आतां तें मी न करी । जेणें ऐसें होय ॥ ’ ज्ञा.–१३–५३९–४०; ‘ जन्ममरणा परतें दुःख कोण तें अधिक सांगपां ॥ ’ तुका.–२०२२). जो जन्माला येतो त्याच्याच मागें ‘ आध्यात्मिक ’, ‘ आधिभौतिक ’ व ‘ आधिदैविक ’ असे

त्रिविध ताप किंवा दुःखें लागतात ( अधिक माहिती अध्याय १२ वा प्रकरण २ रें, पान १२४ पहा ). तसेंच मरणांतही मनुष्याला फार दुःख होतें. दुसऱ्याचें मरण मनुष्याला पाहवत नाहीं तर मग स्वतःला मरण्याची पाळी आली असतांना मनुष्याला फार दुःख होईल यांत नवल नाहीं ( 'एऱ्हवीं आयुष्याचें सूत्र बिघडतां । भूतांची उमटे खडाडता । काय न मरतयाहि चित्ता । युगांतु नोहे ॥' ज्ञा.-७-१८२ ; 'अगा मर हा बोलूं न साहती । आणि मेलिया तरी रडती ॥' ज्ञा.-९-५१३ ). गर्भवासांत व जन्ममरणांत इतकें दुःख असतांना जीवांना त्याबद्दल अनुताप उत्पन्न होत नाहीं, याचें कारण जीवाचा स्वभाव हा विसराळू असल्यामुळें त्याला त्याची जाणीव राहत नाहीं ( 'दुःख शोकांच्या घाई । मारिलियाची सेचि नाहीं । हें सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ॥' ज्ञा.-७-१०७ ). **विसावेन वीण**-न थांबतां, विसांवा न घेतां.-विषयांचें सेवन केल्यानें मनुष्याच्या मागें जन्ममृत्यु लागतात ( 'विषय सेवितां गा जन्ममरणाचा बाधु' नाथ-३७०६). हें जन्ममृत्यूचें चक्र त्याच्यामागें अविश्रांत लागतें ( 'किती वेळा जन्मा यावें । किती व्हावें फजीत ॥' तुका.-१७५७ ; 'क्षण एक तोही नाहीं विसांवा । लक्ष चौऱ्याशीं घेतल्या धांवा ॥' तुका.-४६३ ; 'पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनम् ॥ -शंकराचार्य ; 'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ॥' गीता-२-२७; 'उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे । हें घटिकायंत्र तैसें । परिभ्रमे गा ॥' ज्ञा.-२-१५९ ). **वाट**-मार्ग.-किंबहुना ही जन्मदुःखरूपी वाट अखंड चालण्याकरितांच पापी लोकांचें निंद्य आचरण चालू असतें ( 'नरका जाणें तरी पापें आचरावीं । कथा न करावी विठोबाची ॥' तुका.-१२७१ ; 'आणीक एक कोड । नरका जावयाची चाड । तरी संतनिंदा गोड । करी कवतुकें सदा ॥' तुका.-२४५८ ).

**ओवी १२५**—**विषयीं**-विषयलंपटांनीं. **महादोषीं**-घोरपातकांनीं.—ब्रह्महत्या, सुरापान, गुरुतल्पगमन, स्तेय आणि यांच्याशीं व्यवहार करणें, अशीं पांच महापातकें आहेत ( 'ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वंगनागमः । महान्ति पातकान्याहुस्तत्संसर्गश्च पंचमम् ॥' मनुस्मृति-११-५ ). विषयासक्त पुरुष हा यथेच्छ दुराचरण करीत असल्यामुळें ( 'अंगा मनासि रुचावे । येतूलेनि कृत्याकृत्य नाठवे । जो करणेंयाचेनि नांवें । भलतेंचि करी ॥' ज्ञा.-१३-

७७७ ). त्याच्या ठिकाणीं हीं पांचही महापातकें संभवतात. **संसार**–सृष्टि, मनुष्यादि ८४ लक्ष योनि.

**ओवी १२६—नाथिलें**–नसलेलें, लटिकें. **अविद्याजात**–अविद्येपासून उत्पन्न झालेलें, अविद्याकार्य म्ह. जगतादि सर्व प्रपंच.—मुळांत अविद्याच खोटी ( ' अविद्या येणें नांवें । मी विद्यमानाचि नव्हे । हे अविद्याचि स्वभावें । सांगतसे ॥ ' अमृ.–६–३८ ). मग तिचें कार्य जो जगतादि प्रपंच तो सत्य कसा असणार ? ( ' मूळ अज्ञानचि तंव लटिकें । मा तयाचें कार्य हें केंतुकें । म्हणोनि संसाररुख सत्य कें । वावोचि पा ॥ ' ज्ञा.–१५–२२३ ). वास्तविक जगत् हें तिन्ही काळांत उत्पन्न झालेंच नाहीं, असा वेदाताचा मुख्य सिद्धांत आहे. यालाच ' अजातवाद ' म्हणतात, परंतु हें लोकांना पटत नाहीं एवढ्याकरतां वेदांतशास्त्र जगत् हें अज्ञानाच्या योगानें प्रतीत होतें असें सांगतें. ज्याप्रमाणें रज्जूच्या अज्ञानानें रज्जूवर मिथ्या सर्पाची प्रतीति होते, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळें मिथ्या जगताची आत्मस्वरूपाचें ठिकाणीं प्रतीति होते ( ' रज्जु सर्पाकार ।.भासयेलें जगडंबर ॥ ' तुका.–४०६६ ). तात्पर्य अविद्याजात हा जगतादि संसार सर्व मिथ्या आहे. **साच**—खरें, सत्य—-विषयासक्त पुरुष विषय हे सुखरूप आहेत अशा बुद्धीनें विषयांचें सेवन करतात व त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं नाना प्रकारच्या वासना उत्पन्न होतात. त्या वासनांच्या पूर्तीकरतां त्यांच्याकडून कर्तृत्वमद व फलास्वाद घेऊन इष्ट, अनिष्ट व मिश्र अशीं कर्मं घडतात. याचा परिणाम त्यांना, त्यांच्या कर्मानुसार स्वर्ग, नरक म्ह. पशुपक्ष्यादि योनि किंवा मृत्युलोकांत जन्म मिळतो. अशा प्रकारें या तिन्ही लोकांचें अस्तित्व या विषयी पुरुषांच्यामुळें आहे. **सुखबुद्धि**—सुख या कल्पनेनें.–वास्तविक विषय हे दुःखरूप आहेत; परंतु विषयी पुरुषांना त्यांच्या ठिकाणीं सुख दिसतें म्हणून ते त्यांचें सेवन करतात व जन्ममरणादि दुःख भोगतात ( ' तेविं विषयांचें जें सुख । तें केवळ परमदुःख । परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥ ' ज्ञा.–९–४९९ ). [ अशी एक कविकल्पना आहे कीं, सुख व दुःख हीं एकाच आईचीं मुलें होत. परंतु ज्या वेळेस सर्व लोक सुखाकडे जाऊं लागले व दुःखाला कोणीच विचारीना, त्या वेळेस आईला दुःखरूपी मुलाची कींव आली व ती आपल्या सुखरूपी मुलाला म्हणाली, " तुझा धाकटा भाऊ जो ' दुःख ' आहे, त्याला कोणीच विचारीत

नाहीं तर तुझें, आंगडें व टोपडें तुझ्या दुःखरूपी भावाला परिधान करण्यास दे. " त्यानंतर त्या सुखरूपी मुलानें आपलें आंगडें व टोपडें दुःखरूपी मुलास दिलें व त्याचा परिणाम असा झाला कीं, सर्व लोक दुःखरूपी मुलाच्या वरच्या पेहरावाला भुलून तो सुखरूप मुलगा आहे अशा समजुतीनें त्याच्याकडे जाऊं लागले व दुःख भोगूं लागले–' दुःख लेऊनि सुखाची आंगी। सळित जगातें॥' ज्ञा.–९–५०२. ]

**ओवी १२७—वोखटा**–वाईट.—विषयांना ' वाईट ' म्हणण्याचें कारण, विषय हे आनित्य व दुःखरूप आहेत ( ' लटिका व्यवहार सर्व हा संसार। वायां येरझार हरिविण॥ ' ज्ञा. गा.–५७४; ' ठाउकाचि आहे संसार दुःखाचा। चित्तीं सीण याचा वाहों नये॥ ' तुका.–२२५३ ). शिवाय विषयांचें सेवन हें अनेक जन्मांना कारणीभूत होतें. **झणें**—हा शब्द क्रियापदाला जोडून त्याचा निषेधार्थी उपयोग करतात. **झणें जाशीं**—जाऊं नको.—' अर्जुना, या विषयी लोकांचा स्वभाव असाच आहे, तूं मात्र या विषयी लोकांच्या नादीं लागून विषयांचें सेवन करूं नकोस ( ' तरि झडझडोनि वाहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग । जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें॥ ' ज्ञा.–९–५१६ ). ज्यांच्याजवळ सात्त्विक धैर्य असतें तेच पुरुष या विषयांना जिंकूं शकतात.

**ओवी १२८—विरक्त—**वैराग्यवान्.—ज्यांना विषयांचें अनित्यत्व व व दुःखरूपत्व हें अपरोक्षरीत्या पटलेलें असतें ते पुरुष विषय जरी प्राप्त झाला तरी त्याचें सेवन करीत नाहींत ( ' तैसें ऐहिकींचे कां स्वर्गींचे। भोग पाइक जालिया इच्छेचे। परी भोगावें हें न रुचे। मनामाजी॥ ' ज्ञा. १६–१६६ ). **निराशां**—निष्काम पुरुषांना.—प्राप्त पुरुष निरिच्छ असतात ( ' भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास। गेले आशापाश निवारोनि॥ ' तुका.–१९९७; ' पुत्र वित्त कलत्र। हे जालियाही स्वतंत्र। माझें न म्हणे पात्र। विषाचें जैसें॥ ' ज्ञा.–१८–९५८ ), यामुळें ते विषयांनीं दाखविलेल्या सुखानें मोहित होत नाहींत. उलट ते त्याचा विषाप्रमाणें त्याग करतात. विष खाल्लें असतां एकदांच मृत्यु येतो, पण विषयाचें सेवन केलें असतां मनुष्याला अनेक जन्म घ्यावे लागतात व तितक्या वेळां मरावें लागतें ( ' विखाहूनि विषय आधिक। विख एक वेळा मारक। विषयो पुनः पुनः घातक। काळसर्पें लोक भुलविलें॥ '

ए. भा-१९-१२३; 'मुक्तिम् इच्छसि चेत् तात विषयान् विषवत् त्यज।'). विषयांत जर सुख असतें तर सर्वैश्वर्यसंपन्न अशा विचारवंत भूपतींनीं व संतांनीं त्यांचा त्याग केला नसता ('प्रपंचीं जरी सुख जोडे। तरो कां सेविती गिरीकडे। राज्य टाकूनि गेले थोडे। ते काय वेडे म्हणावें॥ भर्तृहरीनें राज्य टाकिलें। तेणें श्रीगोरखातें पुसिलें। राज्य टाकुनि मुंडि जाले। कितेक गेले भूपती॥ मग श्रीगोरक्षनाथ बोलती। नव्याणव कोटी भूपती। इतर जनांची नाहीं गणती। योगाप्रती निघाले॥' आनंदलहरी-९४ ते ९६.

**ओवी १२९—यांची**—या विषयांची. **मातुही**-वार्तासुद्धां, खबरही.— ज्ञानी पुरुष विषयांच्या ठिकाणीं रममाण होत नाहीं, त्याच्या ठिकाणीं या विषयांची वार्ताही नसते; याचें कारण त्याला, सुखाची जरूरी नसते असें नाहीं. प्रत्येक पुरुषाची अमृतत्व, सुख व ज्ञान यांकडे स्वाभाविक प्रवृत्ति असते. 'दुःखात् उद्विजते जंतुः सुखं सर्वाय रुच्यते।' असें असतांना ज्ञानी पुरुष विषयांकडे जात नाहीं याचीं कारणें दोन आहेतः एक, त्याच्या ठिकाणीं विषयाबद्दल दोषदर्शन झालेलें असतें व दुसरें, अमूप व अविनाशी असा जो आत्मानंद तो त्याला नित्य प्राप्त झालेला असतो. ज्याच्या तोंडाला साखर लागली त्याला जसा पेरू गोड लागत नाहीं, तसेंच जो आत्मसुखांत रममाण झाला त्याची विषयांकडे प्रवृत्ति होत नाहीं ('पुढें चढें हात। त्याग मागिलां उचित॥' तुका.-३१७५); एवढेंच नव्हे तर त्याच्या ठिकाणीं देहाचीही खबर नसते मग देहाच्या पलीकडे असणारे जे विषय त्यांची खबर कोठून असणार? ('कां शस्त्रवरी तोडिलिया। देह अग्निमाजीं पडलिया। चित्त महासुखीं पहुडलिया। चेवोचि नये॥', 'ऐसें आपणपां रिगोनि ठाये। मग देहाची वास न पाहे। आणिकाचि सुख होऊनि जाये। म्हणूनि विसरे॥' ज्ञा.-६-३७०-७१; 'देहं च नश्वरमवस्थितमुत्थितं वा सिद्धो न पश्यति यतोऽध्यगमत्स्वरूपम्। दैवादपेतमुतदैववशादुपेतं वासो यथा परिकृतं मदिरामदांधः॥' ए. भा.-१३-श्लोक ३६; 'विषयी विसर पडिला निःशेष। अंगीं ब्रह्मरस ठसावला॥' तुका.-३५८४; 'तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा। नाहीं विषयांचिया येरझारा। जो आत्मबोधाचिया वोवरा। पहूडला असे॥' ज्ञा.-६-६२). **देहीं**-देहामध्यें, देहांत असतांना. **देहभाव**-देहाचे विकार (कामक्रोधादिक). **स्ववश**-स्वाधीन.-जो या देहांत असतांनाच कामक्रोधादि विकारांना जिंकतो

तोच खरा सुखी होय. इंद्रियांना व विकारांना जिंकणें हाच खरा पुरुषार्थ आहे, यानेंच जीवाला अत्यंतिक सुख अथवा मोक्ष प्राप्त होतो ( ' नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोडें । आणूनि निराळें द्यावें हातीं ॥ इंद्रियांचा जय साधूनियां मन । निर्विषय करण असें तेथें ॥ ' तुका.–३९२०; ' इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाही न ये वरी मन ॥ ' तुका.–३७१८ ).

ज्ञानी पुरुषाची अथवा महात्म्याची ' अंतर व बाह्य ' अशीं दोन प्रकारचीं लक्षणें असतात. बाह्य लक्षणांत त्या त्या सांप्रदायानुसार फरक असतो. उदाहरणार्थ, आश्रम–संन्यासी असेल तर तो भगवीं वस्त्रें परिधान करतो : वारकरी असेल तर तुलसीची माला, मुद्रा, वगैरे धारण करतो व रामदासी असेल तर भगवी कफनी, वगैरे धारण करतो. परंतु अंतर लक्षणें हीं सामान्यतः सर्व प्राप्त पुरुषांचीं एकच असतात. गीतेंत ठिकठिकाणीं प्राप्त पुरुषांची जीं अंतर लक्षणें सांगितलीं आहेत त्यांत ' कामक्रोध स्ववश ' असणें याला प्राधान्य दिलेलें आहे.

कामक्रोध हे फार दुर्जय आहेत. जे शेजारीं शेजारीं राहतात. त्यांना जसें एकमेकांचें सामर्थ्य पूर्णपणें माहीत असतें तसेंच ज्या अंतःकरणांत कामक्रोधादि विकार राहतात त्याच अंतःकरणांत भगवंतही राहतात, म्हणून त्यांना या कामक्रोधांच्या सामर्थ्याची पूर्ण जाणीव असल्यामुळें (' हे चैतन्याचे शेजारी । वसती ज्ञानाच्या एका हारी ॥ ' ज्ञा.–३–२५६ ) त्यांनीं यांच्या पराक्रमाचें वर्णन गीतेंत यथातथ्य केलेलें आहे. भगवंतांनीं यांना महाखादाड व महापापी असें म्हटलें आहे (' काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः । महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ गीता–३–३७; ' हे जळेंवीण बुडविती । आगीवीण जाळिती । न बोलतां कवळिती । प्राणियांतें ॥ हे शस्त्रेंविण साधिती । दोरेंवीण बांधिती । ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेउनी ॥ ' ज्ञा.–३–२५७–५८ ). जीव हा मूळचा सुखरूप व नित्यतृप्त असतांना त्याचा आनंद व संतोष घालविणारे जर कोणी असतील तर ते कामक्रोध होत (' म्हणे अर्जुना परियेसी । जो हा अभिलाषु प्रौढ मानसीं । तो अंतराय स्वसुखेंसी । करीत असे ॥ ', ' जो सर्वदा नित्य तृप्तु । अंतःकरण भरितु । परी विषयामाजि पतितु । जेणें संगें कीजे ॥ ' ज्ञा.–२–२९१–९२ ; ' इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिले । आनंदरोप सांडिलें । उपडूनियां ॥

इहीं बोधाचीं रोपें लुंचिलीं। सुखाची लिपि पुसिली। जिव्हारीं आगी सूदली। तापत्रयाची॥' ज्ञा.–३–२५३–५४ ). कामक्रोधांच्या तडाक्यांतून सामान्य प्राणी सुटणें कठिणच; पण खुद्द देवादिकांच्यावरही हे मात करूं शकतात ('मज मन्मथाचा यावा। न साहवे देवां दानवां। मग तेथें इतरां मानवां। कोण केवा साहावयासी।' ए. भा.–४–१२२; 'मागें तपस्वी वाखाणिलें। म्हणती कामक्रोधां जिंकिलें। त्यासीही आम्ही पूर्ण छळिलें। ऐक तें भलें सांगेन॥' ए. भा.–४–१२८–१३३ ). यांच्या ठिकाणीं दयेचा लवलेशही नसतो. ('तरी हे काम क्रोधु पाहीं। जयांतें कृपेची सांठवण नाहीं। हे कृतांताच्या ठायीं। मानिजती॥' ज्ञा.–३–२४० ) व हे भक्तिमार्गी यांच्यावरही हल्ला केल्याखेरीज राहत नाहींत ('हे ज्ञाननिधीचे भुजंग। विषयदरांचे वाघ। भजनमार्गींचे मांग। मारक जे॥' ज्ञा.–३–२४१ ). हे जीवंतपणींच मनुष्याला त्याच्या पापाचें फल भोगावयास लावतात ('त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः। कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत्॥' गीता. १६–२२; 'हे तिन्ही जीवीं जंव जागती। तंववरी निकयाची प्राप्ती। हे माझे कान नाइकती। देवोही म्हणे॥' ज्ञा.–१६–४३४ ). परमार्थांत तर हे घातक आहेतच ('कामक्रोधलोभ घेऊनियां संगें। परमार्थासि रिघे तोचि मूर्ख॥' ज्ञा. गा.–६३२ ); परंतु ज्यांना संसार सुरळीत करावयाचा असेल त्यांनाही यांना नियमित ठेवावें लागतें ('तुका म्हणे कामा नाहीं एक मुख। जिरवितां सुख होतें पोटीं॥' तुका.–३२३० ). असे बलवत्तर असलेले कामक्रोधादिक विकार, प्राप्त पुरुषानें स्वपराक्रमानें जिंकून स्ववश केलेले असतात. चोराच्या मागेंपुढें शिपाई चालतात व मामलेदाराच्याही मागेंपुढें शिपाई असतात. परंतु चोर हा शिपायांच्या ताब्यांत असतो व मामलेदाराच्या ताब्यांत शिपाई असतात. तद्वतच सामान्य लोक हे कामक्रोधांच्या ताब्यांत असतात व ज्ञानी पुरुषांच्या ताब्यांत कामकोध असतात ('कामक्रोध बंदीखाणी। तुका म्हणे दिले दोन्ही। इंद्रियांचे धणी। आम्ही झालों गोसावी॥' तुका.–१८६३; 'कामक्रोधा नाहीं चाली। भूतीं जाली समता॥' तुका.–१९४० ). हे कामक्रोध ताब्यांत असले म्हणजे त्यांचा वाटेल तेव्हां सदुपयोग करितां येतो. उदाहरणार्थ, काम जर नसेल तर भगवंताची सेवा करतां

येणार नाहीं ( ‘ जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भूली संभ्रम । नेणती लोक ॥ ’ ज्ञा.–९–३६३ ). श्रीएकनाथांनीं एका ब्राह्मणाचें कल्याण करण्याकरतां उसना राग आणला होता ; ज्ञानी पुरुष हे कामक्रोधाबरोबर वाहवले जात नाहींत. जेव्हां ‘ सोहंभावप्रतीति ’ प्राप्त होते त्या वेळेस हे कामक्रोधादिक शरीरभाव संपूर्ण नष्ट होतात ( ‘ तैं शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती । जैं सोहंभावप्रतीति प्रगट होय ॥ ’ ज्ञा.–२–३०९ ; ‘ काम क्रोध लोभ निमाले ठायींचि । सर्व आनंदाची सृष्टि झाली ॥ ’ तुका.–३५५१ ).

**ओवी १३०–बाह्य**–बाह्यविषय, जगत्.–वृत्ति जेव्हां शरीराशीं तादात्म्य करते तेव्हां जगताची प्रतीति येत असते. या पुरुषाची वृत्ति आत्मसुखाला सोडून बाहेर येत नाहीं ( ‘ सहजे स्वसुखाचेनि अपारें । सुखाडें अंतरें । रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घली ॥ ’ ज्ञा. ५–१०६ ; ‘ अनुहातीं गुंतला नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥ ’ तुका.–३६०२ ). ज्या वृत्तिद्वारा जगताची प्रतीति येते ती वृत्तिच याची निवृत्त झालेली असते, म्हणून याला जगताची प्रतीति येत नाहीं ( ‘ सहज मी आंधळा गा निजानिराकार पंथें । वृत्ति हे निवृत्ति झाली जन न दिसे तेथें । मी माझें हारपलें ठायीं जेथींच्या तेथें । अदृश्य तेंचि जालें । कांहीं दृश्य जें होतें ॥ ’ तुका.–३५१ ). हा प्राप्त पुरुष सदा आत्मसुखानें सुखी असतो ( ‘ ते आपेआप देखोनि देखीं । मियां आत्मेनि सदा सुखी ॥ ’ ज्ञा. १५–४२४ ). **निःशेष**–पूर्णपणें.–विषयोपभोगांत कांहीं काल जगताचा विसर पडतो, परंतु तो विसर, ‘ सशेष ’ विसर होय ; कारण विषयांची व इंद्रियांची ताटातूट झाली असतां तो विसर नाहींसा होतो. निद्रानंदांतही जगताचा विसर पडतो, पण निद्रेंतील आनंद हा अज्ञानानें आवृत असतो व मनुष्य जेव्हां जागृतींत येतो त्या वेळेस झोंपेंतील विसर नष्ट होतो म्हणून तोही विसर ‘ सशेष ’ होय ( ‘ साचाचि पुढती वीरा । जरी न येतां स्वप्न जागरा । तरी ब्रह्मभावो साचोकारा । म्हणों येता ॥ ’ ज्ञा.–१५–५१७ ). पण आत्मानंदांतील विसर हा ‘ निःशेष ’ विसर असतो. कारण आत्मानंदानुभवी पुरुषाची वृत्ति पुन्हा जगतावर येतच नाहीं ( ‘ विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ ’ तुका.–३५८४). आत्मानंद हा एक विलक्षण आनंद आहे. त्याचें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं ( ‘ तें सुख सांगतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ॥ ’ तुका.–३६०२ ).

**ओवी १३१ — वेगळेपणें** – वेगळेपणानें. —प्राप्त पुरुष आत्मसुख कसा भोगतो हें या ओवींत सांगतात. आत्मसुख हें ज्याप्रमाणें मनुष्य साखर खातो किंवा पक्षी फळ खातो त्याप्रमाणें भोगतां येत नाहीं. विषयसुखाचा भोग घेत असतांना भोक्ता, भोग्य व भोग ही त्रिपुटी कायम राहते. आत्मसुख हें या त्रिपुटीच्या पलीकडचें असल्यामुळें तें वेगळेपणानें भोगतां येत नाहीं. ( 'त्रिपुटी-च्या योगें । कांहीं नव्हे कोणाजोगें ॥' तुका.–२५५२ ). सामान्यतः उपभोग घेण्याकरतां भोक्ता हा भोग्य वस्तूहून वेगळा असावा लागतो ( 'जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा । भोक्ता निराळा । तेणें गोडी निवडिली ॥' तुका.–९१० ). परंतु आत्मसुख भोगतांना भोक्ता हा आत्मसुखाहून वेगळा राहूंच शकत नाहीं, म्हणूनच आत्मसुखाला 'अनुच्छिष्ट' सुख म्हणतात. आत्म्यावांचून जर दुसरें कांहीं नाहींच तर त्याचा भोग वेगळेपणानें राहून कसा घेतां येईल ? तेव्हां त्याचा भोग घेणें याचा अर्थ वृत्तीनें त्याच्याशीं तद्रूप होऊन जाणें असा आहे. ( 'एवं विशेष सामान्य । दोहीं नातळे चैतन्य । ते भोगिजे अनन्य । तेणेंसी सदा ॥' अमृ.–५–५२ ; 'तिये ओळिखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे । चित्तपण समरसें । विरोनि जाय ॥' ज्ञा.–६–६७).

**ओवी १३२—अंचळु**–पडदा.—आत्मसुखाचा भोग केव्हां घडतो हें या ओवींत सांगतात. वास्तविक जीव व परमात्मा मूळचे एकच आहेत, परंतु ह्यांच्यांत वेगळेपणा अहंकाररूपी पडद्यानें आणलेला आहे. ज्या वेळेस आत्मा हा अज्ञानाला वश होतो व तो आपल्या आत्मस्वरूपाला विसरून देहाशीं तादात्म्य करतो, म्हणजे मी देह आहें, असा अहंकार घेतो त्या वेळेस तो जीवत्वदशेला येतो ( 'ऐसें शरीराचि येवढें । जैं आत्मज्ञान वेगळें पडे । तैं माझा अंशु ऐसें आवडे । वेगळेपणें ॥' ज्ञा.–१५–३४३ ; 'जया विसराच्या देशीं । प्रसिद्धि गा जीवु ऐसी । जेणें भाष केली देहेंसी । आघवाविषयीं ॥' ज्ञा.–१८–३२५ ). आतां जीवाला जर पुन्हा परमात्मा व्हावयाचें असेल तर ज्या अहंकाररूपी पडद्यानें तो वेगळा झाला आहे, तो अहंकाराचा पडदा दूर केला पाहिजे. हा पडदा दूर केला कीं तो पूर्ववत् आत्मरूप होऊन जातो ( 'तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्प लोपीं ॥' ज्ञा.–६–८२; 'तैसा देहाहंकारु नाथिला हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला । आधींचि आहे ॥' ज्ञा.–६–८४ ). हा अहंकाररूपी पडदा आत्मानात्मविवेकानें

नाहींसा होतो (' हा विचारूनि अहंकारु सांडिजे। मग असतीच वस्तु होईजे। तरी आपली स्वस्ति सहजें। आपण केली॥' ज्ञा.–६–७१). **सुखेंसि**–(आत्म) सुखाशीं. **गाढेपणें**–दृढपणानें. **आंठी**–मिठी.—देहाहंकार नाहींसा झाला कीं जीव हा आत्म्याशीं समरस होतो व आत्मा हा केवळ सुखमात्र होण्यास्तव जीवही सुखरूप होतो. (' देहाचा विसर। केला आनंदें संचार।' तुका.–१९९१).

**ओवी १३३—कवळी**—मिठी, आलिंगन.—जीवानें आपल्या संकोचितपणाचा त्याग गेला कीं तो परमात्माच आहे. येथील आलिंगन हें ज्ञानांतील आलिंगन आहे. बाकीच्या सर्व आलिंगनांत द्वैत असतें; परंतु येथील आलिंगन हें अद्वैतांतील असून तें पाण्यानें पाण्यास आलिंगन देण्याप्रमाणें आहे (' यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति।' कठ. उप. २, १, १५; ' एवं वस्तूसि जाणों जातां। जाणणेंचि वस्तु तत्त्वतां। मग जाणणें आणि जाणता कैंचा उरे॥' अमृ. ५–१८; ' क्षेम देऊं गेलें तंव मीच मी एकली॥' ज्ञा. गा. ४३८).

**ओवी १३४—सुरतीं**—मीलनात.—ह्या मीलनांत भोक्ता, भोग्य व भोग ही त्रिपुटी शिल्लक राहत नाहीं. परंतु या सर्वांना अधिष्ठान असलेली केवळ सुखमात्र अशी जी आत्मवस्तु तेवढी शिल्लक राहते (' जया परतें आणिक नाहीं। जयातें इंद्रियें नेणती कहीं। तें आपणचि आपुला ठायीं। होऊनि ठाके॥' ज्ञा.–६–३६८; निरखित निरखित पाहों गेलिये। पाहे तंव तन्मय जालिये॥' ज्ञा. गा.–३७१).

**ओवी १३५—साक्षी**–द्रष्टा.–भोक्ता, भोग्य व भोग ही त्रिपुटी नाहींशी झाल्यानंतर केवळ सुखमात्र असा जो आत्मा तो एकच एक शिल्लक राहतो. म्हणून त्या ठिकाणीं हें ऐक्य जाणणारें असें साक्षी कोणीच राहत नाहीं. ती जो अनुभवितो तो शिल्लक राहतो व तोच सुखमात्र आत्मा होय (' तैसें द्रष्टा दृश्य हें जाये। मग कोण म्हणे काय आहे। हेंचि अनुभवें तेंचि पाहे। रूप तया॥' ज्ञा.–१५–५४४). ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान; द्रष्टा, दृश्य, दर्शन; भोक्ता, भोग्य, भोग या त्रिपुटी जाऊन जें केवळ अधिष्ठानरूप उर्वरित तत्त्व उरतें तेंच तें सुखमात्र एकटें एकच आत्मतत्त्व होय (' ऐक्याचें एकपण सरे। जेथ आनंद कणुही विरे। कांहींचि नुरोनि उरे। जें कांहीं गा॥' ज्ञा.–१८–१००५).

**ओवी-१३६—न बोलणें**—न बोलण्यासारखें, अनिर्वाच्य.–आत्म्याशीं समरस झाल्यानें प्राप्त होणारें सुख वाचेनें सांगतां येणारें नाहीं. जसें ब्रह्माचें वर्णन

शब्दांनीं करतां येत नाहीं, तसेंच ब्रह्मसुखाचेंही वर्णन शब्दांनीं करतां येत नाहीं. कारण ब्रह्म व ब्रह्मसुख हीं दोन्ही एकच होत ( ' म्हणोनि तेथिंची मातु। न चढेचि बोलाचा हातु । जेणें संवादाचिया गांवाआंतु । पैठी कीजे ॥ ' ज्ञा. ६–३११ ; ' नाहीं शब्दाधीन वर्म आहे दूरी। नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो॥ ' तुका.–३७४१; ' या शब्दाचा निमाला ' अमृ. ६–१०३ ; ' वाद निमाला शब्द खुंटला ' नाथ–३७२५ ). ब्रह्मानंद ही अनुभवण्याची गोष्ट आहे. वैखरी-वाणीनें त्याचें वर्णन करतां येत नाहीं, पराही वाणी त्याचें प्रकाशन करूं शकत नाहीं ( ' परेही परते बोलणें खुंटलें । वैखरी कैसेनि सांगे । ' ज्ञा. गा.–७६४ ; ' बोलेना बोलों देईना ' ज्ञा. गा.–१९० ). आत्मा हा आपला आपल्यालाही विषय होत नाहीं ( ' सर्व सिद्धांतांचिया उजरिया । सांडोनियां निदसुरिया । आपुलिया हाता चोरिया । आपणाचि जो ' अमृ.–५–३९ ). आत्मा हा कोणत्याही प्रमाणाला विषय होत नाहीं ( ' प्रमेय परिच्छेदें । प्रमाणत्व नांदे । तें कायीं स्वतः सिद्धे । वस्तूच्या ठाईं ' अमृ.–५–१७ ). श्रीप्रभु रामचंद्रांनीं महामुनि वसिष्ठांना विचारलें कीं, ब्रह्म कसें आहे तें मला सांगा. त्या वेळीं वशिष्टमुनि गप्पच बसले; कारण ब्रह्म हें अनिर्वाच्य आहे ( ' मौन गा तुझें राशिनांव । ' ज्ञा.–१७–१५ ; ' जिहीं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तुझें । हें जाणें मी म्हणोनि लाजें। वानणां इहीं ॥ ज्ञा.–१८–१२ ). असा केवळ सुखमात्र अनिर्वाच्य जो आत्मा त्याचें ज्ञान करून देण्याचा एक प्रकार आहे व तो प्रकार म्हणजे उपाधीचें स्वरूप सांगून त्या उपाधीच्या निरासाअंतीं जें तत्त्व उरतें तें आत्मा आहे असें सांगणें ( ' जैसें न सांगणेवरी । बाळा पतीसी रूप करी । बोलु निमालेपणें विवरी । अचर्चातें ॥ पैं सांगणेयाजोगें नव्हे । तेथिंचें सांगणें ऐसें आहे । म्हणोनि उपाधि लक्ष्मीनाहें । बोलिजे आदीं ॥ ज्ञा.–१५–४६८–६९ ). **खूण**–वर्म. **स्वभावें**–सहज. **आत्माराम**–ब्रह्मनिष्ठ.–आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं रममाण झालेले जे ब्रह्मनिष्ठ पुरुष तेच या सुखाला जाणूं शकतात. ती वस्तु अनुभवण्याची असल्यामुळें इतरांना तिचें ज्ञान होणें शक्य नाहीं.

**ओवी १३७—मातले**—मस्त झाले; धुंद झाले.—यःकश्चित् सामान्य दारू मनुष्य प्याला तर त्या मदिरेचा कैफ मनुष्याला येतो, मग महत् असा जो आत्मानंद तो ज्याला प्राप्त झाला त्याच्या ठिकाणीं उन्माद यावा

यांत नवल तें काय? ('जो मोलें मदिरा खाये। तो मदिरानंदें नाचे गाये। जेणें ब्रह्मानंद सेविला आहे। तो केवीं राहे आवरला॥' ए. भा.-२-५७२ ). ह्या आनंदाचे मागें नाश नसतो ( 'अखंड न खंडे अभंग न भंगे। तुका म्हणे गंगेमिळणी सिंधु॥' तुका.-२२४३ ; 'पुढती अस्तवेना ऐसें। जया पाहलें अद्वैतदिवसें। मग आपणपांचि आपण असे। अखंडित॥' ज्ञा.-६-१०५ ). ब्रह्मसुखाच्या उत्कर्षात आत्मानुभवी पुरुष आत्मबोधाचाच उपदेश करीत हिंडतो ( 'मग तया बोधाचेनि माजें। नाचती संवादसुखाची भोजें। आतां एकमेकां घेपे दीजे। बोधचि वरी॥' ज्ञा.-१०-१२० ; 'तेव्हां तया महासुखाचेनि भरें। धांवोनि देहाचिये गांवाबाहेरें। मियां घाले तेणें उद्गारें। लागती गाजों॥; पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं। जे अक्षरा एकाची वदंती। ते मेघाचियापरी त्रिजगतीं। गर्जती सैंघ॥' ज्ञा.-१०-१२५-१२६ ; 'तुका म्हणे जनां सकळासहित। घेऊं अखंडित प्रेमसुख॥' तुका.-१८६९- 'संतांचा उदीम उपदेशाची पेठ। प्रेमसुख साटीं घेती देती॥' तुका.-२०३८; 'अनवरत आनंदे। वर्षतिये॥' ज्ञा.-१२-१; 'समाधीचें सुख सांडा ओवाळून। ऐसा या कीर्तना ब्रह्मरस॥' तुका.-२१९६ ). तो सदा ब्रह्मा; नंदांतच निमग्न राहतो ('यालागीं तो लोकबाह्यता। स्वयें नाचे ब्रह्मउन्मादता। लोक मानिती तया पिशाचता। हा बोधु पंडितां सहसा न कळे॥' ए. भा. २-५७३ ). **गुंतले**—रममाण झाले.—यांना आतां रमण्याकरितां किंवा करमणुकीकरतां दुसरीकडे जाण्याची जरूरी राहिली नाहीं ( 'जो आपुलेनि नागरपणें। इंद्रभुवनातें पाबळें म्हणे। तो केवीं रंजे पालिवणें। भिल्लांचेनि॥' ज्ञा.-२-३६३ ; 'कैसे माझ्या गुणीं धाले। देशकाळातें विसरले। कीर्तनसुखी झाले। आपणपांचि॥' ज्ञा.-९-२०९ )—**सामरस्याचे**—ब्रह्मैक्यभावाचे.—शरीराच्या दृष्टीनें त्यांच्यांत व परमात्म्यांत जरी भेद दिसत असला तरी अनुभवाच्या दृष्टीनें परमात्म्याशीं ते एकरूप झालेले असतात ( 'पैं स्वरूपसमरसें। तयाही गा जाले तैसें। तेथ किंधर्म हें कैसें। नेणें देह॥' ज्ञा.-१४-३१४; 'तैसा समरस झालों। तुजमाजीं हरपलों॥' तुका.-३४९३ ).

**ओवी १३८—अनुकार**—प्रतिमा, स्वरूप, प्रतिबिंब.—आनंद हा स्थूल दृष्टीला दिसत नाहीं, परंतु आनंद जर साक्षात् पहावयाचा असेल तर त्यांनाच पाहावें. त्यांच्यापुढें दुःख कधीं येतच नाहीं म्हणून ते मूर्तिमंत सुखाच्या

प्रतिमाच होत ( ‘ सर्वसुख त्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर डुल्लतसो ॥ ’ तुका.–३५५२ ; ‘ आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचें ॥ ’ तुका.–३६३८ ; ‘ धैर्याचे जे मंडप तेचि स्तंभ झाले । आनंदा निघाले ते कोंभ जे कां ॥ ’ ). **महाबोध**–ब्रह्मज्ञान.–प्राप्त पुरुषाखेरीज इतर सर्वांचा बोध हा अल्प असतो, कारण त्यांचा बोध अल्प जें शरीर त्याच्याशीं तादात्म्य करून राहतो. ( ‘ हा जनकु हे माता । हा मी गौर हीन पुरता । पुत्र वित्त कांता । माझें हें ना ॥ ’ ज्ञा.–१५–४९२ ; ‘ या देहातें म्हणे मी पुत्र दारा धन माझें ॥ ’ ज्ञा. गा.–१२० ). ह्याच्याउलट प्राप्त पुरुष हा आपल्याला परमात्म्याप्रमाणें व्यापक समजतो म्हणून त्याचा बोध हा ‘ महाबोध ’ होय ( ‘ हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ ’ ज्ञा.–१२–२१३ ; ‘ आणि पूर्ण अहंता वेढलों । सैंघ आम्हीच दाटलों । मा लोपलों ना प्रकटलों । कोणा होउनि ॥ ’ अमृ. १०–१५ ;–**विहार**–मंदिर—ते महाबोधाचें राहण्याचें मंदिरच होऊन बसतात. ( ‘ जे ज्ञानाचा कुरुठा । ’ ज्ञा.–४–१६६ ; ‘ आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणे अचुक । जे ज्ञानें केलें टीक । तयाचिवरी ॥ ’ ज्ञा.–१४–३०० ).

**ओवी १३९** — **विवेक**विचार, आत्मानात्मविवेक.—जगत्, जीव व परमात्मा या तिघांच्या स्वरूपाच्या विचाराचा समावेश ‘ विवेक ’ या शब्दांत येतो. या तिहींच्या विचाराच्या अंतीं मनुष्याला परमात्म्याचें ज्ञान होतें ( ‘ आहे मी हा कोण करावा विचार । ’ ज्ञा. गा–५३५ ; ‘ तैसें देहजीवाचिये मिळणीं । जो उदयजत सुये पांणी । तो विवेक अंतःकरणीं जागवीजे ॥ ’ ज्ञा.–१६–११० ; ‘ कोणी एकु सुभटा । विचाराचा आगिटां । आत्मानात्मकिटा । पुटें देऊनी ॥ ’ ; ‘ छत्तीसही वानीभेद । तोडोनिया निर्विवाद निवडिती शुद्ध । आपणपें ॥ ’ ज्ञा.–१३–१०३६–३७ ; ‘ तेणें पाडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवंचना । जयाचिया मना । गोचर जाहली ॥ ’ ज्ञा.–१३–१०३१). **गांव**–वसतिस्थान.—ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं आत्मानात्मविवेक राहतो ( ‘ संत तेथें विवेका असणें कीं जी ॥ ’ ज्ञा.–१८–१६३२ ; ‘ गुरु तेथ ज्ञान ॥ ’ ज्ञा.–१८–१६३६ ). **स्वभाव**–स्वाभाविक अवस्था, नैसर्गिक धर्म.—ब्रह्म हें जसें व्यापक व आनंदमात्र आहे तसाच ज्ञानी पुरुषाचाही अनुभव असतो ( ‘ मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सत्यसिंधु । तैसेचि ते भेदु । उरेची

ना ॥ ' ज्ञा.–१४–५३ ; ' हरी तैसे हरीचे दास । नाहीं तया भय मोह चिंत आस ॥ ' तुका.–४५११ ; ' म्हणोनि भिन्न भेद नाहीं । देवा आम्हां एकदेहीं नाहीं झालें कहीं । एका एक वेगळे ॥ ' तुका.–१७३२ ). **अलंकारलें**— सजवलेले.—ब्रह्मविद्या ही अमूर्त आहे. परंतु त्या अमूर्त ब्रह्मविद्येचें ' साकार रूप ' म्हणजेच ते प्राप्त पुरुष होत ( ' गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्या हि शांकरी । ' अमृ.१–श्लोक २ ; ' आतां उपायवनवसंतु । जो आज्ञेचा आहेव- तंतु ॥ ' अमृ.–२–१ ; ' आत्मज्ञानें चोखडीं । संत जें माझीं रुपडीं । तेथ दृष्टि पडो आवडी । कामिनी जैसी ॥ ' ज्ञा.–१८–१३५६ ; ' ते चालतें ज्ञानाचे बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ । येर माणुसपण तें भांब । लौकिक भागु ॥ ' ज्ञा.–१०–७७ ; ' कैवल्याचा पुतळा ॥ ' नाथ.–३५१९ ; ' ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले । उद्धरावया आले दीन जनां ॥ ' नामा.–१४०३ ).

**ओवी–१४०–हे बहु असो**–हा विस्तार राहूं दे.–श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्ञाने- श्वरी सांगत असतांना त्यांच्यासमोर जी श्रोते मंडळी बसलेली होती त्यांत त्यांचे गुरु श्रीनिवृत्तिनाथ होते. ते म्हणाले, " हा विषय आतां अधिक वाढवूं नकोस." श्रोत्यांना मध्यें आणून विषयांतर आवरतें घेण्याची खुबी श्रीज्ञाने- श्वरांनीं या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं उपयोगांत आणलेली आहे ( ' आतां ग्रंथा चित्त देईं । झडकरी वेगा ॥ ' ज्ञा. १–८३ ; ' हा असो अतिप्रसंगु । न संडी पां कथा लागु । होईल श्लोकसंगतिभंगु । म्हणऊनियां ॥ ' ज्ञा.–५–६६ ).

**ओवी १४१–रतासि**–तन्मय होतोस. **निराळीं**–आकाशांत, आधारावांचून. **सनागर**–सुंदर, विदग्ध, अलंकारिक.–श्रीज्ञानेश्वरांच्या ठिकाणीं विनय आहे, पण त्याबरोबरच त्यांच्या ठिकाणीं स्वकर्तबगारीची जाणीवही आहे. ते एके ठिकाणीं म्हणतात ; ' मी गीतेवर अशी टीका ( म्ह. विवरण ) करीन कीं, जी वाचीत असतां मूळ ग्रंथ ( म्ह. गीताग्रंथ ) कोणचा व त्यावरची टीका कोणची हें वाचकांना कळून येणार नाहीं ( ' मूळ ग्रंथींचिया संस्कृता– । वरि मऱ्हाटी नीट पढतां । अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हे न चोजवे ॥ ' ज्ञा.– १०–४३ ). या ओवींत श्रोत्यांच्या मुखानें ( म्हणजेच अप्रत्यक्षरीत्या ) श्री- ज्ञानेश्वरमहाराज, आपलें व्याख्यान क्वचित् प्रसंगीं जरी विषयाला सोडून होत असलें तरी तें ' अभिजात व्याख्यान ' असतें, असें सांगतात. ज्याप्रमाणें सोनें हें मूलतः चांगलेंच असतें, परंतु त्याला जर मोत्यांची जोड मिळाली तर तें

ज्याप्रमाणें अधिक उठावदार दिसतें, त्याप्रमाणें गीता हा ग्रंथ मूलतः चागलाच आहे. परंतु त्यावरील श्रीज्ञानेश्वरांच्या टीकेमुळें तो फारच रसाळ व आकर्षक असा वाटतो. गीताही ' नागर ' आहे, परंतु ज्ञानेश्वरी ही ' सनागर ' म्हणजे गीतेपेक्षांही उत्कृष्ट आहे.

**ओवी १४२—मुकुळीं**—आवरून घे. **साधुहृदयराउळीं**—संतांच्या अंतःकरणरूपी राजवाड्यांत—श्रीज्ञानेश्वरांच्या ठिकाणीं संतांबद्दल अतिशय प्रेम व आदर होता. संतांनीं आपणांवर प्रसन्न व्हावें एवढ्याकरतांच श्रीज्ञानेश्वरांनीं संतांना प्रिय असणारी अशी जी गीता तिच्यावर ' टीका ' लिहिण्यास घेतली ( ' आणि माझें तंव आघवें । ग्रथन येणेंचि भावें । जे तुम्हीं संतीं होआवें । सन्मुख सदा ॥ ' ; ' एऱ्हवीं तरी साचोकारें । तुम्ही गीतार्थाचे साइरे । जाणोनि गीता जीवसरें । धरिली मियां ॥ ' ज्ञा.–१३–३२८–२९. )

**ओवी १४४—सुखाच्या**—( आत्म ) सुखाच्या.—आत्मसुख हें मनुष्याच्या अंतःकरणांत आहे ( ' तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्वसुखाचा आरामु । कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ॥ ' ज्ञा.–९–६० ). परंतु जीवाला त्याची जाणीव नसल्यामुळें तो बहिःप्रवृत्त होतो व सुखप्राप्तीकरतां विषयाच्याकडे धांव घेतो. या पुरुषांनीं आपली वृत्ति अंतर्मुख केली व विचारानें पंचकोश व तीन देहांचा निरास करून ती आत्म्याच्या ठिकाणीं दृढ केली ( ' प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडूनि मागलीकडे । महाभूतांचिया चढे । माथयावरी ॥ ' ज्ञा.–१०–७३ ). याचा परिणाम असा झाला कीं, वृत्तीचा व आत्म्याचा सजातीय संबंध असल्यामुळें त्यांची वृत्ति आत्म्याशीं समरस झाली व त्यामुळें त्यांच्या ठिकाणचें देहतादात्म्य नष्ट झालें ( ' जे नाना गतीतें पाववितें । तें चित्त वरील आत्मयातें । मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे ॥ ' ज्ञा.–८–८३ ; ' कां लवणाची कुंजरी । सूदलिया लवणसागरीं । होयचि ना माघारी । परती जैसी ॥ ' ज्ञा.–१५–३१८ ; ' तेवीं मजसीं एकवाट । जे जाले ज्ञानें चोखट ॥ ' ज्ञा.–१५–३२० ) व ते आत्मसुखाशीं समरस झाले ( ' आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदाचि अंग आनंदाचें ॥ ' तुका.–३६३८ ).

**ओवी १४५–आत्मप्रकाशें**–आत्मज्ञानानें.–सूर्यप्रकाश व आत्मप्रकाश यांत जमीन–अस्मानाचें अंतर आहे. सूर्यप्रकाशांत जगत् व द्वैत भासतें. आत्मप्रकाशांत सर्व विश्वाभास नाहींसा होतो व सर्व ठिकाणीं ओतप्रोत आत्माच भरला

आहे असा अद्वैतानुभव येतो ('मावळवीत विश्वाभासु। नवल उदयला चंडांशु। अद्वयाब्जिनीविकाशु। वंदूं आतां॥' ज्ञा.-१६-१). आत्मा हा तेजोराशी आहे ('सुसडा सूर्यकणांच्या राशी। जो नित्य उदो ज्ञानियांसी। अस्तमानाचें जयासी। आडनांव नाहीं॥' ज्ञा.-८-९०; 'ते वस्तू कीं तेजोराशी। सर्व भूतात्मक सरिसी। चंद्रसूर्याच्या मानसीं। प्रकाशे जे॥' ज्ञा.१५-३१२). त्याचें प्रकाशन रविचंद्रादि तेजें करूं शकत नाहींत ('न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः॥' गीता-१५-६). असा हा आत्मप्रकाश प्रत्येकाच्या हृदयांत आहे. ज्याप्रमाणें सूर्याच्या आड ढग आला असतां तो दिसत नाहीं किंवा पाण्यावर गोंडाळ आलें असतां पाणी झांकलें जातें त्याप्रमाणें प्रत्येकाच्या ठिकाणीं असलेल्या स्वस्वरूपाच्या अज्ञानामुळें हा आत्मप्रकाश आवृत झालेला आहे म्हणून लोकांना त्याचें ज्ञान नाहीं ('परी उदकीं जाली बाबुळी। ते उदकातें जैसी झांकोळी। कां वायांचि आभाळीं। आकाश लोपे॥' ज्ञा.-७-६०; 'तैसी हें माझीच बिंबली। त्रिगुणात्मक साउली। कीं मजचि आड वोडवली। जवनिका जैसी॥' ज्ञा.-७-६३; 'म्हणऊनि भूतें मातें नेणती। माझीच परी मी नव्हती। जैसीं जळींचीं जळीं न विरती। मुक्ताफळें॥' ज्ञा.-७-६४). **चोख**-शुद्ध.-आत्मप्रकाश हा सदा शुद्धच आहे. परंतु ज्या बुद्धि-उपाधिरूप कांचेच्या द्वारें तो व्यक्त होतो ती बुद्धि-उपाधिरूप कांच-शुद्ध असावी लागते. ती अशुद्ध असेल तर आत्मवस्तूचे ठिकाणीं विषयांचेंच दर्शन होतें व शुद्ध असेल तर सर्व ठिकाणीं आत्मवस्तूचेंच दर्शन होतें. ज्याप्रमाणें संधिप्रकाशकाळीं रस्त्यांत वस्तुतः नीळमण्यांचा हार पडलेला असतांना, भेकड पुरुषाला तो सर्पपणानें भासतो, त्याप्रमाणें सर्व ठिकाणीं परमात्मा असतांना अज्ञानी पुरुषाला परमात्म्याचे ठिकाणीं स्वस्वरूपाच्या अज्ञानामुळें जगताचें भान होतें. परंतु ज्ञानी पुरुषाला म्हणजे ज्याची बुद्धि शुद्ध आहे त्याला सर्व ठिकाणीं शुद्ध आत्मप्रकाशच दिसतो ('पैं आघवा मीचि असे। येथ नाहीं कीर अनारिसें। परी प्राणियांचिया उल्लासे। बुद्धी ऐसा॥' ज्ञा.-१५-४१५). **आपणपेंचि**-स्वतःचाच.—प्राप्त पुरुषाची बुद्धि शुद्ध असल्यामुळें तो सर्व विश्व मीच आहे अशा व्यापक बोधावर आलेला असतो ('जगाचि देह जाहलें।' ज्ञा.-१२-१६८; 'हें विश्वचि माझें घर। ऐसी मती जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपण जाहला॥' ज्ञा.-१२-२१३;

' मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतः सिद्धु । जो आपणेनसीं भेदु । नेणोनि जाणे ॥ ' ज्ञा.–१५–५६२ ; ' तुका म्हणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥ ' तुका.–४०५७). **देहेंचि**–( देहानें ) देहामध्येंच. —प्राप्त पुरुषाचें मन परमात्म्याशीं समरस झाल्यामुळें तो जरी शरिरानें परिच्छिन्न दिसत असला तरी तो अनुभवानें परमात्म्याइतकाच व्यापक असतो म्हणून तो ब्रह्मच होय ( ' तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनाचि चैतन्य जाहलें । तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ॥ ' ज्ञा.–५–३६ ; ' हा गां जीवापैलीकडिली खुणे । जो पावोनि वावरे ही जाणे । तो देहाचेनि वेगळेपणें । काय वेगळा होय ॥ ' ज्ञा.–७–११८ ; ' तुकीं तुकला तुका । विश्वीं भरोनि उरला लोकां ॥ ' तुका.–४०६६ ; ' तो देहसंगें तरी असे । परि चैतन्यासारिखा दिसे । पाहतां परब्रह्माचेनि कसें । चोखाळु भला ॥ ' ज्ञा.–४–११५ ; ' तयाही देह एकु कीर आथी । लौकिकीं सुखदुःखी तयातें म्हणती । परी आम्हांतें ऐसीचि प्रतीती । परब्रह्माचि हा ॥ ' ज्ञा.–६–४०८ ).

**ओवी १४६—परम**–सर्वोत्तम, श्रेष्ठ ( गति ).—जीव हा पारमार्थिक अनुभवाच्या अंगानें वाढूं लागला असतां, तो वाढतां वाढतां, शेवटीं परब्रह्मरूपतेला येऊन पोहोंचतो. याच्यापलीकडे त्याचा विकास होत नाहीं ( ' सा काष्ठा सा परा गतिः ॥ ' कठ. उप.–१–३–११, ' देउळाचिया कामा कळसु । परम गंगेसी सिंधु-प्रवेशु । कां सुवर्णशुद्धी कसु सोळावा जैसा ॥ ' ज्ञा.–१८–९८१ ; ' तिये परतें कांहीं । निपजणें येथ नाहीं । म्हणोनि म्हणिपे पाहीं । परम सिद्धि ते ॥ ' ज्ञा.–१८–९८३ ; ' तें माझें निजधाम पाही । पाटाचें गा ॥ ' ज्ञा.–१५–३१६ ). **अक्षर—**अविनाशी, ब्रह्मवाचक शब्द ( अधिक माहिती १२ वा अध्याय, प्रकरण २–पान १३१ पहा). **निस्सीम—**अमर्याद.—ब्रह्म हें आकाशापेक्षांही व्यापक आहे; आकाशाच्या ठिकाणीं व्याप्यव्यापकभाव असल्यामुळें तें सापेक्षिक व्यापक आहे ; ब्रह्म हें व्याप्यव्यापकभावसंबंधशून्य असल्यामुळें तें निरपेक्षित व्यापक आहे ( ' हें गगनाचें पांघरूण । होय देखा ॥ ' ज्ञा.–८–१९० ; ' सत्यज्ञानानंत गगनाचें प्रावर्ण । नाहीं रूप वर्ण गुण जेथें ॥ ' ज्ञा. गा.–५४२ ; ' नभ तुजमाजी खेळे । लपीथपी ॥ ' ज्ञा.–१४–९). ब्रह्म हें सजातीय–विजातीय–स्वगतभेदशून्य, देशकालवस्तुपरिच्छेदशून्य असें व्यापक आहे ( ' देशकालवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥ '

तुका.-१५४९). **निष्काम**—कल्पनाशून्य पुरुष, विरक्त पुरुष. **अधिकारिये**-अधिकारी.-ब्रह्म हें बुद्धीलाही अगम्य आहे ('बुद्धि बोध्या सोके ।ते येवढी वस्तु चुके । मना संकल्पा निके । याहीहूनी ॥' अमृ.-७-११० ), परंतु त्याचा अनुभव फक्त निष्काम पुरुषांनाच येतो. पंडित, कीर्तनकार किंवा पुराणिक हे फार तर ब्रह्माची कल्पना करूं शकतील किंवा दुसऱ्याला त्याची कल्पना आणून देतील, परंतु त्याचा प्रत्यक्ष अनुभव येण्यास अंतःकरण हें वासनारहित व्हावें लागतें ('नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुता श्रुतेन ॥' कठ. उप. १-२-२२; 'ब्रह्मरस गोडी तयासी फावली । वासना निमाली सकळ ज्याची ॥' तुका.-३६८४ ). श्रीज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीच्या प्रारंभींच गीता हा ग्रंथ केवळ कल्पनेनें जाणण्याचा ग्रंथ नसून तो अनुभवण्याचा ग्रंथ आहे असें सांगितलें आहे ('जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं । सोहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ॥' ज्ञा.-१-५३ ) व सहाव्या अध्यायांत तर त्यांनीं 'मीं ही ग्रंथरूपी मेजवानी फक्त निष्काम पुरुषांकरितांच केली आहे.' असें स्पष्टपणें सांगितलें आहे ('हे असोतु या बोलाचीं ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरलीं । हीं प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी ॥' ज्ञा.-६-२२ ). ब्रह्मानुभव प्राप्त होण्याकरितां कामनाराहित्य लागतें ('यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः । अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥' कठ. उप.-२-६-१४ ). ज्याप्रमाणें वस्तूचें यथार्थ प्रतिबिंब पडण्याकरितां स्वच्छ कांच असावी लागते, त्याप्रमाणें ज्या मनाच्या द्वारां परमात्म्याचा अनुभव यावयाचा तें मन स्वच्छ असावें लागतें. लोकेषणा, वित्तेषणा व दारेषणा ह्या तीन एषणांनीं व इतर वासनांनीं मन मलिन झालेलें असतें व त्यामुळें परमात्मवस्तूचा अनुभव येत नाहीं. वास्तविक आत्मा हा सर्वांच्या हृदयांतच आहे, परंतु तो मनामध्यें असलेल्या विषयवासनांच्यामुळें अप्राप्तवत् झाला आहे ('एऱ्हवीं ज्ञान हें आपुलें । परि पर ऐसेनि जालें । जे आवडोनि घेतलें । भवस्वर्गादिक ।' ज्ञा.-१४-४२ ). या वासना ज्याच्या निःशेष गेलेल्या आहेत असे निष्काम पुरुषच ब्रह्म प्राप्त करून घेण्यास अधिकारी होत.

**ओवी १४७—महर्षीं**—महान् ऋषींमध्यें, तपस्वी पुरुषांमध्यें.—ज्यांना ज्ञानदृष्टि प्राप्त झाली व आत्मदर्शन झालें अशा तपस्वी पुरुषांना ऋषि म्हणतात. परमात्मदर्शन विशिष्ट दृष्टि प्राप्त झाल्याखेरीज होत नाहीं. अर्जुनाला जेव्हां

भगवंतांनीं दिव्य दृष्टि दिली तेव्हांच त्याला विश्वरूप पाहतां आलें ('दृश्यते त्वग्र्यया बुद्धया सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः।' कठ. उप. १, ३, १२). ज्यांच्या अंतःकरणांतून निष्कामकर्मयोगाच्या आचरणानें मलदोष, उपासनेनें विक्षेपदोष व श्रीगुरुमुखातून 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या श्रवणानें आवरणदोष हे गेलेले आहेत अशा पुरुषांनाच आत्मदर्शन करून देणारी सूक्ष्म दृष्टि प्राप्त होते ("अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्त्यणीयान्ह्यतर्क्यमनुप्रमाणात्।' कठ. उप.-१, २, ८). **विरक्तां**—विरक्तांच्या.—आत्मानुभव हा वैराग्याखेरीज प्राप्त होत नाहीं, कारण आत्मानुभव ही देण्यासारखी गोष्ट नसून ती वैराग्य व आत्मानात्मविवेक यांच्या योगानें वृत्ति अंतर्मुख करून अनुभवण्याची गोष्ट आहे ('आत्मानुभव नव्हे मिरासी। जे वाटां लाभे गोत्रजासी। हा लाहाणा विरक्तासी। जे देहलोभासी सांडिती।' हस्तामलक-३२६). वृत्तींत जोंपर्यंत प्रपंच आहे तोंपर्यंत आत्मानुभव प्राप्त होत नाहीं ('अगा पैं पंडुकुमरा। येतां स्वरूपाचिया घरा। करीतसे आड वारा। विश्वाभासु जो॥' ज्ञा.-१५-४७). वृत्तींतून प्रपंचनाहींसा होण्याकरतां देहतादात्म्य नष्ट व्हावें लागतें. तें देहतादात्म्य वैराग्य व आत्मानात्मविवेकानें नष्ट होतें ('तें हें विषयवैराग्य। जें आत्मलाभाचें भाग्य। येणें ब्रह्मानंदा योग्य। जीव होती॥' ज्ञा.-१३-५२२). आत्मानात्मविवेक प्राप्त होण्याकरतां संतांचा आश्रय करावा लागतो ('परी संतांसवें वसतां। योगज्ञानीं पैसतां। गुरुचरण उपासितां। वैराग्येंसीं॥' येणोंचि सत्कर्में। अशेषही अज्ञान विरमे। जयांचें अहं विश्रामे। आत्मरूपीं॥' ज्ञा. १५-४२२-४२३). **निःसंशयां**-संशयरहितांना, विकल्परहितांना.-ज्यांच्या अंतकरणांतून प्रमाणासंभावना, प्रमेयासंभावना व विपरीत भावना या नाहींशा झालेल्या आहेत त्यांनाच आत्मवस्तूचा लाभ होतो. वेदवाक्यें ही जीवब्रह्माचा भेद प्रतिपादन करतात कां अभेद प्रतिपादन करतात असा जो संशय त्याला प्रमाणगत संशय किंवा प्रमाणासंभावना म्हणतात. जीवब्रह्माचा भेद सत्य आहे का अभेद सत्य आहे असा जो संशय त्याला प्रमेयगत संशय किंवा प्रमेयासंभावना म्हणतात व देहादि प्रपंच सत्य आहे व जीवब्रह्माचा भेदही सत्य आहे, असा जो विपरीत भाव त्याला 'विपरीत भावना' म्हणतात.

**ओवी १४८—चित्त**-मन, अंतःकरण.—कोणत्याही कार्याला 'उपादान व निमित्त' अशीं दोन कारणें असतात. छादोग्योपानिषदांत चित्ताचें उपादान

कारण अधिष्ठान-चैतन्य व निमित्त कारणें अन्न, प्राण, वासना व कर्म अशीं चार सांगितलेलीं आहेत. या पंचकारणांपासून चित्ताची उत्पत्ति होते. मनुष्य ज्या प्रकारचा आहार सेवन करतो तसें त्याचें चित्त अथवा मन बनतें. प्राणाच्या स्पंदनाबरोबर चित्ताचा उठाव होत असतो. वासना जर नसेल तर चित्ताचा चित्तपणाच शिल्लक राहत नाहीं. कर्म म्हणजे पूर्वजन्माचे संस्कार, ते जसे असतील तदनुसार वृत्ति उद्भूत होत असतात. योगवासिष्ठामध्यें चित्ताच्या उत्पत्तीचीं कारणें, वासना व प्राणस्पंदन अशीं सांगितलेलीं आहेत. चित्त हें इंद्रियांच्याबरोबर विषयांच्याकडे जात असतें, कारण इंद्रियें हीं बहिःप्रवृत्त आहेत (' या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं । ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ॥' ज्ञा.-२-१२० ). चित्त हें, विषयांच्या चिंतनानें पुष्ट होतें म्हणजे आजिंक्य होतें. **हिरतलें**-हिरावून घेतलें, काढून घेतलें.—चित्त हिरावून घेण्याच्या पूर्वी तें विषयांत गुंतलेलें होतें. महामुनी पतंजलीनें चित्ताच्या ' क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र व निरुद्ध ' अशा पांच अवस्था सांगितलेल्या आहेत. चंचलता व इंद्रियजन्य सुखाची आवड हें ' क्षिप्त ' चित्ताचें लक्षण आहे. निद्रेची अत्यंत आवड व उद्योगाविषयीं अनावड हें ' मूढ ' चित्ताचें लक्षण आहे. वृत्ति अंतर्मुख करण्याबद्दल आवड व खटपट हें ' विक्षिप्त ' चित्ताचें लक्षण आहे. चंचलता नष्ट होऊन स्थिरता प्राप्त होणें, हें ' एकाग्र ' चित्ताचे लक्षण आहे व वृत्तिशून्य अवस्था असणें हें ' निरुद्ध ' चित्ताचें लक्षण आहे. सामान्यतः मनुष्याचें चित्त हें ' क्षिप्त ' किंवा ' मूढ ' अवस्थेंतील असतें व त्याच्या ठिकाणीं अनेक जन्मांतील भोगलेल्या विषयांचे संस्कार दृढ झालेले असतात (' अनादि संसारमाळेच्या ठायीं । नित्य विषय भोगिले पाही । ते ठसावले चित्ताच्या ठायीं । वारंवार पाही सेवितां ॥ चित्तासी विषयांची अतिप्रीती । तेणें वाढली विषयासक्ती । तें प्रवेशलें विषयांप्रती । न निघे मागुतीं सर्वथा ॥' ए. भा.-१३-३७८-७९ ). चित्ताला जोंपर्यंत विषय हे सुखरूप आहेत असें वाटत असतें तोंपर्यंत चित्त हें विषयांच्याकडे धांव घेत असतें ; परंतु विषय हे अनित्य व दुःखरूप आहेत असें सत्संगतीनें व आत्मानात्मविवेकानें ज्या चित्ताला अपरोक्षरीत्या पटतें, त्या चित्ताकडून विषयांचा त्याग आपोआप होतो (' तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे ॥'

ज्ञा.–१५–३९ ). या पुरुषाच्या ठिकाणीं विषयांच्याबद्दल दोषदर्शन झालेलें असल्यामुळें तो आपुलें चित्त विषयांतून काढून घेऊन तें अंतर्मुख करतो. **जिंतिलें**—जिंकलें.—चित्तानें चित्त, म्हणजेच मनानें मन जिंकावें लागतें. सत्संगतीनें व सद्‌विचारानें जसजसें मन सुसंस्कृत होत जातें तसतसें तें असंस्कृत मनाला आवरीत जातें. वास्तविक मनाला आवरणें फार कठीण आहे. घटकाभर मन जर विषयांपासून आवरलें तर तें पुन्हा दुप्पट उसळी घेऊन विषयांत पडतें. खुद्द अर्जुनानें भगवंताला, मनाला आवरणें फार कठीण आहे अशी कबुली दिलेली आहे ( ‘ चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ’ गीता–६–३४ ). अशा दुर्जय मनाला आवरण्याचे उपाय भगवंतांनीं ‘ अभ्यास व वैराग्य ’ असे सांगितलेले आहेत ( ‘ अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते । ’ गीता–६–३५ ). साधक हा या दोन उपायांनीं आपलें मन जिंकतो. **सुतले**–निजले. **चेतीचिना** जागेच होत नाहींत.–ज्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं प्राप्त पुरुष निजतात म्हणजे आपली वृत्ति लीन करतात तेथून ते पुन्हा जागे होत नाहींत, म्हणजे पुन्हा देहतादात्म्यावर येत नाहींत ( ‘ तैसिया योगिश्वराचिया मती । मिळणीं-सवें एकवटती । परी जे विचारूनि पुनरावृत्ति । भजतीचिना ॥ ’ ज्ञा.–२–१७६; ‘ ना तें समुद्रचि होऊन ठेले । तेविं चित्ताचें चैतन्य जाहालें । जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥ ’ ज्ञा.–८–८५; ‘ तुका म्हणे मग नये वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडेन ॥ ’ तुका.–१९५३; ‘जे साम्यसेजे डोळां लागला तया ॥ ’ ज्ञा. १३–१०७८ ‘ निदेपरौते निदेजणें । जाग्रतिं गिळोनि जागणें । केलें तैसें गुंफणें । ज्ञानदेवो म्हणे ॥ ’ चांगदेवपासष्टि–६५; ‘ सुखें मी निजलों गा । शून्य सारूनी तेथें ॥ ’ तुका.–३५१ ).

**ओवी १४९—निर्वाण**—मोक्ष.—परब्रह्मालाच मोक्ष म्हणतात ( ‘ यया ब्रह्मत्वासीचि पार्था । सायुज्य ऐसी व्यवस्था । याचि नांवें चौथा । पुरुषार्थु गा ॥ ’ ज्ञा.–१४–४०१ ). **जाण**—समज.—ब्रह्म आणि आत्मसंपन्न पुरुष यांच्यांत कांहींही भेद राहत नाहीं. अनुभवाच्या अंगानें ते परब्रह्मच होऊन राहतात ( ‘ देव ते संत देव ते संत । निमित्त त्या प्रतिमा । ’ तुका.–२७२; ‘ उघडे परब्रह्म सद्‌रूची मूर्ती । पुरविती आर्ति शिष्याची ते ॥ ’ ज्ञा. गा.–९२१ ).

**ओवी १५०—देहींचि**—देहांतच.–जीवंतपणींच जीवाला मोक्ष प्राप्त होतो

असें वेदांतशास्त्र सांगतें. वेदांतशास्त्रमतें मोक्ष हा एक स्वतंत्र लोक नसून (' नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोडें । आणुनी निराळें द्यावें हातीं ॥ ' तुका.–३९२० ); जीवानें ' मी ब्रह्म आहें ' अशा दृढ अपरोक्षानुभवावर येणें हाच मोक्ष होय. श्रीमच्छंकराचार्यांखेरीज बाकीचे श्रीरामानुजादि आचार्य हे द्वैती असल्यामुळें ते मेल्यानंतर मोक्ष प्राप्त होतो असें म्हणतात. त्यांच्या मतें मोक्ष हा एक स्वतंत्र लोक आहे व तो ' वैकुंठ ' होय. गीता ही ब्रह्मानुभवप्राप्तीलाच मोक्ष म्हणत असल्यामुळें या देहांतच प्राप्त पुरुष ब्रह्मभावास म्हणजेच मोक्षास येतात असें भगवंत सांगतात. **पुससी**—विचारतोस.—भगवंत हे मनकवडे असल्यामुळें (' ऐसी पुढील से घेतु । तो सहजें जाणे हृदयस्थु । ' ज्ञा.–१–१७९). अर्जुनाच्या मनांतील आशंका त्यांनीं जाणली व म्हणून ते आपणहून पुढच्या श्लोकांत अर्जुनाच्या आशंकेचें उत्तर देतात हा एक श्लोकसंगति सांगण्याचा प्रकार आहे. सामान्य वक्त्याला श्रोता काय विचारील हें कळतें, मग भगवंताला अर्जुनाची आशंका समजून आली यांत मुळींच आश्चर्य नाहीं. कांहीं वर्णनें अशीं असतात कीं, तीं ऐकल्याबरोबर मनुष्याची साहजिकच जिज्ञासा वाढते. तशीच स्थिति अर्जुनाची या ठिकाणीं झाली. परिच्छिन्न अशा देहांत राहून प्राप्त पुरुष व्यापक अनुभवाला येतात, ही खरोखर आश्चर्य करण्यासारखीच गोष्ट आहे. अशा प्रकारची जीवनमुक्ति, त्यांना कोणच्या मार्गानें प्राप्त झाली याबद्दल अर्जुनाच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न झाली व म्हणून तो मार्ग भगवंत पुढच्या श्लोकांत सांगत आहेत.

**ओवी १५१—आधारें**-आश्रयानें. **बाहिरें**-बाहेर.—ज्याप्रमाणें एका मापांत, एकाच वेळीं दोन वस्तु राहूं शकत नाहींत, त्याप्रमाणें एकाच मनानें संसार व परमार्थ हे दोन्ही एकाच वेळीं होऊं शकत नाहींत (' प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही । एकही निदानीं न घडे त्यासी ॥ ' तुका.–३०६३ ). ज्या चित्तानें परमात्म्याचें ध्यान करावयाचें त्या चित्तांतून प्रथमतः आत शिरलेले विषय बाहेर घालवून द्यावे लागतात. बाहेरच्या विषयांपेक्षां संस्काररूपानें आंत शिरलेले विषय अधिक बाधक असतात. बाहेरचे विषय, मनुष्य दृष्टीआड सहज करूं शकतो, पण अंतःकरणांत शिरलेला विषय बाहेर घालविणें फार कठीण पडतें (' पर्णिली कांता माहेरा जाये । चित्तीं रिघाली दूरी न राहे । यापरी विषयो पाहे । जडला ठाये चित्तासी ॥ ' ए. भा.–१३–२७७). म्हणून ईशनिर्मित

सृष्टीपेक्षां जीवनिर्मित सृष्टि अधिक बाधक असते. विषयांचा भोग घेतला असतां विषय हे संस्कार व वासनारूपानें अंतःकरणात शिल्लक राहतात. आंबा खाऊन संपला तरी त्याची गोडी व चटक शिल्लक राहते व त्यामुळें वारंवार आंब्याचें स्मरण होतें ( 'फळ, काळ, दोनी नाहीं। तरी तैंचे आंबे गोड पाही । ऐसे विषय चित्ताचे ठायीं । रिघाले कहीं न निघती ॥' ए. भा.–१३–२७६ ). स्वतःचा लहानाचा मोठा केलेला मुलगा जरी मेला तरी अंतःकरणांत शिरलेला मुलगा शिल्लक राहतो व तो पुष्कळ दिवस रडवतो. ज्याप्रमाणें पाण्यांत वाहणाऱ्या बर्फाच्या डोंगराचा थोडासा भाग पाण्याच्या वर असतो, पण बहुतेक भाग पाण्यांतच असतो, त्याप्रमाणें मनुष्याचें बाहेरचें मन हें लहान असतें, परंतु त्याचें अंतर्मन हें फारच लांबवर पसरलेलें असतें, म्हणून तें आवरणें फार कठीण जातें. हें अंतर्मन वासनात्मक असतें व त्या वासना घालवणें फार दुर्घट आहे ( 'तैसेचि विषय पाही । प्रवेशले चित्ताच्या ठायीं । वासनारूपें जडले तेही । निघों कहीं नेणती ॥' ए. भा.–१३–२७५ ). या व मागील अनेक जन्मांत जे विषय भोगलेले असतात ते अंतःकरणांत संस्कार व वासनारूपानें राहतात. ज्याप्रमाणें भाडेकरी हा वहिवाट–हक्क दाखवून घर बळकावतो व नंतर त्याला बाहेर काढण्याकरितां न्यायकचेरींत फिर्याद दाखल करून बेलिफ आणावा लागतो, त्याप्रमाणें अंतःकरणांत घर करून राहिलेल्या विषयवासना घालविण्याकरतां साधक हा निष्कामकर्म ईश्वरार्पणबुद्धीनें करतो व ईशप्रसादानें वैराग्य प्राप्त करून घेऊन त्याच्या जोरावर या विषयवासनांना अंतःकरणांतून बाहेर हाकलून देतो. ईशप्रसादानें प्राप्त झालेलें वैराग्य जोरदार व टिकाऊ असतें. अशा वैराग्यानें वासनाग्रंथि तुटते ( 'जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशें । हें सर्वही नावडे जैसें । वांत होय ॥' ज्ञा.–१८–९१९ ) व अनेक विषयांच्या ठिकाणीं फांकलेलें जें मन तें एकत्रित होतें. **एकंदरें**–एकवट, एकत्र.––ज्याप्रमाणें एका खांबावर उभारलेल्या तंबूला ताण येण्याकरता त्याच्या दोऱ्या अनेक खुंट्याना बांधलेल्या असतात, त्याप्रमाणें या मनोरूपी तंबूच्या वृत्तिरूपी दोऱ्या अनेक विषयांच्या ठिकाणीं गुंतलेल्या असतात. या सर्व वृत्ति अंतर्मुख करून मन एकाग्र करणें ही गोष्ट फार कठिण आहे. मन हें केवळ रजोगुणाचें बनलेलें असल्यामुळें तें

अतिशय चंचल आहे ( ' तेथ चांचल्य निखळ। एकलें ठेलें निढाळ। म्हणोनि रजाचें बळ। धरिलें तेणें ॥ ' ज्ञा.-१३-१०८ ; ' बहुत चंचळ चपळ। जातां येतां नलगे वेळ ॥ ' तुका.-१५३६ ). संकल्प-विकल्प करणें हेंच मनाचें स्वरूप आहे ( ' वायां मन हें नांव। एऱ्हवीं कल्पनाचि सावेव। जयाचेनि संगें जीव- । दशा वस्तु ॥ ' ज्ञा.-१३-११० ; ' संकल्पें सृष्टी घडी। सर्वोंचि विकल्पूनि मोडी। मनोरथांच्या उतरंडी। उतरी रची ॥ ' ज्ञा.-१३-११४ ; ' मजूर राऊळीचें घृत नेतां। तो तुरंगीं चढे मनोरथा। मन नाचऊं लागे उल्हासता। स्वकल्पिता कल्पना ॥ ' ए. भा.-२२-४५२ ते ४५४ ). मोठमोठ्या विद्वानांनाही मनानें जिंकलेलें आहे ( ' तुका म्हणे येणें। बहु नाडिले शाहाणे ॥ ' तुका-३११६ ; ' मनें आकळिलें सर्वांसी। परी मन नाकळे कोणासी। मनें छळिलें देवासी। तें केवीं इंद्रियासी आटोपे ॥ ' ए. भा.-२३-६६४ ते ६६८ ). खुद्द अर्जुनानेंही या मनाबद्दल भगवंताजवळ कागाळी केलेली आहे ( ' तंव अर्जुन म्हणे देवा। तुम्ही सांगा कीर आमुचिया कणवा। परी न पुरो जी स्वभावा। मनाचिया ॥ ' ज्ञा.-६-४११ ते ४१७ ). उद्धवानेंही भगवंताजवळ मन आवरण्याकरितां प्रार्थना केलेली आहे ( ' मनोनिग्रह करितां देख। मन खवळे अधिकाधिक। मनोनेमीं सज्ञान लोक। शिणले साधक साधनीं ॥ ' ए. भा.-२९-४५२ ते ४६० ). मनानें स्थिर रहावें म्हणून सर्व संतांनीं मनाला उपदेश केलेला आहे ( ' मना एक करीं। म्हणे मी जाईन पंढरी। उभा विटेवरी। तो पाहेन सांवळा ॥ ' तुका.-३४२८ ). स्वसामर्थ्यानें मन आवरलें जाणें शक्य नसल्यामुळें तुकारामबुवांनीं भगवंताजवळ मन आवरण्याबद्दल प्रार्थना केलेली आहे ( ' काय करूं आतां या मना। न संडी विषयवासना। प्रार्थितांही राहेना। आदरें पतना नेऊं पाहे ॥ ' तुका.-१५३४ ; ' पांगुळ झालों देवा नाहीं हात ना पाय। बैसलों जयावरी सैराट तें जाय ॥ ' तुका.-२४८ ; ' काय काय करितों या मना। परी नाइके नारायणा। करूं नये त्याची करी विवंचना। पतना नेऊं आदरिलें ॥ ' कान्होबा.-४५०७ ). अशा दुर्जय मनाला अभ्यासानें व वैराग्यानें आवरतां येतें. अभ्यासानें अशक्य गोष्टीही शक्य होऊं शकतात (' असाध्य तें साध्य करितां सायास। कारण अभ्यास तुका म्हणे ॥ ' तुका.-३१३६ ; ' म्हणोनि अभ्यासि कांहीं। सर्वथा दुष्कर नाहीं ॥ ' ज्ञा.-१२-११३ ). लहानपणीं लग्न झालेली मुलगी प्रथमतः सासरी जाण्यास नाखुष

असते, परंतु संवयीनें तिला जशी सासरची गोडी उत्पन्न होते, त्याप्रमाणें भगवंताकडे प्रथमतः न जाणाऱ्या मनालाही हळूहळू भगवंताची गोडी लावली असतां तें त्याच्याकडे जाऊं लागतें. ज्याप्रमाणें घोड्यांत पुष्कळ जरी खोडी असल्या तरी ज्याच्या कंठावर देवमणि असतो तें घोडें जसें ग्रहण करतात (' बहात्तरी खोडी परी देवमण कंठीं। तैसा जगजेठी म्हणे तुका॥" तुका.–१४२३) त्याप्रमाणें या मनाच्या ठिकाणीं जरी अनेक दुर्गुण असले तरी त्याच्यांत एक मोठा गुण आहे व तो म्हणजे त्याला ज्याची गोडी लावावी ती लागते. (' कां जें यया मनाचें एक निकें। जे हें देखिलें गोडीचिया ठाया सोकें। म्हणोनि अनुभव सुखाचि कवतिकें। दावीत जाइजे॥' ज्ञा.–६–४२०). साधक हा आपल्या मनाला सदभ्यासानें परमपुरुषाची मोहोर लावतो व एकदां मनाला आत्मसुखाची गोडी का लागली म्हणजे त्याला विषयाची अरुचि उत्पन्न होते (' मग जें जें कां निमिख। देखेल माझें सुख। तेतुलें अरोचक। विषयीं घेईल॥' ज्ञा.–१२–१०६) व त्याचें मन अंतर्मुख होऊन एकाग्र होतें. अशा एकाग्र झालेल्या मनांतून कल्पना निःशेष जाण्याकरतां साधक हा पुढच्या ओव्यांतून सांगितलेला योगाभ्यास करतो.

**ओवी १५२—भ्रूपल्लवा**–भ्रुकुटींची. **गांठी पडे**—गांठ पडते, एकत्र मिळतात.—ज्या ठिकाणीं इडा, पिंगळा व सुषुम्ना (अधिक माहिती १२ वा अध्याय, प्रकरण दुसरें, पान १२८ पहा) या तीन नाड्या मिळतात व जेथें दोन भ्रुकुटींचा मिलाफ होतो, अशा ठिकाणीं ते आपली दृष्टि स्थिर करतात. मनुष्य डोळे मिटून ध्यानाला बसला तरी त्याच्या डोळ्यांसमोर विषयांच्या आकृति येत असतात; ह्या आकृति भ्रुकुटींच्या मध्यमार्गी दृष्टि स्थिर केली असतां नष्ट होतात.

**ओवी १५३—सांडुनि दक्षिण वाम**—इडा व पिंगळा ह्या नाड्यांचा संबंध सोडून.—इडा नाडी ही शरिरावर होणाऱ्या स्पर्शाचें ज्ञान मेंदूस पोहचविते व पिंगळा नाडी ही मेंदूची आज्ञा सर्व अवयवास पोहोंचावितें. हठयोग्यानें भ्रुकुटींच्या मध्यभागीं दृष्टि स्थिर केली असतां इडा व पिंगळा यांच्या व्यापाराशीं, त्याच्या मनाचा संबंध सुटतो. **प्राणापानसम**—प्राणवायु अपानवायु यांची समगति करून.—या वायूंची समगति झाली असतां सुषुम्नानाडीचें खालचें द्वार उघडतें व हे दोन वायु एकत्रित होतात व असा एकत्रित

झालेला वायु नंतर सुषुम्नामार्गानें वर जाऊं लागतो. **चित्तेंसी**—चित्तासह. **व्योमगामियें**—व्योमांत जाणारें.—चित्ताला म्हणजे मनाला, ते प्राणवायूसह मूर्ध्न्याकाशाकडे नेतात ( अधिक माहिती १२ वा अध्याय, प्रकरण दुसरें, पानें–१२६–१३१ पहा ).

**ओवी १५४—रथ्योदकें**—रस्त्यावरून वाहणारीं उदकें. **एकेक**—एक एक ( रथ्योदक ).—रस्त्यावरील पाणी नदींतून वाहत जाऊन समुद्राला मिळालें असता त्याची पुन्हा वेगळीक करतां येत नाहीं ( ‘ जैसे तंवचि वहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ । मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ ’ ज्ञा.–९–४५८ ).

**ओवी १५५—वासनांतराची**–निरनिराळ्या वासनांची. **विवंचना**–निवड. **आपैसी**–सहजच. **पारुखे**–थांबते.—योग्याचें मन चिदाकाशांत जाऊन त्याच्याशीं समरस झालें असतां त्याच्या सर्व वासना व कल्पना लयास जातात. चिदाकाश हें केवळ चैतन्यरूप म्हणजे ज्ञानरूप आहे. त्या ठिकाणीं कोणच्याही कल्पनेला वाव नाहीं ( ‘ आतां दुजें हन होतें । कीं एकचि हें आइतें । ऐशिये विवंचनेपुरतें । उरेचिना ॥ ’ ज्ञा.–६–३०९ ).

**ओवी १५६—संसारचित्र**—संसाररूपी चित्र.—‘ संसार नष्ट करणें ’ याचा अर्थ जगताचा किंवा बायकापोरांचा किंवा घटादि वस्तूंचा नायनाट करणें असा नाहीं, तर ‘ देहाहंभाव ’ नाहींसा करणें असा आहे. या देहाहंभावामुळें जीवाला द्वैताची व जगताची प्रतीति येते व तो नष्ट झाला असतां ती प्रतीति नष्ट होते ( ‘ एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा । तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषम काई ॥ ’ ज्ञा.–५–९५ ; ‘ दुजें खंडे तरी । उरला तो अवघा हरी । आपणाबाहेरी । न लगे ठाव धुंडावा ॥ ’ तुका.–३७३३ ). देहाहंभावाचा नाश मनोनाशानें होतो. शास्त्रकार विश्वाभासाला व जीवत्वदशेला ‘ संसार ’ म्हणतात. ( ‘ अगा पैं पंडुकुमरा । येतां स्वरूपाचिया घरा । करीतसे आडवारा । विश्वाभासु जो ॥ ’, ‘ तो हा जगडंबरु । नोहे येथ संसारु । हा जाणें महातरु । थांवला असे ॥ ’ ज्ञा.–१५–४६–४७; ‘ अगा उपजणें निमणें । हें साचचि जें कां मानणें । तो जीवलोकु मी म्हणें । संसारु हन ॥ ’ ज्ञा.–१५–३४७ ). **उमटे**—दिसतें.—या

विश्वभासाला व जीवत्वदशेला अस्तित्व मनामुळें आहे; जसें भिंतीवरील चित्रांना अस्तित्व भिंतीमुळें असतें ( 'पडोनि गेलिया भिंती । चित्रांची केवळ होय माती । कां पाहालेया राती । आंधारें उरे ॥' ज्ञा.–१८–२६३ ). सुषुप्तीमध्यें मन अज्ञानांत लीन असतें म्हणून त्या वेळीं जगताची प्रतीति येत नाहीं. मनोरूपवृत्ति जशी असेल तसें जगताचें स्वरूप दिसतें. जागृतींत वृत्ति स्थूल शरिराशीं तादात्म्य करते त्या वेळीं जगत् स्थूल दिसतें, स्वप्नांत वृत्ति सूक्ष्म शरिराशीं तादात्म्य करते म्हणून जगत् सूक्ष्म दिसतें व सुषुप्तींत वृत्ति लीन असते म्हणून त्या ठिकाणीं जगत् भासत नाहीं. आरसारूपी उपाधि जशी असेल त्याप्रमाणें जसें मुखाचें प्रतिबिंब लांबट, उभट, पसरलेलें अथवा यथातथ्य दिसतें तसें मनोरूप वृत्ति जर वासनादिकांनीं मलिन व अज्ञानानें आवृत असेल तर अशा अन्यथा ज्ञानरूपी वृत्तीमध्यें नसलेल्या जगताची प्रतीति येते; परंतु तीच मनोरूप वृत्ति जर शुद्ध असेल तर सर्व ठिकाणीं तिला आत्मवस्तूंचेंच यथातथ्य दर्शन होतें. मनानें केलेली जी कल्पना तीच अविद्या होय ( 'अविद्या संत ना असंत । शेखीं नव्हे संत असंत । निजकल्पना उत्पात । अविद्या निश्चित ती नांव ॥'; 'भलता पुसे आविद्या कोण । अविद्या मुख्यत्वें अंतःकरण । तेथें बिंबलें जें चैतन्य । 'जीवु' अभिधान ये त्यासी ॥' हस्तामलक–१६६–१६७ ). मनानें केलेली जी कल्पना तेंच जगत् होय व मनानें 'मी देह आहें' अशी केलेली जी विपरीत भावना तीच जीवत्वदशा होय ( 'वायां मन हें नांव । एऱ्हवीं कल्पनाचि सावेव । जयाचेनि संगें जीव– । दशा वस्तु ॥' ज्ञा.–१३–११० ; 'द्वैत जेथें उठी । अविद्या जेणें लाठी ॥' ज्ञा.–१३–११३ ). तात्पर्य, अविद्येला, जीवत्वदशेला व विश्वाभासाला म्हणजेच कारण व कार्याध्यासाला अतएव संसाराला कारण निजकल्पना अथवा मन आहे. तें मन अथवा तो मनोरूपी पट नष्ट झाला असतां संसार अथवा संसाररूपी चित्र नष्ट होतें. मन हें रजाचें आहे व प्राणवायु हाही रजाचा आहे म्हणून प्राणवायूच्या मदतीनें हठयोगी मनाला मूर्ध्न्याकाशांत नेतात व तेथें त्याचा लय करतात.

**ओवी १५७—मुद्दल**–मुख्यतः, मुळांतच.—मन हें संकल्परूप आहे व अहंकाराचें अस्तित्व संकल्पावर आहे. संकल्पाच्या वृद्धींत अहंकाराची वृद्धि होत असते व संकल्पनाशांत अहंकाराचा नाश होतो. उदाहरणार्थ, लहान मुलाच्या

ठिकाणीं संकल्प कमी असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं अहंकारही कमी असतो. मनोनाशाबरोबर संकल्पांचा नाश होतो व संकल्पनाशाबरोबर अहंकाराचाही नाश होतो ( ' उचलयेया प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं । तैसा मनोबुद्धिपाशीं । अहंकारु ये ॥ ' ज्ञा.–१२–१०१ ). अहंकारनाशात् जीवाला ब्रह्मरूपता प्राप्त होते ( ' तैसा देहाहंकारु नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला । आधींचि आहे ॥ '; ज्ञा.–६–८४ '; ' जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्प लोपीं ॥ ' ज्ञा.–६–८२ ; ' देह नव्हे मी हें सरे । उरला उरे विठ्ठल ॥ ' तुका.–३७३८ ). **अनुभवी**–ब्रह्मानुभवी.—जो पुरुष केवळ ब्रह्मज्ञान सांगतो किंवा ऐकतो त्याला ब्रह्मानुभव प्राप्त होत नाहीं, तर ज्याचा मनोनाश म्हणजे वासनानाश झालेला आहे त्यालाच ब्रह्मानुभव प्राप्त होतो ( ' ब्रह्मरसगोडी तयासी फावली । वासना निमाली सकळ ज्याची ॥ ' तुका.–३६८४ ).*

**ओवी १५८—हन**–पादपूर्णार्थक अव्यय. **येणें मार्गें**–या मार्गानें.—चिदाकाशांत मनाचा लय करून ( ' जे वेळीं गगनीं लयो मना । पवनें कीजे ॥ ' ज्ञा.–५–१५५ ) ब्रह्मत्वास प्राप्त झाले.

**ओवी १५९—यम**–अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह असे पांच ' यम ' आहेत. **नियम**–शौच, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान असे पांच ' नियम ' आहेत. ( अधिक माहिती १२ वा अध्याय, प्रकरण २ रें, पान १२६ पहा ). **डोंगर**–पर्वत.—यम व नियम साध्य होण्याकरतां फार कष्ट करावे लागतात. एक यम साधावयास निदान बारा वर्षें तरी लागतात असें विवेकानंदांनीं म्हटलें आहे. महामुनि पतंजलीनें आपल्या योगसूत्रांत यमनियमांचीं फलें सांगितलेलीं आहेत. हीं फलें ज्याला प्राप्त झालीं त्याच्याकडूनच यमनियमांचा अभ्यास यथासांग झाला असें म्हणतां येईल. ( अधिक माहिती १२ वा अध्याय, प्रकरण २ रें, पान १२६ पहा ). **अभ्यास**–कोणतीहि गोष्ट पुनः पुनः करणें याला ' अभ्यास ' म्हणतात. महामुनि पंतजलीनें अभ्यासाची व्याख्या ' तत्रस्थितौ यत्नोऽभ्यासः ' अशी दिली आहे. ' वृत्तीचा पूर्ण निरोध होण्याकरतां अविश्रांत यत्न करणें ' याला ' अभ्यास ' म्हणतात. वृत्तीचा पूर्ण निरोध होण्याकरतां इंद्रियांचा व मनाचा निरोध करावा लागतो. इंद्रियनिग्रहास ' दम ' म्हणतात ( ' आणि बाह्येंद्रियांचें धेंडें । पिटूनि विधिचेनि दंडें । नेदिजे

अधर्मोकडे । कहींचि जावों ॥' ज्ञा. १८-८३५ ). मनोनिग्रहास शम म्हणतात ( ' तरी सर्वेंद्रियाचिया वृत्ती । घेऊनि आपल्या हातीं । बुद्धि आत्मया मिळे कांतीं । प्रिया जैसी ॥'; ' ऐसा बुद्धीचा उपरमु । तया नाम म्हणिजे शमु ॥' ज्ञा.-१८-८३३-८३४ ). शमदमांचा अथवा यमनियमांचा अभ्यास करतांना हठयोगीसुद्धां डबघाईस येतात, म्हणून या ठिकाणीं ' अभ्यासाला ' सागराची उपमा दिलेली आहे ( ' जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी । जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ॥'; ' तेही किजती कासाविसी ॥' ज्ञा.-२-३११-१२. ' मग प्रत्याहाराचा अधाडा । जो बुद्धीचिया पाया निसरडा । जेथ हटिये सांडिती होडा । कडेलग ॥' ज्ञा.-६-५६ ). **पार**-पलीकडच्या ठिकाणाला, ब्रह्मत्वाला.

**ओवी १६०—निर्लेप**-शुद्ध, पवित्र.—त्यांनीं आपली मन व बुद्धि शुद्ध केलेली असतात. हीं दोन्हीही शुद्ध झाल्याखेरीज प्रपंचाचें यथातथ्य स्वरूप अथवा माप कळत नाहीं. नुसत्या बुद्धिवानाला जगताचें खरें मूल्य कळणार नाहीं, कारण मन हें बुद्धीवर आवरण घालीत असतें ( ' बुद्धीचें द्वार । झांकविलें जेणें ॥' ज्ञा.-१३-११५ ). एवढ्याकरतां मन हेंही शुद्ध असावें लागतें. ज्या बुद्धींतून रजतमादि दोष गेलेले आहेत व जिला वासनारहित अशा शुद्ध मनाचें साहाय्य मिळालेलें आहे, अशा बुद्धीकडून प्रपंचाचें योग्य मापन केलें जातें. **माप घेतलें**-मोजदाद केली. किंमत जोखली.—इंद्रियांच्या द्वारें जें जगताचें दर्शन होतें त्याला सत्यदर्शन असें म्हणतां येत नाहीं. इंद्रियें हीं नेहमीं जगत् असत्य असतांना, तें सत्यच दाखवितात. परंतु या योगी पुरुषांना आत्मानात्मविवेकरूपी दृष्टि प्राप्त झाली असल्यामुळें त्यांना जगताचें खरें स्वरूप कळतें ( ' येणें बोधें जो योगी होये । तयासी या बोधाचेंचि नीटपण आहे । कां जे भोगातें पेलूनी पाहें । निजरूपा ये ॥' ज्ञा.-८-२५९ ). ते जगताला असार व अनित्य असें लेखितात. योगी अथवा संत हे राजहंसाप्रमाणें असतात. ते आत्मानात्मविवेकरूपी चोंचीनें सार व असाराची निवड करून सार असें जें आत्मरूपी दूध त्याचें ग्रहण करतात व असार जें जगत् त्याचा त्याग करतात ( ' आणि अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर । चरताती जे सुविचार । राजहंस ॥' ज्ञा.-१५-२९६ ; ' या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ॥'; ' सलिलीं पय जैसें ।

एक होऊनि मीनलें असे । परी निवडूनि राजहंसें । वेगळें कीजे ॥' ज्ञा.–२–१२६–१२७ ). विचारानें ज्याचें मिथ्यत्व अनुभवास येतें, तो प्रपंच होय व विचारच जेथें मुरतो, तो परमात्मा होय. अस्ति, भाति, प्रिय, नाम व रूप असे प्रपंचाचे पाच अंश आहेत. यांतील पहिले तीन अंश हे परमात्म्याचे असून, ते सारभूत आहेत म्हणून योगी त्यांचें ग्रहण करतात व शेवटचे दोन अंश हे असार म्हणजे अनित्य असल्यामुळें त्यांचा त्याग करतात. तात्पर्य, असारभूत जो प्रपंच, त्याचा त्याग करून या प्रपंचाला अधिष्ठान असलेलें सारभूत जें आत्मतत्त्व, त्याचेंच ग्रहण योगी पुरुष करतात ( ' फलकट तो संसार येथें सार भगवंत ॥ ' तुका.–२२३८; ' सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला । कां गा हा दाविला जगदाकार ॥ ' तुका.–१३४८; ' सत्य साच खरें । नाम विठोबाचें बरें ॥ ' तुका.–२२८१ ). **साचाचेंचि**–सत्याचेंच म्हणजे ब्रह्माचेंच.–जगत् हें विचारानें मिथ्या ठरल्यानंतर ज्ञानी पुरुषाकडून त्याचा साहजिकच त्याग होतो ( ' तैसें विचारितां निरसलें । तें प्रपंचु सहजें सांडवलें । मग तत्त्वता तत्त्व उरलें । ज्ञानियांसी ॥ ' ज्ञा.–२–१३१ ); व नंतर उर्वरित अशी जी आत्मवस्तु तिच्याशीं ते समरस होतात. याचा परिणाम असा होतो कीं, त्यांना आपणासकट सर्व ठिकाणीं वस्तूचेंच दर्शन होतें ( ' आतां हें सोंवळें जालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडियेलें ॥ ब्रह्मपुरी वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ ' तुका.–४०६२; ' नाहीं त्या विटाळ अखंड सोंवळीं । उपाधी वेगळीं जाणिवेच्या ॥ ' तुका.–३६८४; ' तरी आतां देह असो अथवा जावो । आम्ही तो केवळ वस्तूचि आहों । कां जे दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनी ॥ ' ज्ञा.–८–२४८ ).

**ओवी १६१—योगयुक्तीचा**–( हठ ) योगमार्गाचा. **उद्देशु**—अभिप्राय, स्वरूप. **सुदेशु**—मर्मज्ञ, ज्ञाता.—अर्जुन हा मोठा बुद्धिमान् होता ( ' मग म्हणे गा प्रज्ञाकांता । उजवली आजि वक्तृत्वता । जे बोला येवढा श्रोता । जोडलासि ॥ ' ज्ञा.–१४–६३; ' शब्दतत्त्वसारज्ञा ' । ज्ञा.–१३–११२८; ' श्रीकृष्णोक्तिसागरा । हा अगस्तीचि दुसरा ॥ ' ज्ञा.–१५–७० ). **चमत्कारला**–आश्चर्यचकित झाला. विस्मित झाला.—कारण, अर्जुनानें हा योगमार्ग प्रथमच ऐकला होता. शिवाय या देहांत ब्रह्मरूपता प्राप्त करून देणारा, इतक्या थोडक्या अवधीचा व स्वावलंबी मार्ग ऐकून त्याला कौतुक वाटलें. [ या

ओवीपासून पुढच्या ओव्या ह्यापुढील ६ व्या अध्यायाच्या उपक्रमादाखल आहेत ].

**ओवी १६२—जाणितलें**-जाणलें.-ज्याप्रमाणें पोराची कूस भरून आली किंवा नाहीं हें आईला समजतें, त्याप्रमाणें चांगल्या गुरूस शिष्याच्या नुसत्या चेहऱ्यावरून आपण सांगितलेला विषय त्यास कितपत समजला आहे हें कळतें ('देखा बालकाचिया धणी धाईजे। कां शिष्याचेनि जाहलेपणें होईजे। हें सद्‌गुरुचि एकलेनि जाणिजे। कां प्रसवतिया ॥' ज्ञा.-८-५५). **उवाइलें**-प्रसन्न झालें.

**ओवी १६३—पराचित्त लक्षणांचा रावो**-दुसऱ्याच्या हृद्गतांची (तोंडावर उमटलेली) बाह्य चिन्हें जाणण्यांत अग्रगण्य.—भगवंत हे सर्वांच्या हृदयांत साक्षीरूपानें राहत असल्यामुळें त्यांना सर्वांचें अंतर कळतें. भगवान् हे मोठे मनकवडे आहेत ('न सांगतां तुम्हां कळों येतें अंतर। विश्वीं विश्वंभर परिहाराचि न लगे ॥' तुका-३८४९; 'जाणे जीवींचें सकळ नारायण। असे व्यापूनी तो न दिसे लपून ॥' तुका.-१२१; 'तो सहजें जाणें हृदयस्थु ॥' ज्ञा.-१-१७९). **भावो**—अभिप्राय. पुढच्या अध्यायांत अर्जुनानें प्रश्न न विचारतां, भगवंत आपणहून बोलण्यास सुरवात करतात, म्हणून पुढील अध्यायाची संगति लावण्याकरतां श्रीज्ञानेश्वरांनीं हा सर्व प्रस्ताव योजलेला आहे. हें एक ग्रंथकाराचें कौशल्य आहे.

**ओवी १६५—अनुसारा**—मार्ग. **पव्हण्याहूनि**—पोहण्यापेक्षां. **पायउतारा**—एका तीरावरून दुसऱ्या तीरावर पाण्यांतून पायीं जाण्याचा सोपा मार्ग.—पाण्यातून पोहून जाण्यापेक्षां पायउतारानें जाणें जसें सोपें तसाच हठयोग हा सांख्यमार्गापेक्षां सोपा मार्ग दिसतो.

**ओवी १६६—सांख्याहूनि**-ज्ञानमार्गाहून. **प्रांजळा**-सोपा.—सांख्य मार्गांत तैलबुद्धि लागते, पण हठयोगांत केवळ शारीरिक कष्ट करावे लागतात. सांख्यमार्गांतील अजातवाद ('न त्वेवाहं जातुनाऽऽसं न त्वं नेमे जनाधिपाः। न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥' गीता-२-१२).. बुद्धीला पटणें फार कठिण आहे ('क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति ॥' कठ. उप.-१-३-१४). खुद्द चांगदेवांना हठयोग प्राप्त झाला, पण

ज्ञानप्राप्ति चौदाशें वर्षानंतर झाली ('जया ज्ञानालागीं। गगन गिळितातीं योगी। स्वर्गाची आढवंगी। उमरडोनि ॥' ज्ञा.–१३–१६२). अर्जुनानें या अध्यायाच्या आरंभीं भगवंतास कर्मसंन्यास व कर्मयोग या दोन मार्गांपैकीं सुलभ मार्ग कोणाचा असें विचारलें होतें. भगवंतांनीं कर्ममार्ग हा नावेप्रमाणें सोपा आहे असें सांगितलें ('तरी जाणां नेणां सकळां। हा कर्मयोग कीर प्रांजळा। जैसी नाव स्त्रियां बाळां। तोयतरणीं ॥' ज्ञा.–५–१६). परंतु नाव-सुद्धां एखादे वेळीं पाण्यांत बुडण्याचा संभव असतो. परंतु पायउतारांत कोणीही बुडत नाहीं. अर्जुनाला हठयोग हा कर्मयोगापेक्षांही पायउताराप्रमाणें अधिक सोपा मार्ग वाटला. **अभोळां**–दुर्बळांना.—आम्ही 'दुर्बळ' आहोंत म्हणजे इंद्रियांचे पंगिस्त आहोंत. ('आम्ही देवा शक्तिहीनें। भाकूं तेणें करुणा ॥' तुका.–१५७१. 'इंद्रियांचीं दीनें। आम्ही केलों नारायणें ॥' तुका.–१४६३). **काळा आहे**–विलंब आहे–या मार्गानें साध्य प्राप्त करून घेण्यास कांहीं कालावधि अधिक लागेल ही गोष्ट खरी आहे, परंतु तें चालेल. 'मी उतावीळ नाहीं' असें अर्जुन म्हणतो.

**ओवी १६७—पडताळा**–अनुवाद. **विस्तरेल**–विस्तार होईल. **साद्यंतु**–समग्र, संपूर्ण, सांगोपांग.—हठयोग हा मार्ग आरंभापासून शेवटपर्यंत म्हणजे यमनियमांपासून तो समाधीपर्यंत मला सांगावा.

**ओवी १६८—निका**—चांगला. **ऐकीजो**—ऐकला जावा. **सुखें**—आनंदानें. **बोलों**—( आम्ही ) सांगूं.—आम्हांला सांगण्याची तर आवड आहे, परंतु परमार्थाबद्दल विचारणारा आम्हास कोणी भेटत नाहीं ('पैं अर्जुना आम्हांहि वाडेकोडें। अखंड बोलों आवडे। परी काय कीजे न जोडे। पुसतें ऐसें ॥' ज्ञा.–१५–४४८).

**ओवी १६९ —परिससी**–ऐकतोस.–तुझ्या ठिकाणीं ऐकण्याबद्दल औत्सुक्य व आवड आहे. आवड नसतांना सांगिलेल्याचा कांहींही उपयोग होत नाहीं ('बलात्कारें जरि आणिला कथेसी। निद्रा घे लोडेंसीं टेंकूनिया ॥' तुका.–२१९९). **अनुष्ठिसि**–आचरतोस.–परमार्थ ऐकणारे पुष्कळ लोक असतात, परंतु त्याप्रमाणें आचरण करणारे फार थोडे असतात ('तरी परियेसीं गा प्राज्ञा। तूं आस्थेचीच संज्ञा। बोलिलिये गोष्टीची अवज्ञा। नेणसी

करूं ॥' ज्ञा.–९–३६ ). ऐकण्यापेक्षां आचरणाला खरें महत्त्व आहे ('तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥' तुका.–२०७० ; 'ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य । करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥' ज्ञा.–१२–२३० ). वैद्यानें चिकित्सा करून सांगितलेलें औषध जो घेईल त्याला ज्याप्रमाणें गुण येतो, त्याप्रमाणें श्रवण केल्यानंतर जो तसें वागेल त्याचेंच खरें कल्याण होतें. **वानी**–उणीव, कमतरता.–योग्य श्रोता मिळाल्यानंतर सांगितलेल्याचें चीज होत असतें; म्हणून असा शिष्य लाभला असतां गुरुही त्याला यथोचित उपदेश करतात ('म्हणोनि सरो कां सेवतयाची चाड । जरी अनन्य मिळे ॥' ज्ञा.–९–३८ ). अर्जुन हा खरा श्रवणेच्छु असल्यामुळें भगवंतांनीं त्याला सांगण्याकरता आढेवेढे घेतले नाहींत ('आणि श्रवणेच्छेचा पुढां । दारवंटा सदा उघडा ॥' ज्ञा.–१८–१५०८ ).

**ओवी १७०—मिष**–निमित्त. **पढियंतयाचे**–आवडत्याचें.—अर्जुनानें प्रश्न न विचारतां भगवंत आपणहून अर्जुनास कां सांगतात याचें कारण श्रीज्ञानेश्वरमहाराज या ओवींत सांगतात. असें सांगण्याचें कारण भगवंताचें अर्जुनावर फार प्रेम होतें. आईचें प्रेम हें आपल्या बालकावर निष्काम व निर्निमित्त असतें ('मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ॥' तुका.–२००६ ; 'ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभावीण प्रीती ॥' तुका.–२०१४ ). तिचें मूल जरी आंधळें, पांगळें अथवा मुकें असलें तरीही तिला तें आवडतें ('आंधळे पांगुळे मुके अनर्गळ । परी जीवापरिस बाळ पढियंते माते ॥' नामा.–६५५ ; 'देवा पांगुळ एकादें विइजे । तरी जन्मौनि ज़ोजारु साहिजे । हें बोलों काय तुझें । तुजचि पुढां ॥' ज्ञा.–४–३४ ). परंतु त्यांतल्या त्यांत तें मूल जर बाळसेंदार, गुणी व शेंडेफळ असलें तर त्यावर आईचें इतकें अद्‌भुत प्रेम असतें कीं, त्याचें शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं ('हे असो वयसेचिये शेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी । मग ते मोहाची त्रिपुटी । नाचों लागे ॥' ज्ञा.–६–१२१ ). त्याप्रमाणें भगवंत आधींच कारुणिक ('देवा तूं कृपाकरुणासिंधु ॥' तुका.–४२८ ; 'देवा तूं आमुचा कृपाळ । भक्तप्रतिपाळ दीनवत्सल । माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥' तुका.–४२७ ; 'तुका म्हणे कृपानिधि । आम्हां उतरो नावेमधीं ॥' तुका.–१२७७ ; 'तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळु स्वभाव ॥' तुका.–२९२१ ;

'म्हणोनि औदार्या तुझेया। मज निमित्त ना म्हणावया। प्राप्ति असे दानीं शाया। कृपानिधी ॥' ज्ञा.–१८–१३७८). त्यांतल्या त्यांत पांडवावर भगवंताचें अधिक प्रेम ('आमुतें कीर प्रसवली। तुझीच कृपा ॥' ज्ञा.–४–३३) व त्यांपैकीं अर्जुन तर भगवंताचा लंगोटीयार स्नेही, मग भगवंताचें अर्जुनावर अद्भुत प्रेम असावें यांत नवल तें काय? ('हो कां आत्मनिवेदनातळींची। जें पीठिका होय सख्याची। पार्थु अधिष्ठात्री तेथिंची। मातृका गा॥' ज्ञा.–६–१२७; 'देखा नवल तया प्रभूचें। अद्भुत प्रेम भक्तांचें। जे सारथ्यपण पार्थाचें। करितु असे। ॥' ज्ञा.–१–१४२; 'या जगदीश्वराचें प्रेम। एथ दिसतसे निरुपम। कैसें पार्थें येणें सर्वोत्तम। पुण्य केलें ॥'; हो का जयाचिया प्रीती। अमूर्त हा आला व्यक्ती ॥' ज्ञा.–४–११–१२; 'सख्यत्व स्वजाती सोयरा श्रीपती। सर्वभावें प्रीती अर्जुनासी ॥' नाथ ३२८८; 'सख्यत्वें पर पार पावला अर्जुन। त्यासी न पुसत दे ब्रह्मज्ञान ॥' नाथ.–३२८९; 'परि पांचाही आंतु अर्जुना। श्रीकृष्ण सावियाचि जाहला अधीना। कामुक कां जैसा अंगना। आपैता कीजे ॥' ज्ञा.–११–१६९).

**ओवी १७३—फांकु**—विस्तार, विषयांतर. **रूपा**—आकाराला, स्फुटतेला, व्यक्ततेला.–प्रेम ही चीजच अशी आहे कीं, त्याची स्पष्टता शब्दांनीं करतां येत नाहीं. ('प्रेम नये सांगतां बोलता दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे ॥' तुका.–३२५५). प्रेम हें अनिर्वचनीय आहे. मुक्यानें गोड पदार्थांचा आस्वाद घेतला असतां तो त्याला जसा बोलून दाखवितां येत नाहीं तसाच हा प्रेमाचा प्रकार आहे ('अनिर्वचनीयम् प्रेमस्वरूपम्। मुकास्वादनवत् ॥' नारदभक्तिसूत्र–५१–५२).

**ओवी १७४—विसुरा**-आश्चर्य. **आकळावा**—जाणावा.—जसें आकाशाला कवळावयाचें असल्यास त्याच्याहून मोठें असावें लागतें ('आयका आकाश गिंवसावें। तरी आणीक त्याहूनि थोर होआवें ॥' ज्ञा.–१–६९), तसेंच ईश्वराला आकलन करण्याकरतां त्याच्याहून मोठें व्हावयास पाहिजे; परंतु हें संभवनीय नाहीं. कारण ईश्वराहून वेगळें राहून त्याचें आकलन होत नाहीं. **मान**—परिमिति, मर्यादा, विस्तार. **नेणे**—जाणत नाहीं.—परमात्मा हा आपला आपल्यालाही विषय होत नाहीं ('जो आपणाशीं नव्हे विखो। तो कोणा लाहे देखों। जे वाणी न सके चाखों। आपणापें ॥' अमृ०–७–११३;

' कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे । हा दृष्टिबंधु निफजे । परी नवल लाघव तुझें । जें आपणपें चोरे ॥ ' ज्ञा.–१४–५ ; ' सर्व सिद्धांतांचिया उजरिया । सांडोनियां निदसुरिया । आपुलिया हाता चोरिया । आपणचि जो ॥ ' अमृ.–५–३९ ). परमात्मा हा जरी आपण आपल्याला किंवा दुसऱ्याला विषय होत नसला तरी यावरून तो जड आहे असें मात्र नव्हे ( ' जी आपणपयातें तूंचि जाणसी । आणिकातें सांगावयाही तूं समर्थ होसी ॥ ' ज्ञा.–१०–१८० ).

**ओवी १७५—ध्वनीआंतु**–अभिप्रायासंबंधानें, भावार्थावरून. **बलत्कारें**–जबरदस्तीनें, आग्रहानें.–ज्याअर्थी अर्जुनानें प्रश्न न विचारतां भगवंत आपणहून अर्जुनाला ' अरे बाबा, ऐक ' असें आग्रहानें म्हणतात त्याअर्थी भगवंत अर्जुनावर मोहित झाले असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें.

**ओवी १७८—भेदें**-प्रकारानें. **बोधे**–उमजेल.—ज्याप्रमाणें लहान मुलाला जेऊं घालतांना एकच घास चार ठिकाणीं करावा लागतो, त्याप्रमाणें आत्मज्ञान अर्जुनाच्या गळीं उतरविण्याकरतां भगवंतांनीं तेंच ज्ञान अनेक प्रकारांनीं गीतेंत सांगितलें आहे ( ' एऱ्हवीं अवघेंचि आत्मा । हें सांगों जरी वीरोत्तमा । तरी तुझिया मनोधर्मा । गिळेल ना ॥ ' ; ' म्हणोनि एकचि संचलें । चतुर्धा आम्हीं केलें । जें अदळपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ॥ ' ज्ञा.–१३–९४८–४९ ). **कां**–पादपूर्णार्थक अव्यय. **विनोदें**–कौतुकानें, आनंदानें, सहज समजेल अशा रीतीनें.

**ओवी १७९— अवधारीं**—ऐक.—भगवंतांनीं अर्जुनाला अनेक ठिकाणीं ' तूं चित्त देऊन ऐक ' असें सांगितलें आहे ( ' तो म्हणे पार्था दत्तचित्तु । होईं आतां ॥ ' ज्ञा.–६–३८ ; ' परि तुला येतुलें करावें । मागेन तें आम्हां देआवें । जे कानचि नांव ठेवावें । आपण पैं गा ॥ ' ज्ञा.–१३–९५४ ; ' कानचि करी हो सर्वांगा । हियें आथिलिया ॥ ' ज्ञा.–१५–६७ ). श्रवण हें लय, विक्षेप, कषाय व रसास्वाद हे चार दोष टाकून केलें असतां परिणामकारक होतें ( ' श्रवणीं ध्यानीं अंतराय । लय विक्षेप कषाय । कां सरस्वादुहीं होय । हे चारी अपाय चुकवावे ॥ ' ए. भा.–११–७०५ ).

**ओवी १८०—संगु**-ऐक्य, सख्य, मैत्री. **न सांडोनि**–न टाकतां.—भगवंत अर्जुनाला योग सांगणार व तद्वारां त्याचें आपणाशीं ऐक्य करून

घेणार; यावरून पूर्वीं त्यांच्यामध्यें वियोग असला पाहिजे असें कोणाला वाटेल. म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज या ओवींत असें सांगतात कीं, भगवंत अर्जुनाशीं असलेल्या त्यांच्या सख्यांत (म्हणजे अद्वैतांत) बिघाड येऊं न देतां अर्जुनाला योग सांगतील. अर्जुन हा भगवंताची विभूति असल्यामुळें त्याच्या ऐक्यांत कधीं बिघाड येतच नाहीं ('वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ॥' गीता-१०-३७).

**॥ इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पञ्चमोऽध्यायः ॥५॥**

**॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥**

---

॥ ॐ ॥

# प्रकरण दुसरें

## वेदान्त–परिशिष्ट

[ १ 'संन्यास' व 'कर्मयोग'. २ संन्यासाश्रम. ३ मल, विक्षेप, आवरण. ४ साधनचतुष्टय–विवेक, वैराग्य, शमदमादिषट्संपत्, मुमुक्षत्व. ५ श्रवण, मनन, निदिध्यासन. ६ असंभावना व विपरीत भावना. ]

[ टीप १— पांचव्या अध्यायावरील निरूपण समजण्यास जेवढी वेदांताची प्रक्रिया माहीत असणें आवश्यक आहे तेवढीच या परिशिष्टांत दिलेली आहे. ]

**'संन्यास' व 'कर्मयोग'** (श्लोक १ व २)—गीतेंत 'संन्यास' हा शब्द 'संन्यासाश्रम' अथवा 'चतुर्थाश्रम' या अर्थी योजलेला नसून त्याचा अर्थ 'कर्मत्याग' असा आहे. ज्या संन्यासाश्रमांत गृहस्थाश्रमांतील कर्मांचीं साधनें स्त्री, धन, पुत्रादिक यांचा विधिपूर्वक त्याग करून आत्मज्ञानाच्या तीव्र इच्छेनें गृहादिकांचाही त्याग केला जातो व भगवीं वस्त्रें, दंड, कौपीन इत्यादि उपकरणें अथवा चिन्हें घारण केलीं जातात, त्या आश्रमसंन्यासाचा विचार गीतेंत आलेला नाहीं. तसेंच 'कर्मगोग' याचा अर्थ नुसतें 'कर्मानुष्ठान' असा विवक्षित नसून त्याचा अर्थ 'कर्माचें निष्काम अनुष्ठान (म्ह. कर्तृत्वाभिमान व फलासक्ति टाकून ईश्वरार्पणबुद्धीनें कर्माचें अनुष्ठान) असा आहे. भगवंतांनीं अर्जुनास ज्या कर्माचें अनुष्ठान निष्कामबुद्धीनें करावयास सांगितलें, तें कर्म कोणतें हेंही विदित होणें अवश्य आहे. कर्मांचे १ स्वाभाविक कर्म, २ व्यावाहारिक कर्म व ३ शास्त्रीय वर्णाश्रम कर्म अथवा विहित कर्म असे तीन भेद आहेत. जांभई, शिंक, ढेकर इत्यादि शरिराचे ठिंकाणीं होणारे सहज व्यापार व निद्रा, खाणेंपिणें, इत्यादि शरीर–निर्वाहार्थ होणारीं साधारण कर्में हीं स्वाभाविक कर्में होत. शेती, व्यापार, नोकरी, इत्यादि कर्में हीं व्यावहारिक कर्में होत व ऐहिक व पारलौकिक उत्कर्षाकरतां वेदबोधित जीं कर्में

तीं विहित कर्में होत. या तीन कर्मांपैकीं गीता ही वेदविहित कर्में ऐहिक व पारलौकिक उत्कर्षाकरतां न करतां तीं केवळ चित्तशुद्धीकरतां निष्काम व ईश्वरार्पणबुद्धीनें करावींत असें सांगतें. तसेंच कर्मसंन्यास अथवा कर्मत्याग याचा अर्थ विहितकर्मांचा संन्यास अथवा त्याग असा आहे. विहित कर्मांचा त्याग प्रायः खालील कारणामुळें होतो :—( १ ) आळसानें अथवा मोहानें ( २ ) कर्म दुःखकर आहे, असें समजून शरिराला क्लेश होतील, या भीतीनें ( ३ ) मनांत कर्तव्य अथवा संकल्प स्फुरत असतांनाही ' कर्म टाकणें म्हणजेच नैष्कर्म्य होणें ' अशा अज्ञ समजुतीनें ( ४ ) आत्मज्ञानप्राप्तीच्या तीव्र इच्छेनें व ( ५ ) ब्रह्मसाक्षात्कारानंतर कर्मांची जन्मभूमि जी अविद्या तिच्या नाशानें (म्ह. ज्ञानोत्तर ब्रह्मानुभवी पुरुषाच्या देहादिसंघाताकडून सर्व कर्में होत असतांनाही, ' मी कर्मांचा कर्ताच नव्हे ' या त्याच्या प्रतीतीमुळें, त्या सर्व कर्मांची गणना नैष्कर्म्यांतच होते. यालाच ज्ञानप्रधानात्मक सर्व कर्मांचा संन्यास म्हणतात ). यांतील पहिले तीन त्याग हे अनुक्रमें तामसिक, राजसिक व मिथ्याचारात्मक होत व म्हणून हे तिन्ही त्याग गीतेला मान्य नाहींत. चौथा व पांचवा त्याग म्हणजेच संन्यासाश्रमांतील विविदिषासंन्यास व विद्वत्संन्यास होत. प्रस्तुत अध्यायांतील दुसऱ्या श्लोकांत भगवंत ' संन्यास व कर्मयोग ' हे दोन्ही निःश्रेयसकर म्हणजे मोक्षाला देणारे आहेत असें सांगतात (' संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ । ') व ३ ऱ्या श्लोकांत, जो कशाचाही द्वेष करीत नाहीं आणि कशाचीही इच्छा करीत नाहीं तो पुरुष कर्में करूनही नित्य संन्यासी समजावा (' ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति । ') असें सांगतात. यांतील ' संन्यास ' व ' नित्य संन्यासी ' हे शब्द साधनरूप विविदिषासंन्यास व विद्वत्संन्यासी या अर्थानें विवक्षित आहेत ही गोष्ट **विविदिषा संन्यास** व **विद्वत्संन्यास** यांचें स्वरूप समजल्यानें स्पष्ट होणारी आहे. म्हणून या ठिकाणीं संन्यासश्रमाची माहिती थोडक्यांत दिली आहे.

**संन्यासाश्रम** ( आश्रमसंन्यास )—संन्यासाश्रम अथवा चतुर्थाश्रम याचा प्रारंभ उपनिषत्कालापासून असून याचा विकास धर्मसूत्रकालात व तदनंतरच्या स्मृतिकालांत पूर्णतः झालेला दिसतो; म्हणून हा आश्रम स्मार्तच आहे असें नव्हे तर तो श्रौतही आहे. ' संन्यासाचें ' लक्षण ' विहितानां कर्मणां विधिना परित्यागः संन्यासः ' म्हणजे ' विहित कर्मांचा विधिपूर्वक त्याग तो संन्यास

होय ' असें केलेलें आहे. कोणतेंही लक्षण अव्याप्ति, अतिव्याप्ति व असंभव या तीन दोषांनीं रहित असावें लागतें. ' विहित कर्मांचा त्याग तोच संन्यास ' एवढेंच जर संन्यासाचें लक्षण केलें तर त्या लक्षणावर अतिव्याप्ति हा दोष येतो; कारण आळसानें अथवा अन्य कारणानें विहित कर्म न करणारे असे जे लोक, त्या असंन्यासी पुरुषांवर हें लक्षण जातें. म्हणून ' विधिना ' हें पद संन्यासाचे लक्षणांत घातलेलें आहे व तें मुख्य आहे. तैत्तिरीय उपनिषदांत ' कर्म, प्रजा, धन यांपैकीं कोणत्याही साधनानें मोक्ष मिळत नाहीं, केवळ संन्यासानेंच मोक्ष मिळतो असें म्हटलेलें आहे :-( ' न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः । ). संन्यासास मुख्य कारण वैराग्य आहे. ज्या दिवशीं खरें वैराग्य उत्पन्न होईल त्याच दिवशीं संन्यास करावा अशी श्रुति आहे ( ' यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत् ॥ ' ). संन्यासाचे प्रकार पुष्कळ आहेत व प्रत्येकाच्या आचारांतही भेद आहेत. संन्यासाश्रमाचे नियम व संन्याशाचा आचार या विषयांचा विचार परमहंस, जाबाल, इत्यादि उपनिषदांतून व मनु, याज्ञवल्क्य, पराशर, इत्यादि स्मृतींतून सांगितला आहे. **कुटीचक, बहूदक, हंस व परमहंस** हे संन्यासाचे मुख्य चार प्रकार आहेत व हे प्रकार वैराग्याच्या कमीअधिक प्रमाणानुसार केलेले आहेत. वैराग्याचे मंद, तीव्र व तीव्रतर असे तीन प्रकार सांगितलेले आहेत. संकट अथवा दुःख कोसळलें असतां जें तात्पुरतें वैराग्य उत्पन्न होतें त्यास मंद-वैराग्य म्हणतात. उदाहरणार्थ, प्रसूतिवैराग्य, स्मशानवैराग्य, इत्यादि. यावज्जीव मला स्त्रीपुत्रादि कोणी नकोत अशा ऐहिक भोगाविषयींच्या निरिच्छतेस ' तीव्र वैराग्य ' म्हणतात व ' ऐहिक व पारलौकिक ' भोगांविषयींच्या निरिच्छतेस ' तीव्रतर वैराग्य ' म्हणतात. मंद वैराग्यवान् पुरुषास कोणत्याही संन्यासाचा अधिकार नाहीं. तीव्र वैराग्यवान् पुरुषास कुटीचक किंवा बहूदक संन्यास ग्रहण करण्याचा अधिकार प्राप्त होतो. तीर्थयात्रादि करण्यास शरीर असमर्थ असल्यास त्यानें **कुटीचक** संन्यास ग्रहण करावा व शरीर समर्थ असल्यास त्यानें **बहूदक** संन्यास ग्रहण करावा. कुटीचक संन्यासी पुरुष पुत्रादिकांनीं बांधून दिलेल्या पर्णकुटींत राहतो, त्यांच्याच घरीं भिक्षा मागून अन्न सेवन करतो व तीन दंड, शिखा, यज्ञोपवीत, कमंडलु, भगवीं वस्त्रें, इत्यादि चिन्हें धारण करतो

व गायत्रीमंत्राच्या जपांत व ध्यानांत काळ घालवितो. बहूदक संन्यासी त्रिदंड शिखा, यज्ञोपवीत, कमंडलु, काषाय वस्त्रें, इत्यादि चिन्हें धारण करतो, पुत्रादिकांस सोडून सदा यात्रा करीत राहतो व सात घरीं भिक्षा मागून ब्रह्मचिंतनांत काळ घालवितो. तीव्रतर वैराग्यवान् पुरुष हा **हंस** किंवा **परमहंस** संन्यासाचा अधिकारी होय. सर्व संगाचा विधिपूर्वक परित्याग करून यज्ञोपवीत, कमंडलु, काषायवस्त्रें, इत्यादि आश्रमचिन्हें धारण करून नित्य त्रिकाळ स्नान करून व मोक्षपरायण होऊन वृक्षाखालीं अथवा गुहेंत राहणें हा हंस संन्यासाचा आचार आहे. हंसास ब्रह्मलोक हें फल मिळतें व त्या ठिकाणीं त्याला ब्रह्मज्ञान होतें. **परमहंस संन्यासाचें** विविदिषा अथवा जिज्ञासु व विद्वत् अथवा ज्ञानवान् असे दोन प्रकार आहेत. वेदनाच्या ( आत्मज्ञानाच्या ) इच्छेस विविदिषा म्हणतात व विविदिषेमुळें घेतलेला जो संन्यास त्याला विविदिषा संन्यास म्हणतात. विविदिषा संन्यासाचे काम्यकर्मसंन्यासरूप विविदिषा संन्यास व आश्रमरूप विविदिषा संन्यास असे दोन भेद आहेत. गृहस्थाश्रमांतच राहून काम्य कर्मांचा सर्वथैव त्याग करणें, विहित कर्मे फलेच्छा टाकून करीत राहणें व त्याबरोबरच श्रवणादिकांचा अभ्यास सतत करीत राहणें हा काम्यकर्मसंन्यासरूप विविदिषा संन्यास होय. प्रैषमंत्राचा उच्चार करून गृह, धन, स्त्री, पुत्र, शिखा, यज्ञोपवीत, इत्यादिकांचा त्याग करून, लंगोटी, आच्छादनास वस्त्र, दंड, कमंडलु, इत्यादि वस्तूंचा स्वीकार करून व केवळ तीन किंवा सात घरीं भिक्षा मागून राहणें व आश्रमाचें इतर नियम पाळणें हा आश्रमरूप विविदिषा संन्यास होय. या आश्रमरूप विविदिषा संन्यासाला दंडग्रहण व नित्य वेदांतश्रवण आवश्यक आहे. काम्यकर्मसंन्यासरूप विविदिषा संन्यासाचा अधिकार ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्यांस व स्त्रियानाही आहे व हा संन्यास घेतल्याचीं उदाहरणें जनक, याज्ञवल्क्य, कहोल, मैत्रेयी व गार्गी, इत्यादि होत. आश्रमरूप विविदिषा संन्यासाचा अधिकार फक्त ब्राह्मणासच आहे असें कांहीं आचार्यांचें मत आहे. हा आश्रमरूप विविदिषा संन्यास तीव्र वैराग्यप्राप्तीनंतर कोणत्याही आश्रमांतून म्हणजे ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य किंवा वानप्रस्थ या आश्रमांतून स्वीकारतां येतो. ब्रह्मसाक्षात्कारानंतर जीवन्मुक्तिसौख्याच्या उपभोगाकरतां जो सर्वकर्मपरित्यागरूप संन्यास घेतला जातो तो **विद्वत्संन्यास** होय. विद्वत्परमहंससंन्यासी पुरुषाला दंड, भगवीं वस्त्रें, इत्यादि चिन्हांची

गरज नाहीं. विद्वत्संन्यासांत क्षत्रियवैश्यासही अधिकार आहे. विविदिषा संन्यास हा साधनरूप संन्यास आहे व विद्वत्संन्यास हा फलरूप संन्यास आहे. आत्मज्ञानी पुरुषास 'मी सच्चिदानंदरूप ब्रह्म आहे' अशा दृढ अपरोक्षज्ञानानें प्राप्त होणारी जी आत्मस्वरूपस्थिति अथवा ब्राह्मी स्थिति तिलाच जीवन्मुक्ति म्हणतात व विद्वत्संन्यास म्हणजे तीच स्थिति होय. या ब्राह्मी स्थितीस पोहोंचलेल्या पुरुषाचें वर्णन जीवन्मुक्त, संन्यासी, सांख्य, ज्ञानी, योगी, विद्वत्संन्यासी, स्थितप्रज्ञ, स्थितधी, भगवद्भक्त, गुणातीत, इत्यादि नांवांनीं केलेलें आहे व म्हणून हे सर्व शब्द एकच अवस्था म्हणजे मुक्त पुरुषाची सहजस्थिति अथवा आत्मस्थिति दर्शवितात. तात्पर्य, 'संन्यासमार्ग' याचा अर्थ 'साधनरूप विविदिषा संन्यास' होय व 'द्वंद्वरहित [illegible]नुगामी पुरुष' तोच 'नित्यसंन्यासी अथवा विद्वत्संन्यासी' होय. संन्यासाश्रम हा त्याज्य आश्रम नसून तो सर्व आश्रमांतील उत्तम आश्रम आहे. कारण तो समदर्शन अथवा विश्वबंधुत्व प्राप्त झाल्याचें एक चिन्ह आहे. हा आश्रम घेण्याकरतां तीव्रतर अथवा जिज्ञासा वैराग्य प्राप्त व्हावें लागतें व असें वैराग्य प्राप्त होणें हें महद्भाग्याचें लक्षण आहे. अनेक जन्मांतून विहित कर्म निष्काम व ईश्वरार्पणबुद्धीनें केल्याशिवाय जिज्ञासा वैराग्य प्राप्त होत नाहीं. ज्याला ईशप्रसादानें जिज्ञासा वैराग्य प्राप्त झालेलें आहे तोच संन्यासाश्रमाचा खरा अधिकारी होय व असे पुरुष अत्यंत विरळे होत. लोकांच्या मनांत स्वधर्माविषयीं आदर उत्पन्न करणें, शास्त्रपरंपरा राखणें, ब्रह्मनिष्ठेचें व्रत योग्य रीतीनें चालविणें व लोकांना आत्मसुखप्राप्तीचा मार्ग दाखवून देणें हें संन्यासाश्रमाचें कर्तव्य आहे व आसन ( म्ह. एके ठिकाणीं अधिक काल राहणें ), पात्रलोभ, संचय, शिष्यसंपादन, व्यर्थ भाषण, इत्यादि गोष्टी संन्यासाश्रमास वर्ज्य आहेत. विद्वत्संन्यासी पुरुषाचे ठिकाणीं एवढें सामर्थ्य असतें कीं, तो ज्याच्यावर कृपा करील त्याला आत्मानंद प्राप्त होतो. अतएव संन्यासाश्रम हा अत्यंत स्वार्थनिरपेक्ष व लोकांवर मोठा उपकार करणारा आश्रम असल्यामुळें तो सर्वथैव वंदनीय असा आश्रम आहे. अशा सर्वोत्कृष्ट संन्यासाश्रमास मलिनता प्राप्त होण्याचें कारण, संन्यासाश्रमी पुरुषास भिक्षा मागण्याचा अधिकार असतो व त्याचा लोक सत्कार करतात, हें पाहून पुष्कळ अनधिकारी लोक संन्यास घेऊं लागले व मनसोक्त वागूं लागले व त्यामुळें संन्यासाश्रम हा एक चेष्टेचा विषय होऊन बसला.

वरील विवेचनावरून वाचकाच्या सहज लक्षांत येईल कीं, अर्जुन हा संन्यासाचा अधिकारी नसून तो कर्मयोगाचा अधिकारी होता. कारण तो तीव्र वैराग्य प्राप्त होऊन तत्त्वज्ञानाच्या विविदिषेनें रणांगणावर आला नव्हता तर तो कर्मप्रवृत्त होऊन लढण्याकरतां रणांगणावर आला होता.

**ओवी ३४—मन धुतलें**—चित्त ( अंतःकरण ) शुद्ध केलें. **मल, विक्षेप व आवरण** ( निरूपण ओ. १६ पहा )—हे तीन दोष अंतःकरणाचे ठिकाणीं असतात. या तीन दोषांची निवृत्ति झाल्याखेरीज जीवाला 'मी ब्रह्म आहें' असा दृढ अपरोक्ष अनुभव येत नाहीं. **मल**—'मल' या शब्दाचा अर्थ 'पाप' असा आहे. पापात्मक अथवा निषिद्ध कर्म करण्याच्या वासनेवरून अंतःकरणांतील मलदोषाचा निश्चय होतो. तसेंच राग, द्वेष, असूया, मात्सर्य, इत्यादि विकार हेही मलदोषाचेच द्योतक होत. निषिद्ध कर्मांचा सर्वथैव त्याग करून शुभकर्म म्हणजे विहित कर्म अनेक जन्मांतून निष्काम व ईश्वरार्पण बुद्धीनें केलें असतां चित्तशुद्धि व वैराग्याची प्राप्ति होते व तद्द्वारा मलदोषाची निवृत्ति होते.

पापवासना ह्या जशा मलिन म्हणून सर्वथैव त्याज्य होत त्याचप्रमाणें लोकांत माननीय म्हणून गणलेल्या 'लोकवासना, देहवासना व शास्त्रवासना' यांचाही मुमुक्षूनें त्याग करावा. या तिन्ही वासना आत्मज्ञानप्रतिबंधक असल्यामुळें मलिनच होत. 'मी सर्व लोकांना संतुष्ट करीन, माझी कोणीही निंदा करणार नाहीं असेंच मी आचरण करीन' असा अभिमान बाळगणें यास 'लोकवासना' म्हणतात. खुद्द सर्वगुणसंपन्न रामकृष्णादि देवांची निंदा करणारे लोक जगतांत आहेत, तेव्हां या वृथा लोकवासनेच्या नादीं न लागतां मुमुक्षूनें ज्यांच्यांत आपलें हित आहे असें योग्य आचरण लोकांच्या निंदेची अथवा स्तुतीची पर्वा न करतां अखंड करीत राहावें. 'देहामध्यें सौंदर्यादि गुण आणण्याची तीव्र इच्छा धरणें अथवा औषधादि उपायांच्या योगानें शरिरांतील रोगांची अत्यंतिक निवृत्ति करण्याची हाव धरणें' यास 'देहवासना' म्हणतात. 'जन्मभर लोकमान संपादन करण्याकरतां वेद व शास्त्रें यांचाच अभ्यास करीत राहणें, परंतु शास्त्रांतील प्रतिपाद्य व सारभूत जो परमात्मा तत्प्राप्त्यर्थ ध्यानयोगादि अभ्यास न करणें' यास 'शास्त्रवासना' म्हणतात. या तिन्हीही वासना दुःसंपाद्य आहेत. यांचा नाश सत्संगतीनें व

विवेकानें होतो. या वासना निवृत्त झाल्याखेरीज जीवाला आत्मज्ञान होतं नाहीं. **विक्षेप**—' विक्षेप ' या शब्दाचा अर्थ ' चंचलता ' असा आहे. अंतःकरणाच्या चंचलतेस ' विक्षेप ' म्हणतात. विक्षेपदोष उपासनेनें नाहींसा होतो. उपासना हें मानसिक कर्म असल्यामुळें उपासनेचा अंतर्भाव कर्मामध्यें केला जातो. आत्मज्ञानास आवश्यक असणारी अंतःकरणाची एकाग्रता उपासनेनें प्राप्त होते. उपनिषदांमध्यें उपासनेचे अनेक प्रकार अधिकारपरत्वें सांगितलेले आहेत. श्रीमद्भगवद्गीता हा उपनिषत्साररूप ग्रंथ असल्यामुळें भगवंतांनीं गीतेंतही अक्षरोपासनेचे प्रकार सांगितलेले आहेत. विहित कर्म करून तें ईश्वरार्पण करणें, नानाप्रकारचे यज्ञ निष्कामबुद्धीनें करणें, सर्व कर्मे ब्रह्मार्पण करणें, ध्यानयोगाचें अवलंबन करणें, भगवद्भक्ति करणें, आत्मज्ञाननिष्ठ होणें, ओंकाराचा जप करणें व त्याचें चिंतन करणें, इत्यादि हे सर्व उपासनेचेच प्रकार आहेत. या सर्व उपासनेच्या प्रकारांमध्यें ध्यानयोगाचें महत्त्व अधिक आहे. परंतु ध्यान-योगाचा अधिकारी हा अंतर्बाह्य परिग्रहरहित असावा लागतो. हठ-योगांत यम, नियम, आसन, प्राणायाम व प्रत्याहार यापुढची भूमिका ' ध्यान ' ही सांगितली आहे. तात्पर्य, ध्यानयोग अथवा अव्यक्तोपासना ही सामान्य जीवांना दुःसाध्य असल्यामुळें भगवंतांनीं गीतेंतील १२ व्या अध्यायांत व इतर अध्यायांतूनही व्यक्तोपासना सांगितली आहे. सगुण परमात्म्याची उपासना केली असतां चित्तस्थैर्य प्राप्त होऊन निर्गुण ब्रह्माचीही प्राप्ति होते. ( ' तूं मन हें मीचि करीं। माझिया भजनीं प्रेम धरीं। सर्वत्र नमस्कारीं। मज एकातें॥ ' ' माझेनि अनुसंधानें देख। संकल्पु जाळणें निःशेख। मद्याजी चोख। याचि नांव॥ ' ' ऐसा मियां आथिला होसी। तेथ माझियाचि स्वरूपा पावसी। हें अंतःकरणींचें तुजपासीं। बोलिजत असे॥ ' ज्ञा.–९–५१७ ते ५१९ ). सगुण ब्रह्माची उपासना चित्ताच्या ऐकाग्र्याचें व निर्गुण ब्रह्मप्राप्तीचें साधन आहे असाच सर्व संतांचाही अनुभव आहे ( ' नाम घेतां मन निवे॥ ' तुका.–१६३७ ' अवघ्या दशा येणें साधती। मुख्य उपासना सगुणभक्ति॥ ' तुका.–४४६ ' सप्रेमसद्भावें संपूर्ण। नित्य करितां नामस्मरण। वृत्ती पालटती आपण। तेंही लक्षण ऐक राया॥ ' ए. भा.–२–७६९ ते ७७३; ' निर्गुणीं पावले सगुणीं भजता। विकल्प धरितां जिव्हा झडे॥ ' नाथ.–११३२). अतएव निर्गुण व सगुण परमात्म्याच्या उपासनेनें अंतःकरणांतील विक्षेपदोषाची

निवृत्ति होते. **आवरण**—'आवरण' या शब्दाचा अर्थ 'आच्छादन' असा आहे. आवरण हा एक अज्ञानाचा अंश अथवा ही एक अज्ञानाची शक्ति आहे. आवरणाच्या योगानें जीव हा आपल्या मूळच्या कूटस्थरूप आत्मस्वरूपाला विसरतो व नंतर देहाशीं तादात्म्य करून 'देह मी व देहसंबंधी माझे' असें समजूं लागतो. देहादि अनात्म पदार्थांचे ठिकाणीं 'मी व माझें' अशी बुद्धि होणें, यावरून अंतःकरणाचे ठिकाणीं असलेल्या आवरणदोषाचा निश्चय होतो. या आवरणदोषाची निवृत्ति श्रीगुरुमुखानें 'तत्त्वमसि' या महावाक्याचें श्रवण केल्यानंतर 'मी ब्रह्म आहें' असें जें साक्षात्काररूप ज्ञान उत्पन्न होतें, त्या ज्ञानानें होते.

**ओवी ७१—आत्मयोगें आथिला**—आत्मज्ञानानें संपन्न झाला. आत्मज्ञान प्राप्त होण्याकरतां साधक हा 'साधनचतुष्टयसंपन्न' असावा लागतो. **साधनचतुष्टयसंपन्न**—( निरूपण ओ. ७१ पहा )—विवेक, वैराग्य, शमदमादिषट्संपत् व मुमुक्षुत्व या चार आत्मज्ञानप्राप्तीच्या साधनास 'साधनचतुष्टय' असें म्हणतात. या चार साधनांनीं युक्त जो पुरुष तो 'साधनचतुष्टयसंपन्न पुरुष' होय. तोच आत्मज्ञानाचा अधिकारी आहे. **विवेक**—एक ब्रह्म-आत्मा मात्र नित्य आहे व तद्व्यतिरिक्त सर्व मायादि प्रपंच-जगत् अनित्य आहे ( 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्येवेंरूपो विनिश्चयः। सोयं नित्यानित्यवस्तुविवेकः समुदाहृतः ॥' ) अशा प्रकारचा ठाम निश्चय श्रुति, स्मृति व युक्ति यावरून करणें यास 'विवेक' म्हणतात. हा आत्मा शाश्वत आहे—'शाश्वतोऽयं पुराणो'—अशी श्रुति आहे, हा आत्मा अव्यय आहे—'अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः'—अशी स्मृति आहे, 'जें जें कार्य असतें तें तें अनित्य असतें' अशी युक्ति आहे व आत्मा हा कोणत्याही कारणाचें कार्य नसल्यामुळें तो नित्य आहे. तात्पर्य, श्रुति, स्मृति व युक्तीनेंही आत्मा नित्य आहे असेंच ठरतें. अशा विवेकास 'नित्यानित्यवस्तुविवेक' अथवा 'आत्मानात्मविवेक' म्हणतात. विवेकाच्या ब्रह्मविचार, तत्त्वविचार व आत्मविचार ह्या तीन कक्षा आहेत ( 'को नाम बंधः कथमेष आगतः कथं प्रतिष्ठास्य कथं विमोक्षः। कोऽसावनात्मा परमः क आत्मा तयोर्विवेकः कथमेतदुच्यताम् ॥' शंकराचार्य ). विवेक हा सत्संगतीनें प्राप्त होतो. **वैराग्य**—ऐहिक व पारलौकिक भोग नाशवंत आहेत असें जाणून त्यांच्याविषयीं

निरिच्छ होणें याला ‘ वैराग्य ’ म्हणतात. वैराग्यांत अपरवैराग्य व परवैराग्य असे दोन भेद आहेत. त्यांतील अपरवैराग्याचे यतमान, व्यतिरेक, एकेंद्रिय व वशीकार असे चार पोटभेद आहेत. ( १ ) या अखिल प्रपंचामध्यें सार काय व असार काय याचा विचार करणें व असार वस्तूंच्या त्यागाबद्दल प्रयत्न करणें यास ‘ यतमान ’ वैराग्य म्हणतात. ( २ ) अंतःकरणांत असणारे जे काम-क्रोधादिक विकार, त्यांपैकीं किती विकार नष्ट झाले आहेत व अजून किती नष्ट व्हावयाचे राहिले आहेत याबद्दल वारंवार अंतर्परीक्षण करून त्या त्या अवशिष्ट विकारांच्या निवृत्तीकरतां प्रयत्न करणें यास ‘ व्यतिरेक ’ वैराग्य म्हणतात. ( ३ ) अंतःकरणांत विषयवासना असतांही इंद्रियांचा विरोध करण्याकरितां जो प्रयत्न केला जातो त्यास ‘ एकेंद्रिय ’ वैराग्य म्हणतात. ( ४ ) दृष्ट ( म्ह० ऐहिक ) आनुश्राविक ( म्ह० पारलौकिक ) विषयाविषयीं अंतःकरणांत इच्छा नसणें, यास ‘ वशीकार ’ वैराग्य म्हणतात. ( दृष्टाऽऽनुश्राविकविषय-वितृष्णस्य वशीकारारसंज्ञा वैराग्यम् ॥ ’-पातंजल योगसूत्र). परमार्थांत यतमान, व्यतिरेक व एकेंद्रिय या वैराग्यांचा फारसा उपयोग होत नाहीं. कारण या वैराग्यांची गणना मंद वैराग्यांत होते. परमार्थांत तीव्र वैराग्य लागत असतें व तें वैराग्य म्हणजे ‘ वशीकार ’ वैराग्य अथवा ‘ जिज्ञासा ’ वैराग्य होय. श्री-ज्ञानेश्वरांनीं या तीव्र वैराग्याची व्याख्या ‘ इहलोकींचे किंवा स्वर्गांतील भोग हे आपल्या इच्छेचे दास झाले असतांही ते भोगावे असें न वाटणें ’ किंवा, ‘ स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तीन्ही लोकांतील भोग हे वमनाप्रमाणें त्याज्य वाटणें, ’ अशी केली आहे ( ‘ तैसे ऐहिकींचे कां स्वर्गींचे । भोग पाइक जालिया इच्छेचे । परी भोगावे हें न रुचे । मनामाजी ॥ ’ ज्ञा.-१६-१६६ ; ‘ उठलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्गु ऐसा सांडणें । जैसें वमुनिया सुणें । आतांचि गेलें ॥ ’ ज्ञा.-१५-२५६ ). पर वैराग्य हें अपर वैराग्याची परिपक्व अवस्था होय. हें पर वैराग्य ब्रह्मसाक्षात्कारानंतर प्राप्त होतें. वशीकार वैराग्य प्राप्त झालेल्या पुरुषाच्या ठिकाणीं ब्रह्मलोकापर्यंतच्या सर्व भोगांविषयीं जरी विरक्ति असली तरी त्याला विषय हे विषयरूपानें प्रतीत होत असतात. परंतु पर वैराग्यामध्यें ब्रह्मानुभवी पुरुषाला विषय हे विषयरूपानें प्रतीत न होतांना सर्व ठिकाणीं त्याला आत्मवस्तूचेंच दर्शन होतें— ( ‘ तरी विषयांतुही कांहीं । आपणपें वाचुनि नाहीं । मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ॥ ’

ज्ञा.–२–३३५; 'पाहे तिकडे बापमाय। विठ्ठल आहे रखुमाई॥' तुका–.३५५३.) महामुनि पतंजलीनें पर वैराग्याची व्याख्या 'प्रत्यक्–आत्म्याच्या ज्ञानानें गुणपरिणामरूप सर्व विषयांविषयीं कंटाळा येणें' अशी केली आहे ('तत्परं पुरुषख्यातेर्गुणवैतृष्ण्यम्).

**शमादिषट्संपत्**—शम, दम, श्रद्धा, उपरति, तितिक्षा व समाधान या सहा साधनांस शमादिषट्क म्हणतात. यांची जी संपत् (म्ह. प्राप्ति अथवा संपादन) यास 'शमादिषट्संपत्' म्हणतात. **शम**–मनाच्या निग्रहास म्हणजे मनाला कामादि विकारांपासून आवरून त्यास विषयांचें चिंतन करूं न देणें यास शम म्हणतात. **दम**—बाह्य इंद्रियांस शब्दादि विषयांपासून आवरणें यास दम म्हणतात. **श्रद्धा**–सद्गुरु व वेदांत यांच्या वचनावर आत्यंतिक विश्वास ठेवणें यास श्रद्धा म्हणतात ('शास्त्रस्य गुरुवाक्यस्य सत्यबुद्ध्यावधारणं। साश्रद्धा कथिता सद्भिर्यया वस्तूपलभ्यते॥' अथवा 'निगमाचार्यवाक्येषु भक्तिः श्रद्धेति विश्रुता॥). **उपरति**–चित्तशुद्धीनंतर आत्मज्ञानाच्या तीव्र इच्छेनें यज्ञादि कर्मे व तत्साधनें स्त्री–धन–पुत्रादिक या सर्वांच्या विधिपूर्वक त्यागास उपरम—उपरति म्हणतात. **तितिक्षा**—प्रारब्धबलेंकरून प्राप्त होणारीं सुखदुःख, मानापमान, शीतोष्ण, इत्यादि द्वंद्वें शांतपणें सहन करणें, याला 'तितिक्षा' म्हणतात. **समाधान**—चित्ताच्या एकाग्रतेस म्हणजे ब्रह्माच्या ठिकाणीं चित्ताच्या निरंतर स्थापनेस समाधान म्हणतात ('नियतं स्थापनं बुद्धेः शुद्धे ब्रह्मणि सर्वदा। तत्समाधानमित्युक्तं न तु चित्तस्य लालनम्॥'). **मुमुक्षत्व**—मोक्षप्राप्तीच्या तीव्र इच्छेस मुमुक्षत्व म्हणतात. **मोक्ष**–सर्व दुःखाची आत्यंतिक निवृत्ति व परमानंदाची प्राप्ति हें मोक्षाचें स्वरूप आहे. असा मोक्ष जीव ज्या वेळेस अनुभवानें ब्रह्म होतो म्हणजे 'मी सच्चिदानंदरूप ब्रह्म आहें' अशा दृढ अपरोक्ष अनुभवावर येतो, त्या वेळेस त्याला प्राप्त होतो; म्हणून 'जीवानें ब्रह्मरूप होणें' यालाच मोक्ष म्हणतात. **श्रवण, मनन, निदिध्यासन** (निरूपण ओ. ३४ पहा)—हीं आत्मज्ञानप्राप्तीचीं अंतरंगसाधनें आहेत. आत्मज्ञानप्राप्तीचे जे उपाय अथवा साधनें आहेत त्यांचे बहिरंगसाधनें व अंतरंगसाधनें असे दोन भेद आहेत. ज्या साधनांच्या योगानें अंतःकरणशुद्धि प्राप्त होते त्या साधनांना बहिरंगसाधनें म्हणतात. यांत यज्ञादि कर्में, तप व दान इत्यादिकांचा समावेश होतो. जीं साधनें साक्षात् आत्मज्ञानो-

त्पत्तीस हेतु असतात त्यांना अंतरंगसाधनें म्हणतात. **श्रवण**—उपक्रमोपसंहारादि षड्लिंगावरून सर्व वेदांतवाक्यांचें तात्पर्य अद्वैत ब्रह्मामध्यें आहे, अशा बुद्धीच्या निश्चयास 'श्रवण' म्हणतात. **मनन**—श्रवण केलेल्या अद्वितीय ब्रह्मवस्तुरूप अर्थाचें युक्तीनें चिंतन करणें यास 'मनन' म्हणतात ('श्रुतस्यार्थस्योपपत्तिभिश्चिन्तनं मननम्॥' **निदिध्यासन**—विजातीय अथवा अनात्माकार वृत्तींचा त्याग करून अंतःकरणानें 'मी ब्रह्म आहें' असें निरंतर चिंतन करणें यास 'निदिध्यासन' म्हणतात ('विजातीयप्रत्ययतिरस्कारेण सजातीयप्रत्ययप्रवाहीकरणं निदिध्यासनम्॥').

**असंभावना व विपरीतभावना** (निरूपण ओ. ८७ पहा.)—असंभावना' या शब्दाचा अर्थ 'अशक्यता' असा आहे. 'मी आत्मा आहें' असा साधकानें जरी विचारांतीं निश्चय केला तरी अनेक जन्मांच्या संस्कारामुळें व अध्यासामुळें त्याच्या ठिकाणीं मधून मधून जीवब्रह्मैक्याविषयीं संशय उत्पन्न होत असतो. अशा संशयास वेदांतशास्त्रांत 'असंभावना' म्हणतात. असंभावनेचे दोन प्रकार आहेत: एक प्रमाणासंभावना अथवा प्रमाणगत संशय व दुसरी प्रमेयासंभावना अथवा प्रमेयगत संशय. श्रुतिवचनांनीं कर्मांचें व उपासनेचें प्रतिपादन केलें आहे का जीवब्रह्मैक्याचें प्रतिपादन केलें आहे याविषयींचे संशयास प्रमाणासंभावना म्हणतात. जीवब्रह्माचा अभेद सत्य आहे किंवा भेद सत्य आहे याविषयींच्या संशयास प्रमेयासंभावना म्हणतात. जीव व ब्रह्म यांच्यामध्यें भेद आहे व देहच आत्मा असून तो सत्य आहे असें वाटणें अशी जी विपरीत समजूत तिला विपरीतभावना म्हणतात. या असंभावना व विपरीतभावना जोंपर्यंत जीवाचे ठिकाणीं असतात तोंपर्यंत जीवाला ज्ञानाचें फल जी परमानंदप्राप्ति तिचा लाभ होत नाहीं. श्रवणानें प्रमाणगत असंभावनेची, मननानें प्रमेयगत असंभावनेची व निदिध्यासनानें विपरीतभावनेची निवृत्ति होते.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ ॐ ॥

# प्रकरण तिसरें

## व्याकरण–परिशिष्ट

### श्रीज्ञानेश्वरीच्या पांचव्या अध्यायांतील व्याकरण

[ **टीप**:— प्रस्तुत लेखकांनीं संपादिलेल्या ' श्रीज्ञानेश्वरी अध्याय बारावा ' यातील चवथ्या प्रकरणामध्यें ' श्रीज्ञानेश्वरींतील नामांची व धातूंची रूपावलि ' छापलेली आहे. त्या रूपावलीस अनुसरून प्रस्तुत अध्यायांतील व्याकरण लिहिलेलें आहे. म्हणून हें व्याकरण वाचीत असतांना प्रत्येक वाचकानें ती रूपावलि संग्रहीं ठेवणें अवश्य आहे. ]

### पुल्लिंगी नामें

**अ–कारान्त ( राम ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द**:— असे शब्द या अध्यायांत सुमारें १२० आहेत. त्यांतील कांहीं येथें दिले आहेतः— अवकाश ( ३० ), आहार ( ४३ ), कल्लोळ ( १०० ), काळ ( १६६ ), कृष्ण ( १ ), गज ( ९३ ), गुण ( ३९ ), चकोर ( १०७ ), चंद्र ( १० ), जीव ( ७९ ), डोह ( १४४ ), दास ( ६९ ), दीप ( २७ ), देव ( ६ ), पूर ( १०३ ), प्रकाश ( ४९ ), भंग ( ६६ ), भेद ( ३० ), मशक ( ९३ ), मार्ग ( ८ ), विवेक ( ९० ), व्यापार ( ४० ), संकल्प ( ३६ ), संग ( ९६ ), संन्यास ( २ ), समुद्र ( ३५ ), संवाद ( ६९ ), संसार ( १२५ ), हव्यास ( ३३ ), इत्यादि.

**आ–कारान्त (वारा) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द**:—श्रोता ( ६९ ), उजगरा ( ५४ ), कर्ता ( ३७ ), किडा ( १२१ ), कुरुठा ( १२ ), खरांटा ( ११२ ), निमथा ( ३२ ), वसौटा ( १२ ), विसांवा ( १२४ ), विसुरा ( १७४ ).

**इ-कारान्त ( कवि ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्दः**— अग्नि ( २३ ), उपाधि ( २४ ), महर्षि ( १४७ ), संधि ( १५२ ), क्षीराब्धि ( ११ ).

**ई-कारान्त ( योगी ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द**— अधिकारी ( १४६ ), अनुभवी ( १५७ ), गोसावी ( १३ ), पक्षी ( १३१ ), फलत्यागी ( ७५ ), व्योमगामी ( १५३ ), शरीरी ( ४० ), संन्यासी ( २० ), साक्षी ( ८० ), ज्ञानी ( ९२ ).

**उ-कारान्त ( तरु ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द**—मेरु ( १९ ), सिंधु (३५).

## स्त्रीलिंगी नामें

**अ-कारान्त ( वाट ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द**— आर्त ( ११ ), खूण ( १३६ ), चाड ( १९ ), फांक ( १७३ ), बरळ ( ११६ ), भाष (५१) मात ( १२९ ), वास ( ७४ ), सेज ( ४७ ), हाव ( ७३ ).

**आ-कारान्त ( माला ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द**-अवस्था ( १३२ ), उखा ( १४२ ), ऐक्यता ( २९ ), कल्पना ( २५ ), कालिमा ( ८६ ), चेष्टा ( ५२ ), निसंगता ( ९७ ), प्रसन्नता ( ११ ), विवंचना ( १५५ ), सवेसा ( १३ ).

**इ-कारान्त ( मति ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द**— आर्ति ( ६९ ), प्राप्ति ( ३३ ), पुष्टि ( ११९ ), बुद्धि ( २४ ), भ्रांति (३४), विरक्ति (१२३), शुद्धि ( ७९ ), सृष्टि ( ७४ ).

**ई-कारान्त ( नदी ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द**— कवळी (१३३), गोठी ( ८० ), चिळसी ( १३१ ), दिवाळी ( ८६ ), बोली ( ११७ ), राखोंडी ( २३ ), रोहिणी ( ११६ ), वानी ( ९१ ).

[ **टीप**— पुल्लिंगी ऊ-कारान्त शब्द विंचू व स्त्रीलिंगी उ-कारान्त शब्द धेनु यांच्याप्रमाणें चालणारे शब्द प्रायः आढळत नाहींत. ]

## नपुंसकलिंगी नामें

**अ-कारान्त ( धन ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्दः**—असे शब्द या अध्यायांत सुमारें ७५ आहेत. त्यांतील कांहीं येथें दिले आहेत :-अंतर ( १९ ), अंतःकरण ( १ ), अमृत ( ९१ ), कर्म ( ५० ), काज ( ५९ ), कारण ( २५ ),

घर ( ७१ ), चित्त ( ३ ), चैतन्य ( ३५ ), जग ( ७१ ), जळ ( १७० ), दैव ( ९० ), नवल ( ४२ ), निर्वाण ( १४० ), पत्र ( ५० ), पाऊल ( १०६ ), फळ ( ७ ), ब्रह्म ( १०१ ), भूत ( ९२ ), मन ( ९ ), माप ( १६० ), मिष ( १७० ), लवण ( ३५ ), लक्षण ( १०२ ), सरोवर ( १५६ ), सांच ( १६० ), सुख ( ८ ), स्वप्न ( ९१ ), इत्यादि.

**ए-कारान्त ( लेणें ) शब्दाप्रमाणें चालणारे शब्द :**—कुवाडें ( ६७ ), दळवाडें ( ७८ ), निदसुरें ( ९८ ), भरितें ( ६४ ), मसैरें ( ८३ ).

**धातुसाधित नामें :**—बोलणें ( ६४ ), येणें ( १०५ ), सेवणें ( १२१ ), इत्यादि हीं नामें ‘ लेणें ’ या शब्दाप्रमाणेंच चालतात.

## सर्वनामें

**पुरुषवाचक सर्वनामें :**—‘ मी, आम्ही ’; ‘ तूं, तुम्ही ’; ‘ तो, ते तें व ‘ ते तिये, तीं ’. **दर्शक सर्वनामें :**—हा, हे, हें ; **संबंधी सर्वनामें :**— जो, जे, जें ; **प्रश्नार्थक सर्वनामें :**—काय ( ११ ), कवण ( ६ ), काई ( २७ ).

**सामान्य सर्वनामें :**—आपण ( ९६ ) इत्यादि सर्वनामें या अध्यायांत आलेलीं आहेत.

## विशेषणें

**अ-कारान्त :**—सकळ ( २ ), मागील ( ६ ), सदैव ( १० ), भिन्न ( २७ ), संपूर्ण ( ३९ ), शारीर ( ५१ ), विकळ ( ५७ ), चांग ( ६५ ), महुर ( ११५ ), शीतल ( ११७ ), चोख ( १४५ ), अमोळ ( १६६ ), इत्यादि.

**आ-कारान्त :**—कैसा ( १ ), ऐसा ( ३ ) बरवा ( ६ ), जैसा ( ८ ), तैसा ( ८ ), सांगडा ( ८ ), सोहपा ( ८ ), कायसा ( १३ ), एवढा ( ३५ ), निरुता ( ६० ), तेउता ( ७१ ), भला ( ७८ ), गोमटा ( ११२ ), आघवा ( ११७ ), लटिका ( १२६ ), नाथिला ( १२६ ), वोखटा ( १२७ ), इत्यादि.

[ **टीप :**—आ-कारान्त विशेषणांच्या स्त्रीलिंगी रूपांत अन्त्य ‘ आ ’ चा ईकार होतो व नपुंसकालिंगी रूपांत ‘ एकार ’ होतो ; जसें—गोमटा-टी-टें. एवढा-ढी-ढें ].

**ई-कारान्तः**—एकदेशी ( ३६ ), दुःखी ( १२२ ), इत्यादि.

## धातुसाधित विशेषणें

**वर्तमानकालवाचक धातुसाधित अथवा ता-अन्त विशेषणें :—** घेतें ( २२ ), असता ( २४ ), जाणतें ( ६० ), जागता ( ९४ ), इत्यादि.

**भूतकालवाचक अथवा ला-अन्त विशेषणें :—** निरोपिला ( २ ) संचलें ( ५३ ), निदेलें ( ५३ ), सांडिली ( ५६ ), आळविलें ( ५८ ), फिटला ( ६५ ), उरला ( ९५ ), पातला ( १०३ ), उपाइलें ( १०८ ), दाविलें ( १२८ ), वोतला ( १३७ ), इत्यादि.

## षष्ठ्यर्थक विशेषणें

**पुल्लिंगी विशेष्यापूर्वीं आलेलीं :—** कर्मांचा ( २ ), अर्जुनाचा ( ९ ), औदार्याचा ( १२ ), अमूर्ताचा ( ३९ ), तयाचा ( ४६ ), दीपाचा ( ४९ ), मनाचा ( ५१ ), तेर्थांचा ( ४१ ), मूर्तीचा ( ८१ ), पूर्वदिशेचा ( ८६ ), मृगजळाचा ( १०३ ), सामरस्याचा ( १३७ ), आनंदाचा ( १३८ ), माझा ( १६३ ), इत्यादि.

**स्त्रीलिंगी विशेष्यापूर्वीं आलेलीं :—** श्रीशंभूची ( ११ ), जयाची ( २४ ) संन्यासाची ( ३३ ), बुद्धीची ( ५१ ), अंधकाराची ( ९१ ), सर्पफणीची ( ११७ ), विरक्ताची ( ११९ ), पांडुरोगाची ( १४१ ), द्वैताची ( १४१ ), कारुण्यरसाची ( १७१ ), अमृताची ( १७२ ) इत्यादि.

**नपुंसकलिंगी विशेष्यापूर्वीं आलेलीं :—** निद्रेचें ( ८ ), उपमन्यूचें ( ११ ), संन्यासियाचें ( १८ ), माझें ( २० ), जयाचें ( २० ), इंद्रियांचें ( ५८ ), बुद्धीचें ( ६० ), शांतरसाचें ( ६४ ), दैवाचें ( ६५ ), प्रासाचें ( ७० ), महाभूताचें ( ७८ ), दादुल्याचें ( ८१ ) भ्रांतीचें ( ८३ ), ईश्वराचें ( ८३ ), कुमुददळाचें ( १०७ ), प्रपंचाचें ( १६० ), साचाचें ( १६० ), तुझें ( १६२ ), पढियंतयाचें ( १७० ), इत्यादि.

**सप्तमीगर्भ विशेषणें :—** परिणामींचा ( ७ ), गृहींचे ( ४९ ), पूयपंकींचे ( १२१ ), विषयकर्दमींचे ( १२२ ), जन्ममरणींचे ( १२४ ), परब्रह्मींचे ( १३९ ) गांवींचे ( १४६ ), इत्यादि.

## आख्यातांचीं अथवा क्रियापदांचीं रूपें

**वर्तमानकाळ- प्र. पु. ए. व.**— जाणें ( १३७ ). **प्र. पु. अ. व.**— करूं ( १८० ). **द्वि. पु. ए. व.**—जाणसी ( १८ ), रतसी ( १४१ ), करिसी ( १४१ ), देखसी ( १४१ ), पुससी ( १५० ), परिससी ( १६९ ), अनुष्ठिसी ( १६९ ). **द्वि. पु. अ. व.**—पोखीतसां ( २ ), बोलतां ( ३ ). **तृ. पु. ए. व.**—अशीं रूपें या अध्यायांत पुष्कळ आलेलीं आहेत; त्यांतील कांहीं येथें दिलीं आहेत:— ये ( ७ ), मोडे ( ८ ), सांडे ( ८ ), करी ( १९ ), धरी ( १९ ), वोळखे ( ३० ), चढे ( ३२ ), पावे ( ३२ ), घडे ( ३३ ), आवडे ( ३५ ), मिळे ( ३५ ), पाहे ( ४१ ), शिंपे ( ५० ), उदैजे ( ५१ ), राहटे ( ५३ ), निपजे ( ५५ ), दिसे ( ५७ ), देखे ( ५८ ), बोले ( ५८ ), आतुडे ( ६७ ), उपेक्षी ( ७३ ), रची ( ७६ ), उभारी ( ७८ ), खेळे ( ८१ ), प्रगटे ( ८३ ), ओळखे ( ९० ), आईके ( ९१ ), बोधे ( १७६ ) इत्यादि. **तृ. पु. अ. व.**—अशीं रूपें या अध्यायांत; पुष्कळ आलेलीं आहेत; त्यांतील कांहीं येथें दिलीं आहेत:— होती ( १५ ), म्हणती ( २७ ), मानिती ( २८ ), करिती ( ५२ ), जाणती ( ६० ), बोलती ( ८२ ), देखती ( ८९ ), नेणती ( ९२ ), म्हणती ( १०० ), येती ( १११ ), आवडती ( ११२ ), घेती ( १२१ ), धरिती ( १२३ ), त्यजिती ( १२८ ), चेती ( १४८ ).

**वर्तमानकाळ कर्मणि— तृ. पु. ए. व.**—बोधिजे ( ४ ), बोलिजे (४), सांगिजे ( ४ ), पाहिजे ( १७ ), देखिजे ( १७ ), लाहिजे ( १७ ), आकळिजे ( २४ ), पविजे ( २९ ), गमिजे ( २९ ), नेणिजे ( ५१ ), बोलिजे ( ५१ ), चुंबिजे ( १३१ ), इत्यादि. **तृ. पु. अ. व.**— बंधिजती ( ५६ ). **वर्तमानकाळ - भावे**— लोटिजे ( १०३ ). **भूतकाळ- तृ. पु. ए. व.**— जाहलें ( ३६ ), सुतला ( ४७ ), भुतला ( ४७ ), विटला ( ७१ ), जेविला ( १०७ ), फावलें ( १०८ ).

**भूतकाळ–तृ. पु. अ. व.**—रिझले ( ९ ). जाणवले ( ३१ ). चोखाळले ( ६२ ), केले ( १२९ ), सुतले ( १४८ ), पातले ( १५९ ), ठेले ( १६० ). **भूतकाल- कर्मणि–तृ. पु. ए. व.**–म्हणितलें ( ९ ), दिधलें ( १४ ), सांडिला ( २१ ), हिरतलें ( ३४ ), धुतलें, ( ३४ ), घातलें ( ३४ ), काढिलें

( ३६ ), व्यापिलें ( ३६ ), बोलवलें ( ६४ ), इत्यादि. **भूतकाल-कर्मणि तृ. पु. अ. व.**- सांडवलें ( १०८ ), केले ( १३८ ), इत्यादि.

**भविष्यकाळ-प्र. पु. ए. व.** सांगेन ( ७० ), भविष्यकाळ-तृ. पु. ए. व. -होईल ( ९ ), उरेल ( ९३ ), पावेल ( १३६ ), येईल ( १४५ ), विस्तरेल ( १६७ ), **भविष्यकाळ-कर्मणि-तृ. पु. ए. व.**-सांडिजेल ( १२५ ), जल्पिजेल ( १७३ ), निरूपिजेल ( १७६ ), बोलिजेल ( १७९ ) इत्यादि. **भविष्यकाळ-भावे- तृ. पु. ए. व.**-वासिजेल ( १२५ ).

**आज्ञार्थ-प्र. पु. ए. व.**—म्हणों (१०८). **प्र. पु.** अ. **व**-सांगों. ( ४५ ), बोलों ( १६८ ), म्हणों ( १७१ ). **द्वि. पु. ए. व.**- ऐकें ( ४ ) सांगें ( ६ ), वोळख ( ६० ) पाहीं ( ६२ ), अवधारीं ( ८२ ), पाहें ( १०२ ), जाणें ( ११८ ), जाण ( १२० ), मुकुळीं ( १४२ ), उजळीं ( १४२ ), करीं (१४२), इत्यादि. **द्वि. पु.** अ. व.-देखां ( १० ), परिसां ( ६९ ), आइकां ( १४३ ), इत्यादि. **तृ. पु. ए. व.**-असो ( ५९ ).

**आज्ञार्थ-कर्मणि -तृ. पु. ए. व.**—ऐकीजो ( १६८ ).

**विध्यर्थ-तृ. पु. ए. व.**—बोलावा ( ५ ), देखावा ( ६ ), नोहावा ( १२ ), मागावा ( १३ ), करावें ( ६८ ), होआवा ( ९५ ), पुसावें (१६४), सांगावें ( १६४ ), घेयावा ( १६७ ), सागावी ( १६७ ), आकळावा ( १७४ ), इत्यादि. **तृ. पु.** अ. व. करावीं ( ११४ ).

[ टीप :— **खालील रूपें या अध्यायांत आढळलीं नाहींत**:—(१) भूतकाळ प्र. पु. व द्वि. पु. दोन्ही वचनें. ( २ ) भूतकाळ-भावे. ( ३ ) भविष्यकाळ-प्र. पु. अ. व. ; द्वि. पु. ए. व. व. अ. व. भविष्यकाळ-तृ. पु. अ. व. भविष्यकाळ-कर्मणि तृ. पु. अ. व. ( ४ ) आज्ञार्थ-तृ. पु. अ. व. व आज्ञार्थ कर्मणि तृ. पु. अ. व. ]

**पद्यरूपें**— तीन काळ व तीन अर्थ यांशिवाय पद्यवर्ती अनियमित रूपें या अध्यायांत खालीलप्रमाणें आलेलीं आहेत.— आहे ( १०७ ), होय ( १ ), आथि ( १५० ), नाहीं ( ८६ ), हो ( ९५ ), होये ( १०२ ) इत्यादि.

## अव्ययें

**क्रियाविशेषण अव्ययें**— अचुंबित ( ७ ), अहर्निशीं ( ८७ ), आता ( ६ ), आंतु ( १७५ ), आदि ( ८४ ), आदिकरूनि ( ४५ ), आधीं (८५), आपेंआप ( १३३ ), एकंदर ( १५१ ), एथ ( १३ ), एऱ्हवी ( २६ ), कहीं ( ३३ ), कांहीं ( ४६ ), कीं ( १३ ), कीर ( १६ ), केवीं ( १२२ ), जैं ( २५ ), जेवीं ( ९० ), तत्त्वता ( १५ ), तंव ( ३५ ), तेथ ( ५३ ), तैं ( २३ ), निभ्रांत ( ११८ ), निरंतर ( २० ), निःशेष ( १३० ), पुढती (२), मग ( ८३ ), मागां ( २ ), मुदल ( १५७ ), येथ ( १०५ ), वर( १६६ ), वरी ( १७० ), वायां ( ३३ ), सदा ( ९६ ), सम्यक् ( २८ ), समूळ (८३), सर्वत्र ( ९६ ), सर्वथा ( २६ ), सहजें ( २७ ), साचोकारें ( १४६ ), सांच ( १०१ ) साविया ( ७ ), सुखें ( १४५ ), स्वभावतः ( ८४ ), न ( ८ ), ना ( ११ ), इत्यादि.

**उभयान्वयी अव्ययें :**— आणि ( ७ ), कां ( ९० ), कीं, ( ९३ ), जरी ( ३७ ), जे ( ३८ ), तरी ( १ ), नातरी ( ९१ ), परी ( ६ ), म्हणऊनि ( २२ ), म्हणोनि ( २१ ), म्हणोनिया ( ४७ ), इत्यादि.

**शब्दयोगी अव्ययें:**— कडे ( ७४ ), प्रति ( ४ ), माजि ( ९९ ), लागीं ( ५ ), वरी ( १०५ ), विण ( ३१ ).

**शुद्ध शब्दयोगी अव्ययें**— चि ( २ ), ही ( २८ ).

**केवलप्रयोगी अव्ययें**— हां ( १ ), हो ( १० ), पां ( ११ ), गा ( १५ ), पैं ( २९ ), हन ( १२९ ), कां ( १७६ ) इत्यादि.

## धातुसाधित अव्ययें अथवा कृदन्तें

( १ ) **त-प्रत्ययान्त**— असतु ( ७५ ), ऐकतु ( ४१ ), करितु ( ७५ ), गिंवसित (८८). चालतु (४४), चुंबितु ( १७७ ), वर्तत ( ४९ ), म्हणतु ( १७५ ), वर्ततु ( ४० ), सांडीत ( ६४ ) इत्यादि.

( २ ) **तां-प्रत्ययान्त**— अनुष्ठितां ( ७ ), आकळितां ( ६७ ), करितां ( ६२ ), घाघुसितां ( ६७ ), दंडितां ( ९७ ), नेणता ( ११५ ), पवतां ( १९ ), बोलतां ( ३ ), येतां (८६), विचारितां ( १५ ), सेवितां ( १२० ), इत्यादि.

( ३ ) **वा-प्रत्ययान्त**— खेळावया ( १० ), परिसावया (६५ ), इत्यादि.

( ४ ) **ला-प्रत्ययान्त**— जाहालिया (५७), देखिलिया ( १६३ ) इत्यादि.

**ऊन-प्रत्ययान्त अथवा पूर्वकालवाचक**— क्रमोनि ( १५१ ), करूनि ( ६१ ), घेऊनि ( १५४ ), जाणोनि ( ६९ ), ठाकूनि ( १११ ), देऊनि ( ६१ ), दवडूनि ( १५१ ), परिसोनि ( ६९ ), पारुखोनिया ( १५२ ), पिऊनि ( १७२ ), म्हणोनि ( १७९ ), रोवूंनियां ( ३४ ), रिघोनि ( ७१ ), विझोनि ( २३ ), विचारूनि ( १०९ ), विवरूनि ( १६४ ), विसरूनि ( १११ ), सांडूनि ( १५३ ), सांडोनि ( १८० ), संतोषोनियां ( ९ ), स्थिराऊनि ( १४४ ), हांसोनि ( १४ ), होऊनि ( १६० ), इत्यादि.

**ऊं-प्रत्ययान्त अथवा उत्तरकालवाचक**— गिंवसूं ( २३ ), मानूं ( १४५ ), निवडूं ( १५४ ), वानूं ( १७१ ) विचारूं ( १ ), साहों ( १६६ ), होऊं ( ५४ ), इत्यादि.

## मूळ ओव्या व पाठभेद

श्रीज्ञानेश्वरीच्या जुन्या हस्तलिखित पोथ्यांवरून मुद्रित केलेल्या ज्या ज्ञानेश्वरीच्या प्रती आज उपलब्ध आहेत, त्यांचे सामान्यतः दोन वर्ग करतां येतील. एक पैठणकर श्रीएकनाथ यांच्या पूर्वकालीन असलेल्या हस्तलिखित पोथ्यांवरून छापण्यांत आलेल्या प्रती व दुसरा श्रीएकनाथोत्तरकालीन लिहिलेल्या हस्तलिखित पोथ्यांवरून छापण्यांत आलेल्या प्रती. ह्यांतील पहिल्या वर्गांत कै. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं छापलेली ज्ञानेश्वरी येते व दुसऱ्या वर्गांत कै. कुंटे, नानामहाराज साखरे, बंकटस्वामी यांनीं छापलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रती येतात. ही गोष्ट ज्ञानेश्वरकालीन भाषा व ज्ञानेश्वरकालीन व्याकरणाचीं रूपें यांवरून सहजच सिद्ध करतां येणारी आहे. श्रीएकनाथमहाराजांनीं ज्ञानेश्वरीचें संशोधन करून ज्ञानेश्वरींतील भाषेचें दुर्बोधत्व कमी करण्याकरितां शब्दांचीं स्वकालीन रूपें ज्ञानेश्वरकालीन शब्दांच्या रूपांच्या स्थानीं घालून ज्ञानेश्वरीची प्रत तयार करून ती प्रसृत केली. म्हणून ज्ञानेश्वरकालीन भाषेमध्यें म्हणजे राजवाडेप्रतीमध्यें, ज्याप्रमाणें 'जेया, तेया, माझां, सांगैन' अशीं रूपें आढळतात, तशीं रूपें एकनाथोत्तरकालीन हस्तलिखित

पोथ्यांवरून छापलेल्या कै. कुंटे, नानामहाराज साखरे व बंकटस्वामी यांच्या प्रतींत प्रायः आढळून येत नाहींत. वरील रूपांच्या स्थानीं ह्या प्रतींतून 'जया, तया, माझ्या, सांगेन' अशीं रूपें आढळतात. सामान्य वाचकांच्या दृष्टीनें एकनाथपूर्वकालीन हस्तलिखित प्रतीवरून छापलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींतील भाषेपेक्षां एकनाथोत्तरकालीन हस्तलिखित प्रतीवरून छापलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींतील भाषा अधिक सुलभ वाटते; म्हणूनच आम्हीं प्रस्तुत प्रत तयार करतांना, वै. ह. भ. प. बंकटस्वामी यांच्या प्रतींतील पाठांत प्रायः बदल न करतां, मूळ ओव्या छापलेल्या आहेत. परंतु मुद्रण-दोषामुळें बंकटस्वामी यांच्या या अध्यायांतील ओव्यांच्या पाठांत ज्या ऱ्हस्व, दीर्घ किंवा अनुस्वार यांच्यासंबंधीं चुका झालेल्या आहेत त्या चुका दुरुस्त करून प्रस्तुत प्रतींतील मूळ ओव्या व्याकरणशुद्ध छापण्याचा प्रयत्न आम्हीं केला आहे. यांपैकीं कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत:—

| ओवी | बंकटस्वामी पाठ | शुद्ध पाठ कारण | ओवी | बंकटस्वामी पाठ | शुद्ध पाठ कारण |
|---|---|---|---|---|---|
| १८ | हें | हे (पु. अ. व.) | ११२ | दिठे | दिठें (न. ए. व.) |
| २८ | ते | ते (पु. अ. व.) | ११९ | हे | हें (न. ए. व.) |
| ४३ | निदिजे (भा.प्र.) | निदैजे (कर्त.) | १२१ | तें | ते (पु. अ. व) |
| | | | १२६ | सुखबुद्धि | सुखबुद्धी (तृती.) |
| ५२ | मराठे | मराठें (क्रि.वि.) | १२६ | नाथिले | नाथिलें (न.ए.व.) |
| ५२ | तनु | तनू (तृतीया) | १२८ | निराशा | निराशां (प्र.अ.व.) |
| ६७ | जे | जें (न. ए. व.) | १३१ | पक्षिये | पक्षियें (तृ.ए.व.) |
| ७१ | शांति | शांती (तृतीया) | १३३ | कवळीं | कवळी (स्त्री.प्र.एव.) |
| ७७ | कवणें | कवणीं (अ. व.) | १३५ | जाणते | जाणतें (न.प्र.ए.व.) |
| ७८ | भले | भलें (न. ए. व.) | १४२ | करी | करीं आ.द्वि.पु.ए.व. |
| ८५ | प्रतीति | प्रतीती (तृतीया) | १४७ | महर्षी | महर्षी (स. अ. व.) |
| ९७ | कामेविण | कामेंविण ( ,, ) | १५३ | चित्तेसी | चित्तेंसी (तृ.ए.व.) |
| ९९ | तयांतें | तयातें (ए. व.) | १७२ | नेणें | नेणे (तृ.पु.ए.व.) |
| १०५ | आपणपे | आपणपें (न.ए.व.) | १७६ | बोधें | बोधे (तृ.पु.ए.व.) |

याशिवाय ओवींतील विषयास अनुरूप व अन्वयार्थास योग्य असे जे कांहीं

थोडे पाठ राजवाडे व माडगांवकर यांच्या प्रतींतून घेऊन आम्हीं मूळ ओव्यांत समाविष्ट केले आहेत ते खालीं दिले आहेत :—

| ओवी | बंकटस्वामी पाठ | स्वीकृत पाठ |
|---|---|---|
| २८ | एकें अनुभवें | एकानुभवें |
| ८६ | उदयाची | उदया येताचि |
| १४१ | रचसी | रतसी |
| १७३ | तेथें | तेणे |
| १७६ | जेणें | जेणें जेणें |

**टीप**—संस्कृतभाषाकालीं भूतकालीं क्रियापदांचा म्हणजे ‘ अनद्यतनभूत ’ इत्यादिकांचा उपयोग गतकालीन गोष्टी सांगण्याकडे होत असे. पुढें पुढें हीं भूतकालीन क्रियापदें बनविण्यास प्रायः क्लिष्ट असल्यानें त्यांचे स्थानीं भूतविशेषणांचा उपयोग अधिक होऊं लागला व पुढें पुढें तो वाढतच चालला,—इतका कीं, भूतकालाहून अन्य क्षेत्रांतही हें विशेषण वावरूं लागलें. सामान्य गोष्ट, त्रैकालिक सिद्धांत, शाश्वत सत्य, इत्यादि सांगतांना हें विशेषण वारंवार उपयोगांत येऊं लागलें—

‘ अध्वा जितो यानवता । मिष्टाशा गोमता जिता । जिता सभा वस्त्रवता । सर्वं शीलवता जितम् ॥ ’ इत्यादि रूपांचा श्लोक चाणक्य शतकांत आढळतो. ( याचा अर्थ—ज्याच्याजवळ वाहन असेल त्याला प्रवास सुखानें करतां येतो; गोड खाण्याची हौस गुरें बाळगणारास सहज पुरवून घेतां येते; पोषाख उंची असल्यास सभेमध्यें मनुष्यास उच्च स्थान मिळतें; आणि ज्याचें शील उत्तम आहे त्याला वाटेल ती गोष्ट साध्य करितां येते )—येथें चारही चरणांत एक एक नित्य खरी ठरणारी गोष्ट सांगितली आहे. हिचें विधान स्वभावतः वर्तमानकालीन क्रियापदानें करणें प्राप्त होतें. पण तत्स्थानीं येथें ‘ भूत विशेषण ’ योजिलें आहे. संस्कृत भाषा व्यवहारांतून लोपण्याच्या सुमारास प्रवृत्त झालेला हा भूतविशेषणांचा उपयोग, ज्ञानेश्वरींतही आढळतो हें अभ्यासकांनी लक्षांत घ्यावें. उदाहरणें—ओव्या, ४७, ६२, ७१, ७२, ९८, १३७, १३८, १४७, १५९, १६०.

॥ ॐ ॥

# प्रकरण चवथें

## प्रश्न व उत्तरें

[ १ गीतेचें श्रेष्ठत्व. २ गीतेवरील टीकाकार. ३ ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्राची राजकीय, धार्मिक व सामाजिक परिस्थिति. ४ ज्ञानेश्वरांचा जीवनवृत्तांत व गुरुपरंपरा. ५ ज्ञानेश्वरीचें वैशिष्टय, ज्ञानेश्वरांची लेखनशैली व ज्ञानेश्वरींतील काव्य. ६ निरूपणांतील मुख्य विषयांची प्रश्नोत्तररूपानें सूची. ]

**प्रश्न १ ला**—सर्व वैदिक धर्मग्रंथांमध्यें गीतेला श्रेष्ठत्व कां प्राप्त झालें तें सांगा.

**उत्तर—गीतेचें श्रेष्ठत्व**—दशोपनिषदें, भगवद्गीता व ब्रह्मसूत्रें यांस वेदांतप्रस्थानत्रय म्हणतात. उपनिषदांत अथवा वेदांतशास्त्रांत प्रामुख्यानें ब्रह्म—आत्मा, जगत् व जीव यांच्या स्वरूपासंबंधीं व आत्मप्राप्तीच्या साधनाविषयीं विचार सांगितला आहे. भगवान् श्रीबादरायण व्यासांनीं उपनिषदांत असणाऱ्या परस्परविरोधी वाक्यांची एकवाक्यता दाखविण्यासाठीं ब्रह्मसूत्रें रचिलीं व इ. स. पू. १९३१ या वर्षी मार्गशीर्ष शुद्ध एकादशीस ( ‘ गीतातत्त्वमंजिरी ’ पान ८६४ पहा ) म्हणजे भारतीय युद्धास आरंभ होण्यापूर्वी, भगवान् श्रीकृष्णांनीं कुरुक्षेत्रावर, धर्म्य काय व अधर्म्य काय यांचा निर्णय करण्यास असमर्थ असलेल्या व त्यामुळें किंकर्तव्यतामूढ झालेल्या अर्जुनास गीता सांगितली. नंतर श्रीव्यासांनीं ही गीता भारतांतील भीष्मपर्वांत अनुष्टुप् छंदांत ग्रथित केली (‘ म्हणौनि श्रीव्यासाचा हा थोरु । विश्वासि जाला उपकारु । जे श्रीकृष्णउक्ती आकारु । ग्रंथाचा केला ॥ ’ ज्ञा.–१८–१७०७ ). औपनिषत् तत्त्वज्ञान गीतेंत थोडक्यांत व असंदिग्ध रीतीनें सांगितलें असल्यामुळें गीता हा ग्रंथ ‘ उपनिषत्सार ’ म्हणून गणला गेला व हा ग्रंथ सर्वांना मान्य व प्रमाणभूत झाला. किंबहुना सर्व वैदिक धर्मग्रंथांमध्यें गीतेला श्रेष्ठत्व प्राप्त

झालें असून हा ग्रंथ सर्व भारतीयांना शिरोधार्य झाला आहे, याचीं कारणें मुख्यतः खालीलप्रमाणें आहेत :— ( १ ) वेद हे भगवंताच्या निःश्वसितापासून उत्पन्न झालेले आहेत, पण गीता ही साक्षात् भगवंतांनीं स्वमुखानें अर्जुनास सांगितलेली आहे ( 'हा वेदार्थसागरु । जया निद्रिताचा घोरु । तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला ॥ ' ज्ञा.–१–७२ ). ( २ ) गीतेंत नीतिधर्माची चर्चा अध्यात्मशास्त्रदृष्ट्या केलेली असून गीतेंत जीं तत्त्वें व प्रमेयें सांगितलेलीं आहेत तीं तात्कालिक महत्त्वाचीं नसून त्यांचें महत्त्व सार्वकालिक व सार्वभौमिक आहे. ( ३ ) वैदिक धर्माचे प्रवृत्ति व निवृत्ति असे दोन प्रकार आहेत. त्यांतील प्रवृत्तिलक्षणधर्म हा ऐहिक व पारलौकिक अभ्युदयाकरतां असून त्यांत वर्ण व आश्रमपरत्वें भिन्न भिन्न कर्मे व आचार सांगितले आहेत. हीं कर्मे फलाच्या इच्छेनें केलीं असतां, ऐहिक व पारलौकिक उत्कर्ष, हें फल मिळतें व फलेच्छेवांचून ईश्वरार्पणबुद्धीनें केलीं असतां चित्तशुद्धि व वैराग्य हें फल मिळतें. निवृत्तिलक्षणधर्म हा साक्षात् निःश्रेयसाकरतां म्हणजे मोक्षाकरतां असून त्यांत उपासना व आत्मानात्मविवेक यांचें विवेचन मुमुक्षूसाठीं केलेलें आहे. गीतेंत या दोन्ही धर्मांचा विचार आला असून त्यांचा समन्वय योग्य रीतीनें केला आहे व म्हणून गीता ही उपनिषत्साराप्रमाणें वेदाचेंही सार ठरतें. श्रीमच्छंकराचार्यांनीं गीता ही 'समस्तवेदार्थसारसंग्रहभूत' व श्रीज्ञानेश्वरांनीं 'कांडत्रय निरूपिणी । श्रुतिचि हे कोडिसवाणी ।' आहे असें म्हटलें आहे. ( ४ ) गीतेंत सगुणोपासना अथवा भक्ति ही ज्ञानोत्पत्तीस व तद्वारा मोक्षप्राप्तीस हेतु आहे असें सांगितल्यामुळें गीता ही सर्व वर्णांतील व आश्रमांतील आबालवृद्ध–स्त्रीपुरुषांस सुसेव्य अशी झाली आहे ( 'तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेदु वेठला भलतेणें । सेव्य होआवया ॥ ' ). ( ५ ) गीतेनें अधिकारपरत्वें कर्म, सांख्य, योग, भक्ति व संन्यास या सर्व साधनांचा अंगीकार केला असून जीवानें कर्तव्यपराङ्मुख होऊन वनांत न जातां आत्मज्ञानी होऊन कर्तव्यसन्मुख व्हावें असें प्रतिपादिलें आहे व ( ६ ) गीता हा अनुपम पद्यप्रबंध आहे. उपनिषदें व ब्रह्मसूत्रें हीं गद्यांत असून त्यांची भाषाही थोडी क्लिष्ट आहे, परंतु गीतेची भाषा ही संवादात्मक व काव्यमय असल्यामुळें गीतेंतील तत्त्वज्ञान समजण्यास सुलभ झालें आहे. कै. चिंतामण विनायक वैद्य आपल्या महाभारतावरील उपसंहारांत भगवद्गीतेच्या भाषे-

संबंधीं असें म्हणतात कीं, "एकंदर सर्व संस्कृत वाङ्मयामध्यें भाषेच्या दृष्टीनेंही भगवद्गीतेची बरोबरी करणारा एकही ग्रंथ नाहीं. सरळपणा, शब्द-रचनेचें शुद्धत्व व एकंदर वाक्यांचे श्रुतिमनोहर व गंभीर ध्वनि हे या भगवद्गीतेच्या भाषेचे अद्वितीय गुण आहेत. या सर्वोत्तम गीतांतील प्रत्येक शब्द व वाक्य सुवर्णमय आहे. कारण तीं सुवर्णासारखींच लहान, वजनदार व तेजस्वी आहेत."

**प्रश्न २ रा**—गीतेवरील प्रमुख संस्कृत व प्राकृत टीकाकारांच्या मतांचा थोडक्यांत अनुवाद करा.

**उत्तर**—गीतेचें श्रेष्ठत्व ( पहिल्या प्रश्नाच्या उत्तरांत दिग्दर्शित केल्या-प्रमाणें ) निर्विवाद असल्यामुळें व गीता ही प्रस्थानत्रयीपैकीं एक असल्यानें गीतेवर विवरणात्मक टीका लिहिणें ही गोष्ट बहुमानाची व धन्यतेची गण-ण्यांत येऊं लागली. किंबहुना आपला संप्रदाय लोकप्रिय करावयाचा असेल तर उपनिषदें व ब्रह्मसूत्रें यांबरोबरच गीतेवरही भाष्य लिहून त्यांतील वचनांचा किंवा श्लोकांचा अर्थ स्वसंप्रदायास अनुकूल आहे, असें दाखविणें हें प्रत्येक संप्रदायप्रवर्तकास प्राप्त झालें. म्हणून बहुतेक संप्रदायप्रवर्तकांनीं प्रस्थानत्रयी-च्या तिन्ही भागांवर भाष्यें लिहिलीं आहेत. या सर्व संप्रदायांत श्रीमच्छंकरा-चार्यांचा संप्रदाय पहिला म्हणजे अतिप्राचीन आहे. श्रीमच्छंकराचार्यांनीं प्रस्थानत्रयीच्या तिन्ही भागांवर भाष्यें लिहून या प्रस्थानत्रयीचें अद्वैतप्रति-पादनामध्यें तात्पर्य आहे असें सिद्ध केलें आहे. शांकरमतांत मुख्यतः खालील पांच गोष्टींचा अंतर्भाव होतोः—( १ ) स्वगतसजातीयविजातीयभेदशून्य असें अद्वितीय एकरस ब्रह्म आहे व तेंच सत्य आहे; ( २ ) तद्व्यतिरिक्त प्रतीत होणारें सर्व जगत् हें मिथ्या आहे व तें मायेच्या योगानें अथवा ब्रह्मस्वरूपा-च्या अज्ञानामुळें ब्रह्माच्या ठिकाणीं प्रतीत होतें, जसें रज्जूचे ठिकाणीं रज्जूच्या अज्ञानानें मिथ्या सर्पाची प्रतीति होते. ( ३ ) अद्वितीय ब्रह्मज्ञानप्राप्तीकरतां जगत्कारण मायाविशिष्ट चैतन्य म्हणजेच 'ईश्वर' हा मनुष्यमात्रास उपास्य आहे. (४) जीवात्मा हा मूलतः परब्रह्मरूपच आहे व (५) जीवब्रह्मैक्यज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो. यासच अद्वैतमत म्हणतात. श्रीमच्छंकराचार्यांनीं गीतेचा अर्थ संन्यासपर लाविला आहे. त्यांच्या मतें निष्कामकर्म व उपासनेच्या योगानें चित्तशुद्धि झाल्यानंतर आत्मजिज्ञासूंनीं आत्मज्ञानाकरतां व तद्वारा मोक्ष प्राप्त

होण्याकरतां सर्व कर्मांचा विधिपूर्वक त्याग करून संन्यास घेणें आवश्यक आहे. श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या केवलाद्वैती सांप्रदायाचा सर्व हिंदुस्थानभर प्रचार केला व तत्त्वज्ञानदृष्टया तोच सांप्रदाय बहुमान्य झाला.

(२) श्रीमच्छंकराचार्यांच्या पश्चात् अवतीर्ण झालेले श्रीरामानुजाचार्य, श्रीमध्वाचार्य, श्रीवल्लभाचार्य व श्रीनिंबार्काचार्य यांनीं अनुक्रमें विशिष्टाद्वैत, द्वैत, शुद्धाद्वैत व द्वैताद्वैत असे सांप्रदाय प्रसृत केले. यांपैकीं रामानुज व मध्व यांनीं प्रस्थानत्रयीवर भाष्यें लिहिलीं आहेत. श्रीवल्लभाचार्यसांप्रदायाचे गीतेवर तत्त्वदीपिकादि ग्रंथ आहेत, निंबार्कांचें वेदांतसूत्रावर स्वतंत्र भाष्य आहे व त्यांच्या सांप्रदायांतील केशव काश्मीरिभट्टाचार्य यांनीं भगवद्गीतेवर 'तत्त्व-प्रकाशिका' या नांवाची टीका लिहिली आहे. या सर्व आचार्यांनीं अपापल्या भाष्यांतून गीतेंत आपलेंच मत प्रतिपाद्य आहे असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. यांचीं मतें खालीलप्रमाणें आहेत:—**श्रीरामानुजचार्य**—हे विशिष्टाद्वैती होत. ते चित्, अचित् व ईश्वर अशीं तीन तत्त्वें मानतात. जीव (चित्) व जगत् (अचित्) हीं दोन्ही एका ईश्वराचेंच शरीर असल्यामुळें चिदचिद्विशिष्ट ईश्वर एक होय, व ईश्वरशरिरांतील या सूक्ष्म चिदचिदापासून पुढें स्थूल, चित् व अचित् किंवा अनेक जीव व जगत् निर्माण होतात असें या सांप्रदायाचें मत आहे. यांच्या मतें जगत् सत्य आहे, जीव सत्य आहेत व ईश्वर हा त्यांहूनही अधिक सत्य आहे. ते निर्गुण ब्रह्म, अद्वैत व माया मानीत नाहींत. जीवात्मा हा ईश्वर कधींच होत नाहीं. परंतु आपण देवाचे सेवक आहोंत व अशा ज्ञानानुसार ईश्वराची कर्मरूप उपासना केल्यानें जीवात्मा मुक्त होतो म्हणजे वैकुंठास जातो. हा संप्रदाय वैष्णवपंथी असून याचा प्रसार कर्नाटकांत व त्याच्याखालीं दक्षिणेंत विशेष आहे. **श्रीमध्वाचार्य**—हे द्वैती होत. हे रामानुजाप्रमाणें ईश्वर व जीव कांहीं अंशीं एक व कांहीं अंशीं भिन्न असें मानीत नाहींत. यांच्या मतें हे दोन्हीही सदैव भिन्नच आहेत. बाकी सर्व बाबतींत यांचें मत श्रीरामानुजाचार्यांप्रमाणेंच आहे. हाही सांप्रदाय कर्नाटकांत प्रसृत आहे. **श्रीवल्लभाचार्य**— हे शुद्धाद्वैती होत. यांच्या मतें ब्रह्म केवळ सगुणही नाहीं व केवळ निर्गुणही नाहीं, तर तें सगुण-निर्गुण आहे. परमात्मा श्रीकृष्ण परब्रह्म आहे. तो सगुणही आहे व निर्गुण-ही आहे. जगत् श्रीकृष्णपरमात्म्याची 'लीला' आहे व तें सत्य आहे. भग-

वंताच्या अनंत शक्ति आहेत, त्यापैकीं माया ही एक शक्ति आहे. जीव हे अग्नीच्या ठिणग्यांप्रमाणें परमात्म्याचे अंश आहेत. मायापरतंत्र जीवास मोक्षप्राप्त्यर्थ लागणारें ज्ञान ईश्वराची भक्ति केली असतां त्याच्या अनुग्रहानें प्राप्त होतें. या अनुग्रहासच 'पुष्टि' असें नांव असल्यानें या संप्रदायास 'पुष्टिमार्ग' असेंही म्हणतात. पुष्टि मिळविण्याकरतां तन्मयतेनें श्रीकृष्णपरमात्म्याची सेवा करावी लागते. हा संप्रदाय गुजरातेंत रूढ आहे. **श्रीनिंबार्काचार्य**—हे द्वैताद्वैती होत व यांचा राधाकृष्णभक्तिपर वैष्णव सांप्रदाय आहे. यांच्या मतें जीव, जगत् व ईश्वर हे तिन्ही जरी भिन्न असले तरी मूळ परमेश्वरांतच जीव व जगत् यांचीं सूक्ष्म तत्त्वें अंतर्भूत आहेत व या दोहोंचे व्यापार व अस्तित्व ईश्वरेच्छेवर अवलंबून आहेत. हा सांप्रदाय बंगाल प्रांतांत प्रसृत आहे. श्रीरामानुजादि आचार्यांच्या मतांत वर दर्शविल्याप्रमाणें जरी फरक असला तरी हे सर्व आचार्य वैष्णवपंथी असून ते द्वैती आहेत, ते निर्गुण निराकार असें ब्रह्म न मानतां सगुण 'पुरुषोत्तम' म्हणजेच ब्रह्म असें मानतात व देहपातानंतर जीवात्म्यानें पुरुषोत्तमाच्या लोकीं म्हणजे वैकुंठांत जाणें हाच त्यांच्या मतें मोक्ष होय. यांचे सांप्रदाय जरी आज हिंदुस्थानात रूढ असले तरी श्रीमच्छंकराचार्यांचें अद्वैतमतच हिंदुस्थानांत तत्त्वज्ञानदृष्ट्या अधिक रूढ झालें आहे ही गोष्ट सर्वमान्य आहे.

गीतेवरील संस्कृत भाष्यकारांचीं अथवा टीकाकारांचीं मतें वर सांगितलीं. त्याचप्रमाणें गीतेवर मराठींतही टीका लिहिलेल्या आहेत. ज्ञानेश्वरीच्या पूर्वीं गीतेवर मराठी भाषेंत कांहीं टीका होत्या असें आतां सिद्ध झालें आहे, परंतु त्या टीका प्रसिद्ध नाहींत. म्हणून 'ज्ञानेश्वरी' ही गीतेवरील प्रसिद्ध अशी पहिलीच टीका होय. श्रीज्ञानेश्वरांनीं गीता हें ज्ञानप्रधानशास्त्र आहे असें म्हटलें असून ('मोक्षदानीं स्वतंत्र। ज्ञानप्रधान हें शास्त्र। येतुलालें दूजीं सूत्र। उभारिलें॥' ज्ञा.–१८–१४३६) त्यांच्या मतें मोक्षप्राप्तीचें साधन ज्ञानच होय ('वांचूनि ज्ञानेंवीण एकें। उपाय करिसी जितुके। तिहीं गुंफासि अधिकें। रुखीं इये॥' ज्ञा.–१५–२४९). कर्म, उपासना व ज्ञान या बाबतींत त्यांचें मत श्रीशंकराचार्यांप्रमाणें दिसतें. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मतें कर्मानें चित्तशुद्धि होते, उपासनेनें चित्तस्थैर्याचा लाभ होतो व यामुळें ज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होते ('तैसे मोक्ष देईल ज्ञान। येथ कीर नाहीं आन। परी तेंचि थारे ऐसें

मन । शुद्ध होआवें ॥ ज्ञा.–१५–३५ ). तसेंच श्रीशंकराचार्यांचा मायावाद व अद्वैत स्वीकारूनही अद्वैतांत भक्ति अथवा ज्ञानोत्तर भक्ति घडणें शक्य आहे व त्या भक्तीचा आनंद भोगण्याकरतां अद्वैतानुभव प्राप्त होणें आवश्यक आहे असें त्यांनीं म्हटलें आहे (' साडेपंधरा मिसळावें । तैं साडेपंधरेंचि होआवें । तेवीं मी जालिया संभवे । भक्ति माझी ॥' ज्ञा.–१५–५६६ ). ज्ञानोत्तर आत्मानुभवी पुरुषाचे व्यवहार हे त्याच्या पूर्वसंस्कारानुसार किंवा प्रारब्धानुसार होत असतात हें वेदांतशास्त्राचें मत श्रीज्ञानेश्वरांना ग्राह्य होतें, ही गोष्ट त्यांनीं ' यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।' या श्लोकावर केलेल्या टीकेवरून जरी उघड होणारी आहे तरीही लोकसंग्रहार्थ किंवा लोकाना नीतीचा मार्ग दाखवून देण्याकरतां ज्या प्राप्त पुरुषांकडून लोकसंग्रहार्थ निष्काम कर्में घडतात ते पुरुष धन्य होत, असें त्यांचें मत दिसतें. ही गोष्ट त्यांच्या लिहिण्याच्या रोखावरून स्पष्ट होते. किंबहुना ज्ञात्या पुरुषानें आपण पूर्ण झालों तरी कर्म करीत राहावें हें चांगलें, असा त्यांचा सात्त्विक आग्रह दिसतो (' देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयाही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥' ज्ञा.–३–१५५ ; ' जे पुरुषार्थसिद्धि चौथी । घेऊनि आपुलिया हातीं । रिगाला भक्तिपंथीं । जगा देतु ॥' ज्ञा.–१२–२१९ ). श्रीज्ञानेश्वरीनंतर गीतेवरील मराठी टीका म्हणजे दासोपंतांचा ' गीतार्णव ' ग्रंथ होय. या टीकेंत प्रायः श्रीशंकराचार्यांच्या व ज्ञानेश्वरांच्या मताचेंच अनुसरण केलेलें दिसतें. परंतु ही टीका फारच विस्तृत व तिची भाषा नीरस असल्यामुळें तिला फारशी प्रसिद्धि मिळाली नाहीं. दासोपंतांनंतर वामनपंडितांनीं गीतेवर ' यथार्थदीपिका ' या नांवाची टीका लिहिली आहे. या टीकेंत त्यांनीं शांकर मताचा अनुवाद न करतां गीतेचा कर्मपर अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे.

ज्ञानेश्वरी ही ' भावार्थदीपिका ' म्हणजे गीतेचा केवळ भावार्थ सांगणारी आहे व आपली टीका ही गीतेचा यथार्थ अर्थ व्यक्त करणारी आहे हें दर्शविण्याकरितां वामनपंडितांनीं आपल्या टीकेस ' यथार्थदीपिका ' असें हेतुपूर्वक नांव दिलें आहे. डॉ. शं. दा. पेंडसे, एम्.ए., यांनीं आपल्या ' श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान ' या ग्रंथांत ' ज्ञानेश्वरी अथवा भावार्थदीपिका ' व ' यथार्थदीपिका ' याची मार्मिक तुलना केली आहे, ती थोडक्यांत खालीलप्रमाणें आहे— (१)

श्रीज्ञानेश्वर हे संत होते व त्यांना परमात्म्याच्या सगुण–निर्गुण स्वरूपाचा अनुभव होता, तर वामनपंडित हे शास्त्री होते. सामान्य जनतेची आध्यात्मिक भूक शमविण्याचें ध्येय ज्ञानेश्वरांचें असल्यामुळें त्यांनीं वादविवादाच्या अथवा शास्त्रीय परिभाषेच्या भानगडींत न पडतां गीतेचें हृद्‌गत सरळपणें व सुलभतेनें सांगितलें आहे. याच्या उलट, वामनपंडितांची बुद्धि शास्त्रीय परिभाषेंत अडकलेली असल्यामुळें त्यांनीं आपली टीका संस्कृतांतील शांकरभाष्यादि टीकांच्या धर्तीवर लिहिली आहे. ( २ ) ज्ञानेश्वरांचा निर्गुणात्मवादाकडे कल, तर गीता ही सगुणप्रतिपादक आहे असें वामनपंडितांचें मत असल्यामुळें त्यांनीं सगुण परमेश्वराची भक्ति हेंच गीतेचें प्रतिपाद्य आहे असें वेळीं अवेळीं आपल्या टीकेंत प्रतिपादलें आहे. भक्ति दोघांनाही मान्य असली तरी ज्ञानेश्वर हे केवलाद्वैती आहेत व वामनपंडित हे शुद्धाद्वैती आहेत. ( ३ ) ज्ञानेश्वरांच्या टीकेंत त्यांची नम्रता ठिकठिकाणीं दिसून येते, तर पंडितांच्या टीकेंत त्यांचा अहंभाव प्रकट झाला आहे. ( ४ ) ज्ञानेश्वरांची टीका जिवंत आहे, कारण तिच्यांत लोकांच्या आचारविचारांना वळण लावण्याचें सामर्थ्य आहे, तर वामनपंडितांची टीका जुन्या परिभाषेंत अडकल्यामुळें ती रुक्ष झाली आहे. एवंच, वामनपंडितांची टीका अभिनिविष्ट व तर्ककर्कश असल्या-मुळें तिला ज्ञानेश्वरीइतकी लोकप्रियता प्राप्त झाली नाहीं. अलीकडच्या काळांत कै. लोकमान्य टिळकांनीं ‘ गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र ’ हा ग्रंथ लिहून त्यांत त्यानीं गीतेंत ज्ञानमूलक व भक्तिप्रधान कर्मयोगाचेंच प्रतिपादन केलें आहे, असें दाखविलें आहे. तसेंच श्री. ज. स. करंदीकर, बी. ए., एल्‌एल्. बी. यांनीं नुकताच ‘ गीतातत्त्वमंजरी ’ अथवा ‘ निर्लेप कर्मशास्त्र ’ या नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. त्यांत त्यांनीं गीतेचा लोकमान्यांनीं केलेला कर्मयोगपर अर्थच मुख्यतः प्रतिपादिला आहे.

**प्रश्न ३ रा** :—श्रीज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्राची राजकीय, धार्मिक व सामाजिक परिस्थिति कशी होती ती थोडक्यांत सांगा.

**राजकीय परिस्थिति** :—श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यांत पैठणजवळ असलेल्या आपेगांव नांवाच्या खेड्यांत शालिवाहन शके ११९३ ( इ. स. १२७१ ) मध्यें झाला. हा प्रांत त्या वेळीं यादव राजांच्या अमलाखालीं होता व यादववंशांतील श्रीरामचंद्र उर्फ रामदेव हा महाराष्ट्रावर

राज्य करीत होता. याची राजधानी देवगिरी अथवा अलीकडील दौलताबाद हें शहर होतें. या रामदेवरावाची कारकीर्द शके ११९३ ते १२३१ ( इ. स. १२७१–१३०९ ) पर्यंत झाली. ज्ञानेश्वरीच्या शेवटीं 'तेथ यदुवंशविलासु। जो सकळकलानिवासु। न्यायातें पोषी क्षितीषु। श्रीरामचंद्र॥' ज्ञा.–१८–१८०४ असा गौरवपूर्वक उल्लेख करण्यांत आला आहे तो याच रामदेवरावाचा होय.

श्रीज्ञानेश्वरांच्या हयातींत (म्ह. शके १२१५ पर्यंत) महाराष्ट्रांत मुसलमानी सत्तेचा प्रवेश झाला नव्हता. परंतु उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानी सत्ता स्थापन झाली होती व ठिकठिकाणीं देवळांचा नायनाट करून त्या ठिकाणीं मशिदी उभ्या करणें, हिंदूंना बाटविणें, तीर्थें व देवालयें भ्रष्ट करणें इत्यादि हिंदुधर्माच्या उच्छेदाचें सत्र चालू होतें. शके १२१६ मध्यें अल्लाउद्दीन खिलजी देवगिरीवर चालून आला होता; परंतु त्यास रामदेवरावानें मोठी खंडणी देऊन परत पाठविलें. त्यानंतर शके १२२८ मध्यें अल्लाउद्दीन खिलजीनें आपला सरदार मलिक काफर यास पुन्हा रामदेवरावावर स्वारी करण्यास पाठविलें व त्यानें देवगिरीवर स्वारी करून रामदेवरावाचा पराभव केला व अपार संपत्ति लुटून रामदेवरावास कैद करून दिल्लीस नेलें. रामदेवरावानें खंडणी देण्याचें कबूल केल्यामुळें सहा महिन्यानंतर त्याची कैदेंतून सुटका झाली. नंतर तो देवगिरीस आला व पुढें तीन वर्षांनीं शके १२३१ मध्यें मरण पावला. त्याच्यामागून त्याचा मुलगा शंकरदेव हा गादीवर बसला. त्यानें खंडणी दिली नाहीं म्हणून मलिक काफरनें शके १२३४ मध्यें शंकरदेवावर स्वारी केली व त्यांत तो मरण पावला. नंतर रामदेवरावाचा जांवई हरपाल, यानें देवगिरीच्या राज्यावर बसण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यास दिल्लीचा बादशहा मुबारिक यानें पकडून दिल्लीस नेलें व तेथें त्याचा अमानुष रीतीनें अंत झाला. अशा प्रकारें यादवांच्या राज्याचा शेवट झाला.

वरील संक्षिप्त इतिहासावरून स्वधर्मीय यादव राजाच्या राजवटींत महाराष्ट्र देश स्वराज्यसुख अनुभवीत असतांच श्रीज्ञानेश्वरांची सर्व हयात ( शके ११९३ ते शके १२१५ ) गेली ही गोष्ट उघड होणारी आहे.

**धार्मिक परिस्थिति**:—श्रीज्ञानेश्वरांच्या वेळीं महाराष्ट्रांत बौद्धधर्माचा जवळजवळ लोप झाला होता, परंतु जैन, लिंगायत ( वीरशैव ) व महा-

नुभाव अथवा मानभाव या तीन अवैदिक पंथाचा बराच प्रसार झाला होता. जैनधर्माचा आद्य प्रवर्तक ‘महावीर’ हा होय. या धर्मांत वेदांचें प्रामाण्य व चातुर्वर्ण्यव्यवस्था मानली जात नाहीं. या धर्माची उभारणी अहिंसा व तपस्या या दोन तत्त्वावर झाली आहे. लिंगायत पंथाचा मूळ पुरुष ‘बसव’ हा होय. हा पंथ द्वैती व वीरशैवी आहे. यांतही वेदांचें प्रामाण्य व चातुर्वर्ण्यव्यवस्था मानली जात नाहीं. या पंथांत स्त्री-पुरुष हे गळ्यांत चांदीचें जानवें घालून त्यांत शिवलिंग ठेवतात व त्याची पूजा करतात. हा पंथ कर्नाकटांत प्रसृत आहे. मानभाव हा पंथ वैष्णव आहे व या पंथाचा फैलाव तत्काळीं महाराष्ट्रांत बराच होता. या पंथाचे मूळ प्रवर्तक ‘श्रीचक्रधरस्वामी’ हे होत. या पंथासही वेद प्रमाण नाहींत व तो वर्णाश्रमव्यवस्था मानीत नाहीं. हा पंथ द्वैती असून यांतील आराध्यदेवता कृष्ण व दत्त ह्या होत. स्त्री व पुरुष या सर्वांना संन्यास घेण्याचा अधिकार असून, तो घेतल्याखेरीज मोक्ष मिळत नाहीं असें या पंथाचें मत आहे. या तिन्ही पंथांच्या प्रसारामुळें लोकांचा वेदाविषयी आदर कमी झाला होता, परंतु ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथांत वेदाची थोरवी प्रतिपादन करून वैदिक तत्त्वज्ञान व आचार यांविषयीं लोकांचा आदर पुन्हा प्रस्थापित केला.

वरील तीन अवैदिक पंथ जसे महाराष्ट्रांत प्रसृत होते तसेच रामानुजाचार्यांचा विशिष्ट द्वैतवादी भागवतधर्म, नाथपंथ व वारकरीपंथ हे तीन वैदिक पंथही त्या काळीं प्रमुख होते. त्यापैकीं रामानुजाचार्य हे द्वैती असल्यामुळें त्यांच्या पंथांत द्वैतप्रधान भक्तीला प्राधान्य होतें. परंतु ज्ञानेश्वरमहाराज हे शंकराचार्यांप्रमाणें पूर्ण अद्वैती होते. ते नाथपंथी असल्यामुळे त्यांना त्या पंथांतील अद्वैत ज्ञान व योग यांचा लाभ लहानपणींच झाला होता. तसेंच त्यांचे वडील विठ्ठलपंत यांच्याकडून त्यांना वारकरी पंथांतील सगुण भक्तीचेंहि बाळकडू मिळालें होतें. यामुळें त्यांनीं ज्ञानेश्वरींत अद्वैत वेदांत, योग व सगुण भक्ति यांचा योग्य समन्वय करून तद्द्वारा एकांतिक भक्तीचीं बंडें मोडलीं व अद्वैत ज्ञानावर उभारलेल्या भक्तीचा म्हणजे ज्ञानी भक्तीचा प्रसार केला.

**सामाजिक परिस्थिति:**—ज्ञानेश्वरींतील उपमादृष्टांतांवरून तत्कालीन समाजस्थितीचें कांहींसें आकलन होतें. श्रीज्ञानेश्वरकालीं महाराष्ट्र देश देश स्वराज्यसुख अनुभवीत होता. यामुळें तत्कालीन लोक श्रीमंत, ऐश्वर्यसंपन्न

व सुखवस्तु असे होते. बहुतेकांचा व्यवसाय शेतकी व पशुपालन हा होता. कांहींचा व्यवसाय सावकारी असावा असें दिसतें. सोन्याची विपुलता होती व तत्कालीं सोन्याचीं नाणींही प्रचलित होतीं. नानाविध शास्त्रांची व कलांची वाढ झालेली होती व विशेषतः शिल्पकला व चित्रकला यांची बरीच प्रगति झाली होती. किल्ले व देवालयें बरींच बांधलीं जात होतीं व राजकीय उलाढालींत व रणक्षेत्रांत लोक अग्रभागीं होते.

यादवांच्या राजवटींत समाज हा प्रायः श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माचें पालन करणारा होता. वैश्वदेव, देवपूजा, अतिथिभोजन, गुरुसेवा, इत्यादि नित्य कर्में व पितृश्राद्धादि नैमित्तिक कर्में हीं आचरलीं जात होतीं आणि लोक चातुर्वर्ण्यव्यवस्था मानीत होते. तसेंच यज्ञादिकांस मदत करणें व धर्मशाळा, विहिरी वगैरे बांधणें, इत्यादि इष्टापूर्त कर्मेंही केलीं जात होतीं. परंतु सामान्यतः वैदिक धर्माचें मूळचें यज्ञीय स्वरूप पालटलें होतें व देवदेवतांचे उत्सव अधिक केले जात होते. नाग, बहिरोबा, चामुंडा देवी, इत्यादि क्षुद्र दैवतें व भूतेंखेतें यांचीही पूजा केली जात होती. जारणमारण करण्यांत पारंगत असे अभिचारकही त्या काळीं होते. पातिव्रत्याचें महत्त्व विशेष असून पतिमरणानंतर स्त्रियांनीं सती जाण्याची पद्धत रूढ होती. लोकांचीं घरें हीं सामान्यतः तीन मजली चुनेगच्चीचीं असावींत. पायाळू माणसाच्या डोळयांत अंजन घातलें असतां त्याला पुरलेलें द्रव्य दिसतें अशी समजूत त्या काळीं रूढ होती. यावरून द्रव्य पुरून ठेवण्याचा प्रघात असावा असें दिसतें. चोरी व वाटमारी करणारेही लोक होते. चावडीवर न्याय दिला जात असावा. गुन्हेगारांना लोखंडाच्या बेड्या घातल्या जात असत व कांहीं वेळां त्यांना खोड्यांत अडकविण्याचीही शिक्षा दिली जाई. एकंदर ज्ञानेश्वरकालीन समाज हा सुखवस्तु, वेदविहित कर्में करणारा, सश्रद्ध व पराक्रमी असा असावा असें दिसतें.

**प्रश्न ४ था** :—श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा जीवनवृत्तांत व गुरुपरंपरा थोडक्यांत सांगा.

**जीवनवृत्तांत** :—श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे वडील विठ्ठलपंत हे होत. ते पैठणपासून चार कोसांवर गोदावरी नदीच्या उत्तर तीरावर असलेल्या आपेगांवचे राहणारे व त्या गांवची कुलकर्णीपणाची वृत्ति त्यांच्या घराण्यांत चालत आलेली होती. श्रीक्षेत्र आळंदीचे कुलकर्णी सिधोपंत यांची मुलगी रुक्मिणी

हिच्याबरोबर त्यांचा विवाह झाला होता. कांहीं वर्षें संसार करून ते काशीला गेले व तेथें रामानंदस्वामींकडून त्यांनीं संन्यास ग्रहण केला. मात्र तो घेतांना आपण अविवाहित आहोंत असें त्यांनीं खोटेंच सांगितलें. पुढें रामानंदस्वामी हे स्वतः यात्रा करीत करीत सहजगत्या आळंदीस आले. इतर बायकां-प्रमाणें रुक्मिणीही त्यांच्या दर्शनास गेली असतां तिनें त्यांना नमस्कार करितांच 'पुत्रवती भव' असा स्वामींनीं तिला आशिर्वाद दिला. नंतर त्यांना रुक्मिणीनें सांगितलें कीं, माझा नवरा संन्यासी होण्याकरितां निघून गेला असून त्याचा पत्ताही आम्हांस ठाऊक नाहीं. अधिक चौकशीअंतीं आपण ज्याला संन्यासदीक्षा दिली तोच विठ्ठलपंत हिचा नवरा होय, असें त्यांना समजलें. पुढें काशीस परत गेल्यावर त्यानीं विठ्ठलपंतास पुन्हा 'संसार कर' म्हणून सांगितलें. गुरूच्या आज्ञेमुळें विठ्ठलपंत आळंदीस परत आले व त्यांनीं पुन्हा गृहस्थाश्रम घेतला व त्यानंतर त्यांना श्रीनिवृत्ति, श्रीज्ञानदेव, श्रीसोपान-देव व मुक्ताबाई अशीं चार अपत्यें झालीं. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा जन्म, शके ११९३ म्हणजे सन १२७१ श्रावण वद्य ८, गुरुवार मध्यरात्रीं झाला. संन्यासाश्रमानंतर पुन्हा गृहस्थाश्रमाचा स्वीकार केल्याकारणानें लोकांनीं विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई यांचा बराच छळ केला व त्यांना वाळींत टाकलें. मुलें मोठीं झाल्यानंतर त्यांचें मौंजीबंधन करण्याचा प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहिला व म्हणून त्यांनीं आळंदीकर ब्रह्मवृंदाकडे आपणास पावन करून घेण्याकरितां धांव घेतली; पण ब्रह्मवृंदांनीं त्यांना पावन करून घेण्यास धर्मग्रंथांत आधार नाहीं असें सांगितलें व त्यांनीं देहान्त प्रायःश्चित घ्यावें असा निर्णय दिला. नंतर विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई या दोघांनीं प्रयागक्षेत्रीं जाऊन गंगेला आपले देह अर्पण केले. पुढें हीं सर्व मुलें पैठणास गेलीं व तेथील ब्रह्मवृंदाकडून त्यांनीं शुद्धिपत्र मिळविलें. त्या वेळीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं 'ग्यान्या' रेड्याच्या मुखांतून वेद वदविला. पैठणाहून आळंदीस परत येतांना हीं भावंडें प्रवरातीरावरील नेवासें या गांवीं येऊन राहिलीं. तेथेंच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं भगवद्गीतेवर 'भावार्थदीपिका' अथवा 'ज्ञानेश्वरी' ही टीका शके १२१२ म्हणजे सन १२९० मध्यें लिहिली व तेथील श्रीसच्चिदानंदबाबा हे त्याचे लेखक बनले. नंतर त्यांनीं 'अनुभवामृत' अथवा 'अमृतानुभव' हा स्वतंत्र ग्रंथ श्रीगुरुनिवृत्तिनाथ यांच्या सांगण्या-

वरून लिहिला. पुढें श्रीज्ञानेश्वरमहाराज हे आळंदीस आल्यानंतर योगी चांगदेव वाघावर बसून व हातांत सर्पाचा चाबूक घेऊन त्यांच्या भेटीस आले. त्याबरोबर श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्या भिंतीवर बसले होते त्या भिंतीला चालण्याची त्यांनीं आज्ञा दिली व तिनेंही ती मानली. चांगदेवांचा यामुळें गर्वहरण होऊन ते श्रीज्ञानेश्वरमहाराजांना शरण आले. त्यांना उपदेश म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं ' चांगदेवपासष्टी ' हा ग्रंथ लिहिला. नंतर ते पंढरपुरास आले व तेथें अनेक संतमंडळींची व त्यांची गांठ पडली. पुढें नामदेवराय व इतर संतमंडळींसह श्रीज्ञानेश्वरमहाराज तीर्थयात्रेस निघाले. या यात्रेंत त्यांनीं कऱ्हाड, तेरगांव, आंवढ्या नागनाथ, सातपुडा, धार, उज्जयिनी, प्रयाग, काशी, इंद्रप्रस्थ, गया, अयोध्या, गोकुळवृंदावन, द्वारका, गिरनार, मारवाड, इत्यादि स्थळीं प्रवास केला. शेवटीं ही सर्व मंडळी पंढरपुरास परत आली. तेथें श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपला आळंदीस समाधि घेण्याचा निश्चय जाहीर केला. पुढें पंढरपूरची कार्तिक शुद्ध एकादशीची यात्रा संपल्यावर सर्व संत मंडळीसह श्रीज्ञानेश्वरमहाराज आळंदीस आले व तेथें शके १२१५ सन १२९३, कार्तिक वद्य त्रयोदशी, गुरुवार, मध्यान्हकाल या वेळीं श्रीनिवृत्तिनाथ, नामदेवराय, सोपानदेव व मुक्ताबाई यांच्यासमक्ष त्यांनीं जिवंत समाधि घेतली. (श्रीज्ञानदेवचरित्रांत प्रि. दांडेकर यांनीं श्रीज्ञानेश्वरांचा जन्मशक ११९३ (सन १२७१) व समाधीचा काल शके १२१५ ( सन १२९३ ) असे दिले आहेत. परंतु कै. भिंगारकर आणि कै. पांगारकर यांनीं लिहिलेल्या चरित्रांतून श्रीज्ञानेश्वरांचा जन्मशक ११९७ ( सन १२७५ ) व समाधीचा काल शके १२१८ ( सन १२९६ ) असे दिले आहेत. तात्पर्य, या बाबतींत विद्वान् मंडळींमध्यें दुमत आहे. )

**गुरुपरंपरा :**—श्रीज्ञानेश्वरमहाराज हे नाथसंप्रदायी होते. या संप्रदायाचे आद्य प्रवर्तक आदिनाथ ( श्रीशंकर ) हे होत. आदिनाथ पार्वतीस क्षीरसमुद्राच्या सन्निध भागांत ज्ञानोपदेश करीत असतांना तो उपदेश माशाच्या पोटांत शिरून गुप्तरूपानें भगवान् विष्णूनें ऐकला. श्रीशंकरांना हे जेव्हां कळलें तेव्हां त्यांनीं आपला त्रिशूळ माशावर मारला व त्यामुळें मत्स्यपोटांत असलेल्या विष्णूचा कान फाटला. विष्णु हे मत्स्योदरांत राहिल्यामुळें त्यांचें नांव ' मत्स्येंद्र ' असें पडलें. शंकरांच्या त्रिशूळानें मत्स्येंद्रांचा कान फाटला व तेव्हांपासून नाथपंथीय लोक ' कान फाडून त्यांत कुंडले घालणें ' हें आपल्या

सांप्रदायाचें चिन्ह समजूं लागले व म्हणून या पंथांतील लोकास 'कानफाटे' असें म्हणतात. मत्स्येंद्रनाथ हे गुरुपरंपरेंतील दुसरे पुरुष होत. मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथांना उपदेश दिला. मत्स्येंद्र व गोरक्षनाथ हे या परंपरेंतील मोठे तेजस्वी पुरुष होऊन गेले. यांचे संस्कृत व प्राकृत ग्रंथ प्रसिद्ध आहेत. गोरक्षनाथांनीं गहिनीनाथाला उपदेश दिला. निवृत्तिनाथ हे त्र्यंबकक्षेत्रीं ब्रह्मगिरी पर्वताला प्रदक्षिणा घालीत असतांना वाट चुकले व अंजनी पर्वतावरील गुहेंत त्यांची व श्रीगहिनीनाथांची अचानक गांठ पडली. त्यांनीं निवृत्तिनाथांस उपदेश दिला व 'नाथसांप्रदायांतील रहस्य कलीकडून गिळल्या जाणाऱ्या सर्व जीवांच्या कल्याणाकरतां प्रकट कर' अशी अनुज्ञा दिली. नंतर निवृत्तिनाथांनीं ज्ञानदेवांस उपदेश दिला व आपल्या गुरूंनीं सांगितलेली कामागिरी ज्ञानदेवांना करावयास सांगितली. पुढें ज्ञानेश्वरांनीं गीतेवर 'भावार्थदीपिका अथवा ज्ञानेश्वरी' या नांवाची टीका लिहिली व 'तद्वारा नाथपथांतील रहस्य सर्व जीवांना उपलब्ध करून दिलें. ज्ञानेश्वरांनीं आपले धाकटे बंधु सोपानदेव व बहीण मुक्ताबाई यांना उपदेश दिला.

**प्रश्न ५ वा:**—ज्ञानेश्वरीचें वैशिष्ट्य, ज्ञानेश्वरांची लेखनशैली व ज्ञानेश्वरींतील काव्य ह्यांसंबंधीं थोडक्यांत लिहा.

**ज्ञानेश्वरीचें वैशिष्ट्य:**—श्रीज्ञानेश्वरकालीं मराठी भाषा ही तिच्यांत तात्त्विक अथवा अध्यात्मिक विचार सुव्यवस्थित व स्पष्टतेनें व्यक्त करण्याइतकी प्रगल्भतेला पोहोंचली होती ही गोष्ट ज्ञानेश्वरपूर्वकालीन महानुभावी ग्रंथांवरून स्पष्ट होते. परंतु मराठी भाषा जन्मास आल्यापासून ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी लिहिली त्याकालापर्यंत, काव्यवाङ्मय व तत्त्वज्ञानदृष्ट्या ज्ञानेश्वरीइतका उत्कृष्ट ग्रंथ झालाच नाहीं असें म्हणतां येईल. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वेळीं मराठी भाषा ही जरी जनबोली होती तरी विद्वन्मान्य भाषा संस्कृत असल्यामुळें गीर्वाण भाषेंत ग्रंथ लिहिणें त्या काळीं बहुमानाचें गणलें जात असे. यामुळें ग्रंथ म्हटला म्हणजे तो प्रायः संस्कृत भाषेंतच लिहिला जाई. परंतु ज्ञानेश्वरमहाराजांच्या ठिकाणीं बहुजनसमाजाला अध्यात्मज्ञान अवगत व्हावें अशी तळमळ असल्यामुळें त्यांना संस्कृत भाषा चांगली येत असतांही त्यांनीं आबालसुबोध अशा मराठी भाषेंत गीतेवर ज्ञानेश्वरी नांवाची टीका लिहिली. श्रीज्ञानेश्वरांची महत्त्वाकांक्षा आपला ज्ञानेश्वरी हा मराठी ग्रंथ संस्कृत ग्रंथाप्रमाणेंच चित्ताकर्षक

व्हावा, एवढेंच नव्हे तर त्याच्यापुढें, अमृतरसही फिका वाटावा ( ' माझा मराठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातेंही पैजां जिंके । ऐसी अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ ' ज्ञा.–६–१४ ) अशी असल्यामुळें त्यांनीं तो नादमधुर अक्षरांनीं व वेगवेगळया अलंकारांनीं सजविला आहे. तसेंच गीतेचें रहस्य सामान्य जनतेसही समजावें म्हणून त्यांनीं ज्ञानेश्वरींत गीतेचें व्याख्यान पुराण-पद्धतीला अनुसरून केलें आहे.

**श्रीज्ञानेश्वरांची लेखनशैली** :—श्रीज्ञानेश्वरांनीं गीतार्थ सांगतांना कथा-पद्धतीचें अवलंबन केल्यामुळें संवादरूप असलेला गीताग्रंथ त्यांना अधिक मनोरंजकतेनें सांगतां आला. कथेला नेहमीं विविध स्वभावाचीं पात्रें अथवा व्यक्ति लागतात. गीतेंत श्रीकृष्ण–अर्जुन अशी गुरुशिष्यांची जोडी व धृतराष्ट्र–संजय ही स्वामी–सेवकांची जोडी, अशा दोन जोड्या मुळांतच आहेत, पण ज्ञानेश्वरांनीं त्यांत आणखी त्यांचे गुरु श्रीनिवृत्तिनाथ, इतर श्रोते, संतमंडळी व आपण स्वतः, यांची भर घातली. या भरीमुळें ज्ञानेश्वरांना गुरुस्तुति करण्यास व गुरुमहात्म्य सांगण्यास संपूर्ण संधि मिळाली. श्रीकृष्णार्जुन–संवाद ( म्हणजे अर्जुनाचे प्रश्न अथवा शंका व त्यांस श्रीकृष्णांचीं उत्तरें ) हा कसा खेळी-मेळीनें चालला होता याचें ज्याप्रमाणें यथातथ्य वर्णन ज्ञानेश्वरांनीं सर्व ज्ञानेश्वरींत केलें आहे, त्याचप्रमाणें धृतराष्ट्र हा पुत्रमोहानें ग्रासल्यामुळें त्याच्या-वर श्रीकृष्णार्जुनाच्या संवादाचा कांहींच परिणाम कसा होत नव्हता, परंतु संजय मात्र तो संवाद ऐकून कसा हर्षभरित होत होता, याचें चित्रही ज्ञानेश्वरांनीं फारच उत्तम रेखाटलें आहे. यामुळें गीतातात्पर्यकथनाला चांगलाच उठाव आला आहे. श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या प्रेमाच्या द्वारा ज्ञानेश्वरांनीं जशी कांहीं ठिकाणीं अध्यायसंगति लावलेली आहे तसेंच कांहीं प्रसंगीं झालेलें विषयांतर त्यांनीं श्रोत्यांना मधें आणून आवरतें घेतलें आहे. ज्ञानेश्वरींत पूर्वपक्ष व उत्तरपक्ष करून आपलें मत तिऱ्हाईतपणें न मांडतां, ज्ञानेश्वरांनीं, श्रीकृष्ण जितक्या कळकळीनें अर्जुनाला आत्मज्ञान सांगत होते तितक्याच कळकळीनें भगवंताच्या उपदेशाचा अनुवाद केल्यामुळें ज्ञानेश्वरी हा ग्रंथ हृद्य असा झाला आहे. कथेंत जशीं पात्रें लागतात तसेंच विशेष प्रसंग अथवा घटना लागतात. ' कुरुक्षेत्रावर कौरवपांडवांचीं सैन्यें लढाईस सज्ज होऊन एकमेकांसमोर

उभीं आहेत व आतां लढाईस तोंड लागणार' अशा प्रकारचा गीतेंतील पहिल्या अध्यायांत वर्णलेला प्रसंग व अकराव्या अध्यायांतील विश्वरूपदर्शनाचा प्रसंग, हे दोन प्रसंग जसे ज्ञानेश्वरांना आपली प्रतिभा प्रकट करण्यास उपयोगी पडले तसेच गीतेंतील कांहीं विशिष्ट शब्द अथवा विषय घेऊन त्यांचें वर्णन रूपकांच्या साह्यानें करून ज्ञानेश्वरांनीं गीतेंतील मूळच्या प्रसंगांत आणखी भर टाकली आहे. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांतील 'योगाभ्यासाला स्थान' कसें असावें याचें वर्णन, सातव्या अध्यायांतील 'मायानदीचें वर्णन', पंधराव्या अध्यायांतील 'संसारवृक्षाचें वर्णन' व अठराव्या अध्यायांतील मोक्षरूपी विजयश्री हस्तगत करण्यास संसाररूपी रणांगणांतून निघालेल्या 'साधकरूपी वीराचें वर्णन' इत्यादि वर्णनें हीं ज्ञानेश्वरांनीं आपल्या कल्पनाशक्तीच्या सामर्थ्यावर निर्माण केलेल्या विविध प्रसंगांचीं उदाहरणें होत. अशा विविध प्रसंगांच्या वर्णनांनीं ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथास रमणीयता आणली आहे.

**ज्ञानेश्वरींतील काव्य :—** ज्ञानेश्वरी ही टीका पुराण पद्धतीनें लिहिल्यामुळें ती ज्याप्रमाणें सुगम व मनोरंजक झाली आहे त्याचप्रमाणें तिच्यांत उपमा-दृष्टातादि अलंकारांची विपुलता असल्यामुळें काव्यदृष्टीनेंही ती अनुपम्य आहे. ज्ञानेश्वरींत क्वचित् प्रसंगीं जरी अद्भुत, वीर, हास्य इत्यादि रस आलेले असले तरी ज्ञानेश्वरी हें गीताभाष्य असल्यामुळें तिच्यांतील प्रमुख रस हा शांत रसच आहे. सत्काव्य हें जसें रसात्मक असलें पाहिजे तसेंच परतत्त्वालाही स्पर्श करणारें असावें असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे ('वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व । रसिकत्वीं परतत्त्व । स्पर्शु जैसा ॥' ज्ञा.–१८–३४७). काव्य चिरकाल टिकण्याकरतां त्यांतील प्रतिपाद्य विषय हाही तितकाच महत्त्वाचा व मानवी जीविताचें रहस्य उकलून दाखविणारा असा असावा लागतो. अध्यात्म हा ज्ञानेश्वरींतील विषय आहे व असा गहन विषय, ज्ञानेश्वरांनीं उपमा–दृष्टांतादि काव्यगुणांनीं सजविलेला असल्यामुळें ज्ञानेश्वरीला मराठी वाङ्मयांत अग्रपूजेचा मान प्राप्त झाला आहे. ज्ञानेश्वरींत उपमा, रूपक, दृष्टांत, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति इत्यादि साधे पण अव्याज-मनोहर असे अर्थालंकार विपुल आहेत. अपरिचिताचा परिचय करून देण्यास रूपक, उपमा–दृष्टांतादिकांचा उपयोग फार होतो. ब्रह्म, माया, ईश्वर, अज्ञान,

जीव, सिद्धावस्था, इत्यादि अध्यात्मशास्त्रांतील अपरिचित विषय समजून देण्यास ज्ञानेश्वरांनीं आकाश, सूर्य, मृगजळ, आरसा, स्वप्न, सुवर्ण, समुद्र, नदी, पर्वत, वृक्ष, दीप इत्यादि अशिक्षित माणसालाही माहित असलेले पदार्थ उपमेला घेतल्यामुळें त्यांना ते सहजगत्या समजावून देतां आले. सर्व अर्थालंकारांमध्यें ज्ञानेश्वरींत उपमांचें प्राचुर्य अधिक आहे. कित्येक वेळां ज्ञानेश्वर एकामागून एक अशा अनेक उपमा देतात, त्या वेळेस हा उगीच विस्तार आहे असें वाटतें; परंतु सूक्ष्म विचाराअंतीं प्रत्येक उपमेंतला समर्पकपणा वेगळाच चढता आहे असें दिसून येतें. एकच उपमान ज्ञानेश्वरींत जरी अनेक ठिकाणीं योजिलेलें असलें तरी प्रत्येक वेळीं त्यांतील नवीन साधारणधर्म दाखविला असल्यामुळें तें उपमान नवेंच आहे असें वाटतें. ५ व्या अध्यायांत उपमा ह्या अर्थालंकाराची उदाहरणें पुष्कळ आहेत—ओव्या :—८, १९, ५०, ५२, ९९, १०३, ११०, ११८, १५६, १६५ इत्यादि. ज्ञानी पुरुष हा प्राण्यांच्या ठिकाणीं असलेल्या भेदाला कसा जाणत नाहीं हें पटवून देण्याकरिता ज्ञानेश्वरांनीं ओव्या ९०, ९१ व ९२ यांमध्यें लागोपाठ पांच उपमानें योजिलेलीं आहेत. म्हणून या ओव्या 'मालोपमाचें' उदाहरण होत. ज्ञानेश्वरींत उपमेच्या खालोखाल अनुक्रमें 'रूपक' व 'दृष्टांत' हे अर्थालंकार आलेले आहेत. ज्ञानेश्वरींतील बहुतेक अध्यायांच्या प्रारंभीं असलेल्या नमनांतून 'रूपक' अलंकाराचेंच आधिक्य आहे. पांचव्या अध्यायांत 'भ्रांतिसेज' (४७), 'आत्मयोग' (७१), 'भ्रांतीचें मसैरें' (८३), 'अहंकाराचा अंचलु' (१३२), 'ग्रंथार्थदीप' (१४२), 'साधुहृदयराउळ' (१४२), 'आत्मप्रकाश' (१४५) 'संसारचित्र' (१५६), 'मनोरूपु पटु' (१५६) इत्यादि रूपकें आलेलीं आहेत. ओव्या–(२७), (११३), (११४), (११७) व (१२१) हीं 'दृष्टांत' अलंकाराचीं उदाहरणें होत. उपमा–रूपकाप्रमाणें प्रस्तुत अध्यायांत 'उत्प्रेक्षा' अलंकाराचींही उदाहरणें आहेत— ओव्या–(१३८), (१३९), (१४०), (१७१), (१७२) इत्यादि, ओवी १७१ हें 'सार' अलंकाराचें उदाहरण होय.

अर्थालंकाराप्रमाणें ज्ञानेश्वरींत शब्दालंकारही पुष्कळ आहेत. शब्दालंकाराचे 'श्लेष, अनुप्रास, यमक व चित्र' असे चार मुख्य प्रकार आहेत, ज्ञानेश्वरींत शब्दश्लेषालंकार फार थोडे आहेत व 'चित्रबंध' रचना तींत मुळींच नाहीं; परंतु 'अनुप्रास' व 'यमक' हे शब्दालंकार विपुल आहेत. वाक्यांमध्यें

तींच तींच अक्षरें पुन्हा पुन्हा आलीं असतां 'अनुप्रास' होतो. ओवी १२४ मध्यें ('नातरी गर्भवासादि संकट। कां जन्ममरणींचे कष्ट। हे विसांवेनवीण वाट। वाहवी कवणें॥'–१२४, 'व' हें अक्षर, ओवी १३३ मध्यें ('तिये आलिंगनमेळीं। होय आपेआप कवळीं। तेथ जळ जैसें जळीं। वेगळें न दिसे'॥–१३३) 'ळ' हें अक्षर व ओवी १३५ मध्यें ('ऐसी द्वैताची भाष जाय। मग म्हणों जरी एकचि होय। तरी तेथ साक्षी कवणु आहे। जाणतें जें'॥–१३५) 'च' व 'ज' हीं अक्षरें वारंवार आलीं आहेत. या तीन ओव्या अनुप्रासाचीं उदाहरणें होत. तसेंच ज्ञानेश्वरींत प्रत्येक ओवीच्या पहिल्या तीन चरणांच्या अंतीं एकाक्षरी 'यमक' नियमानें असतें.

काव्य हें प्रभावशाली होण्यास त्यांत अलंकाराप्रमाणेंच प्रसाद-माधुर्यादि गुण असावे लागतात. ज्या गुणामुळें अंतःकरण द्रवतें व आनंदित होतें त्या गुणाला 'माधुर्य' म्हणतात. या गुणाचा परिपोष वाक्यांत सानुस्वार मृदु वर्ण योजिले असतां होतो. अशा प्रकारचीं सानुस्वार मृदु व्यंजनें ज्ञानेश्वरीच्या ओव्यांतून येत असल्यामुळें ज्ञानेश्वरींत 'माधुर्य' हा गुण उत्कटतेनें प्रत्ययास येतो ( जसें ओवी १४ 'आतां गृहादिक आघवें। तें कांहीं न लगे त्यजावें। जे घेतें जाहलें स्वभावें। निःसंगु म्हणऊनि॥', ओवी–३४ व ओवी–३७ ). कठोर व्यंजनांनीं पोखला जाणारा जो 'ओज' गुण, त्याचीं उदाहरणें ज्ञानेश्वरींत आढळतात. ओवी–६७ ('जें मना आकळितां कुवाडें। घाघुसितां बुद्धी नातुडे') व ओवी १२२ ('तयां दुःखियां दुःखाचि जिव्हार। ते विषयकर्दमींचे दर्दुर॥') हीं 'ओज' गुणाचीं उदाहरणें होत. जें काव्य ऐकल्याबरोबर अंतःकरणाला जाऊन भिडतें व ज्याची अर्थप्रतीति सहजगत्या होते अशा काव्यांत 'प्रसाद' हा गुण असतो. ज्ञानेश्वरींत प्रसाद हा गुण ओतप्रोत भरलेला आहे. ( उदाहरणार्थ, ओव्या ११३ ते १२० ). तसेंच थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ व्यक्त करणारी शब्दयोजना ज्ञानेश्वरांची असल्यामुळें त्यांचें काव्य सामर्थ्यवान् व प्रभावी असें झालें आहे.

ज्ञानेश्वरी ही जशी तिच्या काव्यगुणांनीं लोकप्रिय झाली आहे, तसेंच तिच्या मनोरमत्वास तिचा ओवीछंदही कारणीभूत झाला आहे. ज्ञानेश्वरांची प्रत्येक ओवी ही साधारणतः साडेतीन चरणाची असून तिचा शेवटचा अर्धा चरण

बहुधा ४ ते ६ अक्षरांचा असतो व अगदीं क्वचित्प्रसंगीं ७ अक्षरांचा असतो. पहिल्या तीन चरणांपैकीं प्रत्येक चरणांत अक्षरांची संख्या ६ ते १४ पर्यंत असते. प्रत्येक चरणांत ठराविक अक्षरसंख्या नसल्यामुळें ज्ञानेश्वरीचें ओवीवृत्त कंटाळवाणें होत नाहीं, उलट त्यामुळें त्याला वैचित्र्यता आलेली आहे. ज्ञानेश्वरांनीं अक्षररचनेंतही नादमाधुर्य साधल्यामुळें व गेयतेला अनुकूल असा ओवीछंद घेतल्यामुळें ज्ञानेश्वरींतील ओव्या ह्या गीताच्या चालीवरही म्हणतां येणें शक्य झालें आहे.

एवंच सामान्यतः नीरस वाटणारा 'शांतरस' ज्ञानेश्वरांनीं आपल्या ज्ञानेश्वरींत उपमादृष्टांतादि काव्यगुणांनीं व कर्णमधुर शब्दांनीं आळविल्यामुळें, जो ज्ञानेश्वरी नित्य वाचील त्याला तिच्यांतील शांतरसापुढें शृंगाररसही फिका वाटूं लागेल यांत मुळींच शंका नाहीं. अशा प्रकारचा रसाळ ग्रंथ लिहून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं 'मी शृंगाररसावरही ताण करून दाखवीन' अशी केलेली प्रतिज्ञा सार्थ करून दाखविली आहे असेंच म्हणणें प्राप्त होतें ('नुसधीचि शांतिकथा। आणिजेल कीर वाक्पथा। जे शृंगाराच्या माथां। पाय ठेविती ॥' ज्ञा.-१३-११५५ ).

---

## निरूपणांत आलेल्या मुख्य विषयांची प्रश्नोत्तररूपानें सूची

( **टीप**:— उत्तरांतील दिलेले पानांचे आंकडे हे पहिल्या प्रकरणांतील आहेत. )

**प्रश्न १**— अर्जुनाला भगवंताचें बोलणें द्व्यर्थी कां वाटलें ?

**उत्तर**— वास्तविक, भगवंत द्व्यर्थी बोलत नव्हते. भगवंत 'संन्यास' म्हणजे 'सर्व संकल्पांचा त्याग' असें सांगत होते, परंतु अर्जुन 'संन्यास' याचा अर्थ 'सर्व कर्मांचा त्याग' असें समजत होता. अर्जुनाची मनःस्थिति त्या वेळीं मोहामुळें निर्विकार नसल्यामुळें त्याला भगवंताच्या बोलण्यांतील हा सूक्ष्म भेद कळून आला नाहीं ( पान-७८ ).

**प्रश्न २**— प्रेय व श्रेय म्हणजे काय ?

**उत्तर**— ‘ इंद्रियांस प्रिय परंतु परिणामी अहितकारक ’ असें जें ऐहिक सुख त्याला प्रेय म्हणतात व ‘ आरंभीं कष्टप्रद पण परिणामी हितकारक ’ असें जें मोक्षसुख त्याला श्रेय म्हणतात ( पान–८०–८१ ).

**प्रश्न ३**— अर्जुनाचें भाग्य सर्व भक्तांपेक्षां थोर होतें असें कां म्हटलें जातें ?

**उत्तर**— असें म्हणण्याचें कारण, आजपर्यंत कोणालाही न दाखविलेलें असें विश्वरूप भगवंतानें अर्जुनास दाखविलें व गुरुशिष्यांच्या एकांतांत सांगितलें जाणारें जें ब्रह्मज्ञान तें भगवंतानें अर्जुनाला रणांगणावर सांगितलें ( पान–८४–८५ ).

**प्रश्न ४**— दानाचे तीन प्रकार सांगा.

**उत्तर**— याचक मागेल त्यापेक्षां कमी देणें याला ‘ कनिष्ठ दान ’ म्हणतात; याचक मागेल तेवढेंच देणें याला ‘ इच्छेनुसार दान ’ म्हणतात व याचकाचा अधिकार व योग्यता न पाहतां त्यानें मागितल्यापेक्षां अधिक देणें याला ‘ स्वतंत्र दान ’ किंवा ‘ स्वतंत्र औदार्य ’ म्हणतात ( पान–८६ ).

**प्रश्न ५**—ज्ञानमार्गापेक्षां कर्ममार्ग श्रेष्ठ आहे असें भगवंत कां म्हणतात ?

**उत्तर**—कर्ममार्ग हा ज्ञानमार्गापेक्षां आचरण्यास सोपा व सर्वसंग्राहक ( म्ह. ज्ञानी व अज्ञानी या दोहोंस आचरण्यासारखा ) असल्यामुळें भगवंत कर्ममार्ग हा अधिक चांगला आहे असें म्हणतात ( पान ८७–८८ ).

**प्रश्न ६**—‘ संन्यासी ’ या शब्दाची व्याख्या ज्ञानेश्वरांच्या शब्दांत द्या.

**उत्तर**—‘ आणि मी माझें ऐसी आठवण। विसरलें जयाचें अंतःकरण। पार्था तो संन्यासी जाण। निरंतर। ’ ज्ञा.–५–२०.

**प्रश्न ७**—ईशसृष्टि व जीवसृष्टि यांचें स्वरूप सांगा.

**उत्तर**—ईश्वरानें निर्माण केलेली जी बाह्य सृष्टि तिला ‘ ईशसृष्टि ’ म्हणतात व जीवरचित मनोमय जी आंतरसृष्टि तिला ‘ जीवसृष्टि ’ म्हणतात. ईश-सृष्टीची ‘ व्यावहारिक ’ सत्ता आहे व जीवसृष्टीची ‘ प्रातिभासिक ’ सत्ता आहे. जीवसृष्टि सुखःदुखांस हेतु असल्यामुळें तिचीच निवृत्ति मुमुक्षूस अपेक्षणीय आहे ( पान ९६ ).

**प्रश्न ८—** कर्मांचे दोन पाश कोणचे ?

**उत्तर—** कर्तृत्वमद व फलास्वाद हे कर्मांचे दोन पाश आहेत. यांना पाश म्हणण्याचें कारण यांच्यामुळें जीवाला जन्म-मृत्युरूपी दुःखें भोगावीं लागतात ( पान–११९ ).

**प्रश्न ९—** श्रीज्ञानेश्वरमहाराज ' आपण ' हा शब्द प्रायः कोणत्या अर्थानें योजतात ?

**उत्तर—** श्रीज्ञानेश्वरमहाराज ' आपण ' हा शब्द ' आत्मस्वरूप ' या अर्थानें योजतात ( पान–१०१ ).

**प्रश्न १०—** ' नैष्कर्म्य ' कशास म्हणतात ?

**उत्तर—** कर्तृत्वाभिमानविरहित केलेलें जें कर्म त्याला ' नैष्कर्म्य ' म्हणतात ( पान–१२४ ).

**प्रश्न ११—** गीतेंतील साध्य योग कोणचा ?

**उत्तर—** ' आत्मयोग ' हा गीतेंतलि साध्य योग आहे व कर्मयोग, हठ-योग, भक्तियोग व ज्ञानयोग हे सर्व साधनयोग आहेत ( पान–१२९ ).

**प्रश्न १२—** ' आत्मयोग ' म्हणजे काय ?

**उत्तर—** जीवानें आपल्या स्वरूपाला ब्रह्मरूपेंकरून जाणणें ( म्ह. ' मी ब्रह्म आहें ' अशा दृढ अपरोक्ष अनुभवावर येणें ) ह्याला ' आत्मयोग ' म्हणतात ( पान–१२९ ).

**प्रश्न १३—** कर्मांचें त्रिविध फल कोणचें ?

**उत्तर—** अनिष्ट ( म्ह. पशुपक्ष्यादि नरकयोनि ), इष्ट ( म्ह. स्वर्गादि लोक ) व मिश्र ( मनुष्य लोक ) असें कर्मांचें त्रिविध फल आहे ( पान–१३० ).

**प्रश्न १४—** ' अपर ' व ' पर ' वैराग्य कशाला म्हणतात ?

**उत्तर—** ज्या वैराग्यांत विषय हे प्रतीत होतात, परंतु त्यांच्या ठिकाणीं दोषदर्शन झाल्यामुळें त्यांचा त्याग केला जातो त्याला ' अपर ' वैराग्य म्हणतात व ज्या वैराग्यांत आत्म्यैक्यानुभवामुळें विषय हे विषयरूपानें प्रतीत न होतां आत्मरूपानें प्रतीत होतात त्याला ' पर ' वैराग्य म्हणतात.

**प्रश्न १५—** ' योगनिद्रा ' कशाला म्हणतात ?

**उत्तर—** ब्रह्माच्या सहजस्वरूपस्थितीला ' योगनिद्रा ' म्हणतात ( पान–१३७ ).

**प्रश्न १६**— ‘ समतादृष्टि ’ किंवा ‘ समदर्शन ’ कशानें प्राप्त होतें ?

**उत्तर**— ज्या वेळेस जीव हा ‘ मी ब्रह्म आहें ’ अशा अनुभवावर येतो त्या वेळेस त्याला ‘ समदृष्टि ’ प्राप्त होते ( पान–१५४ ).

**प्रश्न १७**— ‘ समदर्शन ’ प्राप्त झालें असतां काय लाभ होतो ?

**उत्तर**— शोक व कामना नाहींशा होतात.

**प्रश्न १८**— ज्ञानी पुरुषांचे ठिकाणीं प्राणिमात्राविषयीं भेद नसतो याचा अर्थ काय ?

**उत्तर**— याचा अर्थ ज्ञानी पुरुष प्राणिमात्रांचे ठिकाणीं असलेले गुणदोष पाहत नाहीं तर तो त्या सर्वांना समदृष्टीनें म्हणजे आत्मदृष्टीनें लेखतो ( पान १५१ ).

**प्रश्न १९**— ‘ द्वैतप्रतीति ’ किंवा ‘ विश्वाभास ’ कोणाला प्रतीत होतो ?

**उत्तर**— ज्यांच्या ठिकाणीं अज्ञानजन्य देहतादात्म्य असतें त्यांना ‘ द्वैत-प्रतीति ’ किंवा ‘ विश्वाभास ’ प्रतीत होतो.

**प्रश्न २०**— आत्मा हा आपण आपल्याला कां विषय होऊं शकत नाहीं ?

**उत्तर**— आत्मवस्तु ही एकच एक असल्यानें ती स्वतःची स्वतःला विषय होण्याइतकीही भिन्नता तिच्या ठिकाणीं असूं शकत नाहीं, म्हणून आत्मा हा आपण आपल्याला विषय होत नाहीं.

**प्रश्न २१**—आत्मानंद सेवन करीत असतांना त्या ठिकाणीं कोणचीही क्रिया कां संभवत नाहीं ?

**उत्तर**—आत्मसुख हें वेगळेपणानें भोगतां येत नसल्यामुळें तें सेवन करीत असतांना त्या ठिकाणीं कोणतीही क्रिया संभवत नाहीं व मनही आत्म्याशीं समरस होऊन जातें.

**प्रश्न २२**—विषयानंद व आत्मानंद या दोन आनंदांत जातीचा फरक कसा आहे तो सांगा.

**उत्तर**—विषयानंद हा वृत्तिजन्य म्हणून मर्यादित, संयोगजन्य म्हणून विनाशी व दुःखमिश्रित असा आहे; ह्याच्याउलट आत्मानंद हा वृत्तिशून्य अवस्थेत प्राप्त होणारा म्हणून विपुल व द्वैतांत प्राप्त न होणारा म्हणून अविनाशी व केवलसुखमात्र असा आहे ( पान १६१ ).

**प्रश्न २३**— जीवत्वदशा केव्हांपासून सुरू होते ?

**उत्तर**— ज्या वेळीं आत्मा हा अज्ञानाला वश होतो, आपल्या मूळच्या स्वरूपाला विसरतो व देहाशीं तादात्म्य करतो त्या वेळीं जीवत्वदशेला प्रारंभ होतो. ( पान–१६३ ).

**प्रश्न २४**— गीतेमध्यें संसाराचा विचार किती प्रकारांनीं सांगितला आहे ?

**उत्तर**— गीतेमध्यें संसाराचा विचार, परा–अपरा–प्रकृतीच्या रूपानें, क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या रूपानें, प्रकृतिपुरुषाच्या रूपानें, अश्वत्थाच्या रूपकानें व क्षराक्षर पुरुषाच्या रूपानें सांगितलेला आहे.

---

॥ ॐ ॥

# प्रकरण पांचवें

## ओव्या व अभंगांची सूची

**टीप** :— ५ व्या अध्यायाच्या निरूपणात प्रमाणें म्हणून ज्या ओव्या व अभंगांतील कडवीं दिलेलीं आहेत त्यांची सूची प्रस्तुत प्रकरणांत दिली आहे. ह्या ओव्या व हे अभंग पाठ केल्यास त्यांचा उपयोग निरूपणकारांस बराच होईल अशी आशा आहे.

### ज्ञानेश्वरी ( बंकटस्वामी–प्रत )

**अध्याय १ ला** :— ५३, ५६, ५७, ६२, ६९, ७७, ८३, १४१, १४२, १७९.

**अध्याय २ रा** :— १२०, १२६, १२७, १३३, १५०, १५९, १६७, १७६, २३१, २३३, २५५, २९१, २९२, २९९, ३०९, ३११, ३१२, ३३१, ३६३.

**अध्याय ३ रा** :— ३, १७, १८, १९, ३१, ४५, ६४, ६५, ६८, ७६, ८६, ८७, १३१, १५६, १७२, १७३, १७७, १७८, १८१, १८२, १८३, २०१, २०८, २१२, २१४, २४०, २४१, २५३, २५४, २५६, २५७, २५८.

**अध्याय ४ था** :— ५, ७ ते १५, १९, २५, ३३, ४९, ५८, ६४, ७१, ९३, ९४, १०२, ११२, ११५, १६६, १८९, १९०, १९१, २०९, २११, २१४, २१८, २२५.

**अध्याय ५ वा** :— १६, १७, २२, २५, ३४, ३६, ३८, ३९, ५२, ६२, ६६, ७६, ९५, १०५, १०६, १०८, ११०, ११२, १३१, १३६, १४४, १५१.

**अध्याय ६ वा** :— २२, २३, ३८, ४०, ४१, ५५, ५६, ६२, ६३, ६७, ६८, ६९, ७१, ७४, ८१, ८२, ८४, ८८, ८९, ९७, १०४, १०५,

१२१, १२७, ३०९, ३११, ३२०, ३६६, ३६७, ३६८, ३७०, ३७१, ३७२, ३७५, ३७६, ३९९, ४०८, ४०९, ४११ ते ४१७, ४२०, ४२२, ४७१, ४९१.

**अध्याय ७ वा:**—५, ९, ६०, ६१, ६३, ६४, ७३, १०७, ११८, १२७ ते १३१, १३८, १४८, १६५, १६६, १८२.

**अध्याय ८ वा:**—८, १८, १९, २१, ३१, ५५, ६३, ८३, ८५, ९०, १११, ११२, १२४, १४९, १८०, १९०, २००, २४८, २५९, २६६.

**अध्याय ९ वा:**—१, ४, ३६, ३८, ४०, ४९, ५८, ६०, ७१, ८२, ९७, १२०, १२१, १२६, १२८, १२९, १६५ ते १७७, २०९, २२०, २५८, २८५, ३०७, ३०९, ३१०, ३१३, ३१५, ३२८, ३३१, ३६३, ३६५, ३७३ ते ३७७, ४०३, ४०५, ४११, ४५८, ४७५, ४९८, ४९९, ५०२, ५०३, ५०९ ते ५१२, ५१४, ५१६.

**अध्याय १० वा:**—१७, ४३, ७३, ७७, १२०, १२५, १२६, १८०, ३३२.

**अध्याय ११ वा:**—९६, ९८ ते १०७, १६९, २७२, ३२१, ६९४.

**अध्याय १२ वा:**—१, ४१, १०१, १०६, ११३, १४९, १६८, १९२, १९८, २०३, २०९, २१३, २१९, २२०, २३०.

**अध्याय १३**— ८६, ८८, १०८, ११०, ११३, ११४, ११५, १३३, १६२ ते १६७, १७८, २९८, ३२८, ३२९, ३४३, ३५१, ४७७, ४७८, ४८५, ५१३, ५२४, ५२६, ५३९, ५४०, ५८९, ५९८, ६२८, ६३३, ७०६, ७०७, ७४६, ७७७, ८७२, ८७३, ८९५, ८९८, ९००, ९२९, ९४८, ९४९, ९६५ ते ९६७, १०११, १०३१, १०३६, १०३७, १०५२, १०६४, १०६७, १०७३, १०७८, १०८७, ११०२ १११२, ११२८, ११५५, ११५८, ११६०.

**अध्याय १४ वा:**— ५, ९, २३, ४२, ५२, ५३, ५९, ६३, ७१, ७२, ७७, ७९, १२२, १२७, २०६, २०९, २९३, २९६, २९७, ३००, ३१०, ३११, ३१४, ३१८, ३२८, ३४२, ३४९, ३६६, ३८९, ४०१.

**अध्याय १५ वा:**— १६, १७, २२, २३, ३०, ३५, ३८, ३९, ४६, ४७, ६७, ७०, ७४, १६१, २२२, २२३, २४८, २४९, २५४, २५६,

२६७ ते २७४, २७६, २८७, २८८, २९०, २९२, २९६, २९८, ३००, ३०७, ३१२, ३१६, ३१८, ३२०, ३४२, ३४३, ३४७, ३५३, ३५४, ४१५, ४१९, ४२२, ४२३, ४२४, ४४०, ४४१, ४४८, ४६७ ते ४७०, ४९१, ४९२, ५१७, ५४४, ५४५, ५५४, ५५९, ५६२, ५७५, ५७६.

**अध्याय १६ वा:**— १, १२, ३६, ३७, ११०, ११५, १३६, १६६, २२८, ४३४.

**अध्याय १७ वा:**— १५, ८६, १२९, १३४, २३३, २३४, ३७१, ४२५, ४२६.

**अध्याय १८ वा:**— ९, १२, ४८, ७८, १०३, १६०, १६७, १७४, १७६, २०५, २११, २२९, २३३, २३४, २३५, २३९, २६३, ३०६, ३१२, ३२५, ४००, ४०३ ते ४०५, ४०९, ४१०, ४२०, ४२२, ४३१, ४४२, ४४३, ४४७, ४४८, ४५५, ४५२, ५४२, ६११, ७५१, ७९१, ७९२ ते ७९५, ८००, ८०४, ८०६, ८३३ ते ८३५, ९१८, ९१९, ९५८, ९७१, ९७२, ९७८, ९८१, ९८३, ९८८, ९८९, ९९२ ते ९९५, ९९७, १००५, १०११, १०३३, १०३४, १०९६, १०९७, १०९८, १२५५, १२५६, १३१५, १३१८, १३५६, १३७८, १४३७, १४५७, १५०८, १६३२, १६३६, १६७३, १७४८, १७५१, १७६१, १७९४.

## अमृतानुभव ( सुबंध–प्रत )

**प्रकरण २ रें:**—१, ५. **प्रकरण ४ थें:**—९, १७, ३१, ३३, ३४. **प्रकरण ५ वें:**—५, १७, १८, ३४, ३९, ६३. **प्रकरण ६ वें:**—३४, ३८, १०३. **प्रकरण ७ वें:**—११०, १११, ११३, १३६, १५७, १६३, २४२, २८९. **प्रकरण ८ वें:**—१, ८. **प्रकरण ९ वें:**—१३, २५, ५५. **प्रकरण १० वें:**—१०, १५.

## एकनाथी भागवत ( माधव कृष्ण देशमुख–प्रत )

**अध्याय २ रा:**—७७, ५७२, ५७३. **अध्याय ३ रा:**—१३१, ३८०. **अध्याय ४ था:**—१२३, १२८ ते १३३. **अध्याय ९ वा:**—१५५, १५६, ३१५ ते ३१८, ३५१, ३६७. **अध्याय १० वा:**—२४७, ३०९ ते ३११, ३१८, ३१९, ४२८ ते ४३५. **अध्याय ११ वा:**—२४३, ४३१, ७०५,

१०८. **अध्याय १३ वा :**—२७५, २७६, २७७, ३७८, ३७९, ४०९, ४१३, ४३२, ४३३ ते ४३५, ४३७, ४९९, ५९२. **अध्याय १४ वा :**— १७०, १७१, २०१. **अध्याय १५ वा :**—८६. **अध्याय १९ वा :**—१२३. **अध्याय २२ वा :**—४५२ ते ४५४. **अध्याय २३ वा :**—२००, २०१, ६६४ ते ६६८. **अध्याय २५ वा :**—३५३, ३५४. **अध्याय २८ वा :**—२२४. **अध्याय २९ वा :**—२९४, २९५, ३०६, ४५२ ते ४६०. **श्रीएकनाथकृत आनंदलहरी :**—९४ ते ९६. **हस्तामलक :**—१३८, १३९, १४५, १४६, १६६, १६७, २७५, २७७, ३२६, ३७१.

---

# अभंगांची सूची

[ **टीप :**— प्रस्तुत अध्यायाच्या निरूपणांत प्रमाणें म्हणून जीं अभंगांचीं कडवीं दिलेलीं आहेत त्यांची सूची या ठिकाणीं दिलेली आहे. निरूपणांतील ज्या पानावर जें कडवें आलेलें आहे त्या पानाचा आंकडा त्याच कडव्याच्या मागें ‘ पृष्ठ ’ या शब्दाखालीं दिलेला आहे. तसेंच ज्या विशिष्ट गाथ्याच्या प्रतींतून ज्या अभंगाचें कडवें उद्धृत केलेलें आहे त्या अभंगाचा आंकडा ‘ अभंगांक ’ या शब्दाखालीं दिला आहे व त्याच अभंगाचा आरंभ अभंगांकापुढें दिला आहे. यामुळें कोणच्याही प्रकाशकाच्या गाथ्यांत हीं कडवीं शोधून काढणें वाचकांस सुलभ होईल. ]

### श्रीतुकारामाची गाथा ( पांडुरंग जावजी–निर्णयसागर प्रेस )

| पृष्ठ | अभंगाचीं कडवीं | अभंगांक | अभंगारंभ |
|---|---|---|---|
| १८२ | अखंड न खंडे अभंग न भंगे । | २२४३ | हित तें हें एक |
| ९१ | अचळ न चळे ऐसें झालें मन । | १७०० | अचळ न चळे |
| १७८ | अनुहातीं गुंतला नेणे बाह्य रंग । | ३६०२ | अनुहातीं गुंतला |
| ८१ | अवघड कोणी न करी सांगता । | २७८५ | यमपुरी त्यांनीं |
| १५१ | अवघी एकाचीच वीण । | ३६७९ | देव आड झाला |
| १९४ | असाध्य तें साध्य करितां सायास । | ३१३६ | साधूनी बचनाग |
| ११० | असो ऐसा कोठें आठवही नाहीं । | ३५५२ | सदा नामघोष |

| | | | |
|---|---|---|---|
| २०० | सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला । | १३४८ | सत्य तूं सत्य तूं |
| ८६ | सत्य माना रे सकळ । | २२७२ | गोड झालें पोट |
| २०० | सत्य साच खरें । नाम विठोबाचें बेरें । | २२८१ | सत्य साच खरें |
| १८२ | समाधीचें सुख सांडा ओवाळून । | २१९६ | समाधीचें सुख |
| १५२ | संरी चिताक भोंवरी । | ३४९७ | रज्जु धरूनियां |
| १८३ | सर्व सुख ल्यालों सर्व अलंकार । | ३५५२ | सदा नामघोष |
| १७८ | सहज मी आंधळा गा । | ३५१ | सहज मी आंधळा |
| ११२ | साक्षत्वें या जालों गुणाचा देखणा । | ३४९९ | साक्षत्वें या जालों |
| १९१ | सुखी मी निजलों गा । | ३५१ | सहज मी आंधळा |
| १०८ | सुपात्रीं सर्व भाव । मी तो सर्व वासुदेव । | ३४५ | राम राम दोनी |
| १४० | सूर्य नाहीं जागें करीत या जना । | १९८० | न लगे चंदना |
| १४२ | सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । | ७१० | तुज करितां नव्हे |
| ९८ | संकल्पारूढ तें पराधीन जिणें । | ३२३० | तीर्थांचिये पंथें |
| १८२ | संतांचा उदीम उपदेशाची पेठ । | २०३८ | संतांचिया गांवीं |
| १८४ | हरी तैसे हरीचे दास । | ४५१ | हरी तैसे हरीचे |
| १४४ | होईल जाला अंगें देव जो आपण । | ३८०१ | होईल जाला अंगें |
| १७२ | क्षण एक तो नाहीं विसावा । | ४६३ | कोण सुख धरोनी |

## श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गाथा ( तात्या नेमिनाथ पांगळ )

| | | | |
|---|---|---|---|
| १३६ | अव्यक्त निराकार नाहीं त्या आकार । | ५५० | त्रिगुण असार |
| ९० | आलियाचा संतोष गेलियाची हानी । | ११३ | आलियाचा संतोष |
| १९१ | उघडे परब्रह्म सद्गुरूची मूर्ती । | ९२१ | सद्गुरुवांचूनी |
| ९३ | उपजोनि संसारीं आपुला आपण वैरी । | १२० | उपजोनि संसारीं |
| १७७ | कामक्रोधलोभ घेऊनियां संगें । | ६३२ | चोरांचिया संगें |
| ९६ | कां सांडिसी गृहाश्रम । | ११ | कां सांडिसी |
| १३४ | कृपाकटाक्षें न्याहाळिलें । | ३५३ | संत भेटती |
| १६५ | तो हा रे श्रीहरी पाहिला डोळेभरी । | ७९० | सत्यज्ञानानंत |
| ८६ | दान दे गा उदार श्रेष्ठा । | ४२६ | अलक्षलक्षीं मी |
| ८६ | देव देउनी उदार भक्तां देतो अमरपदें । | ३३७ | ॐ नमो भगवते |

**एकनाथांची गाथा** ( त्र्यं. ह. आवटे )

| | |
|---|---|
| १५६ दिसती जनीं वनीं प्रत्यक्ष लोचनीं । | ११२२ हरि बोला हरि |
| १३४ धर्म जागो गुरुमहिमा देहीं दाविला देव । | ३७१३ मी माझे कल्पनेनें |
| १५३ ब्रह्मा मुंगी धरुनी तुझें स्वरूप सांवळें । | ३२८७ अगाध तुझी |
| १८१ वाद निमाला शब्द खुंटला । | ३७२५ जनीं वनीं एका |
| १६७ विषय सेवितां गा जन्ममरणाचा बाधु । | ३७०६ विषय सेवितां |
| २०४ सख्यत्व स्वजाती सोयरा श्रीपती । | ३२८८ नवविधा भक्ति |
| २०४ सख्यत्वें परपार पावला अर्जुन । | ३२८९ हरिकथा श्रवण |

## नामदेवांची गाथा ( त्र्यं. ह. आवटे )

| | |
|---|---|
| २०३ आंधळे पांगुळे मुके अनर्गळ । | ६५५ रुक्माई म्हणे |
| १४० तो नाहीं ऐसा ठाव उरला कवण । | ६२२ ज्ञानदेव म्हणे |
| १३३ पंच महापातकी विश्वासघातकी । | ९७२ म्हणे पुंडलीक |
| ११६ बाबा अहंकार निर्शी घनदाट । | २२२५ बाबा अहंकार |
| १८४ ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले । | १४०३ ब्रह्ममूर्ति संत |
| १४१ यादवांचा पोर एक गोप्या भला । | २२४५ नव्हे तोंचि कैसें |
| १३४ ज्ञानदेव म्हणे बोलेरे ऋग्वेद । | ६९३ ऐकोनी ऐसीं |

## निळोबांची गाथा ( वि. न. जोग )

| | |
|---|---|
| १६७ घोळण्या नांव लक्ष्मुमण । | ६६९ लुगड्या नांव |
| १३३ धरिती ज्या हातीं संत कृपावंत । | १०१७ धरिती ज्या |
| १६० नित्यानंदा पुढें आनंद तो कोण | ११६६ नित्यानंदा पुढें |
| ९१ निळा म्हणे विरक्त देहीं । | १००२ तेचि संत तेचि |
| १३४ पशुमुखे वेदाच्या श्रुती । | १०३० पशुमुखे वेदा |
| १३९ येकलें न कंठेचि म्हणोनिया येणें । | ११७४ येकलें न कंठेचि |
| १५६ हांसती रुसती शिव्या देती एका । | १२७ प्रकरण ३ चांगदेव-चरित्र |

## श्रीज्ञानेश्वरी अध्याय पांचवा

# शब्दकोश

(शब्दापुढील आंकडा ओवीचा आहे)

### अ

अंकुर—कोंभ. १३८
अखंडित—निरंतर, सतत. २१
अगत्य—अवश्य. १२१
अंचल—पडदा. १३३
अचुंबित—बिनचूक, समग्र. ७
अच्युत—नाशरहित (कृष्ण). १०२
अंतर—अंतःकरण. १९
 आंतली बाजू. १२१
अतिप्रसंग—विषयांतर. ६६
अतिरस—अतिशयपणा. २
अद्भुतपणा—अपूर्वता. १७०
अद्वय—द्वैतविरहित. ९६
अधिष्ठान—आश्रय, (ब्रह्म) चैतन्य. ४८
अनायासें—कष्टावांचून. १७
अनुकार—स्वरूप, प्रतिमा. १३८
अनुष्ठणें—आचरणें. १६९
अनुसारा—मार्ग. १६५
अपान—गुदस्थानचा वायु. १५३
अपार—अमर्याद. १०६
अभिन्न—एकरूप, भेदरहित. १८
अभिलाष—इच्छा. ७२
अभोळ—दुर्बल, अशक्त. १६६
अमूर्त—निराकार (ब्रह्म). ३९
अर्थ—(इंद्रियांचा) विषय. ४८
अलंकारले—सुशोभित केलेले. १३९
अवकाश—पोकळी. ३०
अवधारणें—ऐकणें. ८२
अवसरोचित—समयोचित,
 यथाकाल. ४२
अवस्था—स्थिति. १३२
अशेष—संपूर्ण, सर्व. ४०
अहर्निशीं—रात्रंदिवस. ८७
अक्षर—अविनाशी (ब्रह्म). १४६
अज्ञान—अडाणी, अजाणता. २७

### आ

आकळणें—व्यापला जाणें. ४२
 जाणणें. ६७
आंगिक—अवयव. १४०
आघवें—सर्व, संपूर्ण. २८
आठवण—स्मृति, जाणीव. २०
आंठी—मिठी. १३२
आणिक—दुसरा. ४
आतप—ऊन. ११४
आतुडणें—सांपडणें. ६७
आत्मज—पुत्र, मुलगा. ९३

आत्मविद्–आत्मज्ञानी. १४९
आत्माराम–ब्रह्मनिष्ठ. १३६
आथिला–संपन्न. ७१
आदि–मूळचा. ८४
आनान–भिन्नभिन्न, निरनिराळे. २७
आप–स्वाधीन. १२
आपणपें–स्वतः, स्वतःला. १४५
आपेंआप–सहज, आपसूक. १३३
आपैसी–आपोआप, सहज. १५५
आमिष–उंडी. ११८
आर्त–इच्छा, उत्कंठा. ११
आवडणें–दिसणें, भासणें. ३५
आहार–अन्न. ४३
आळविणें–हांक मारणें, बोलाविणें. ५८
आलुकैलें–भुकेलेलें. ११०

इ

इतर–दुसरा. ९३

उ

उकल–उलगडा. ६
उक्त–बोललेलें, सांगितलें. १७८
उखा–उषःकाल, अरुणोदय. १४३
उजगरा–जागृति. ५४
उजळणें–लावणें. १४२
उठणें–उत्पन्न होणें. १३२
उदो–उदय. ८५
उद्देश–अभिप्राय. १६०
उपाइलें–उत्कृष्ट. १०८
उपाधि–संसार, प्रपंच. २४
उपेग–उपयोग. १७७
उपेक्षणें–अव्हेरणें, त्याग करणें. ७३
उभारणें–रचणें, निर्माण करणें. ७८
उवाइणें–प्रसन्न होणें. १६२
उवाइला–अभिप्राय, आदेश. १४३

ए

एकंदरें–एकवट. १७१
एकदेशी–अल्पव्यापी. ३६
एकनिष्ठ–निश्चयात्मक, एकार्थक. ४
एकसरा–एकदम. १४४
एकसार–एकतत्त्व. ४

औ

औदार्य–उदारपणा. १२

क

कंद–कांदा, गड्डा. ११५
कर्दम–चिखल. १२२
कर्मबंध–कर्मपाश. ५०
कल्लोळ–लाट. १००
कवण–कोण. १०९
कवळ–घास. ११८
कवळी–मिठी, आलिंगन. १३३
कळासणें–बाधला जाणें. ७२
कहीं–कधींही. ३३
काज–कारण, हेतु. ५९
कारण–साध्य. १४९
कारुण्य–कृपा. १७१
काळिमा–अंधार, काळोख. ८६
किरीटी–अर्जुन. ११९
कीर–खरोखर. १८
कुंतीसुत–अर्जुन. १५

कुमुद—चंद्रविकासी कमळ. १०७
कुरुठा—घर. १२
कुवाडें—कठीण. ६७
केवीं—कसें. २६
क्रमणें—ओलांडणें. १५९

ख

खरांटा—दुष्काळ, पूर्ण अभाव. ११२
खुंटणें—थांबणें. ३७
खुण—मर्म, तत्त्व. १३६
खेचर—पिशाच. ९९
खेळणें—क्रीडा करणें. ८१

ग

गगन—( मूर्ध्न्या— ) आकाश. १५५
गज—हत्ती. ९३
गमणें—वाटणें ; दिसणें. १७५
गमिजे—पाविजे. २९
गा—अरे. २८
गांठी—गांठ, भेट. १५२
गाढ—दृढ, घट्ट. १३२
गिरिवर—मोठा पर्वत. १०३
गिंवसणें—आच्छादन करणें, गुंडाळणें. शोधणें ( ८८ ). २३
गुंतणें—गुंग होणें. १३७
गुरु—श्रेष्ठ, थोर. ९४
गृह—घर. २२
गोचर—दृश्य, प्रत्यक्ष. ९९
गोठी—गोष्ट. ८०
गोमटें—चांगलें, गोड. ११२
गोसावी—धनी, स्वामी. १३
ग्राम—गांव. १०५

घ

घाघुसणें—शोधणें. ६७
घ्राण—नाक. ४२

च

चमत्कार—आश्चर्य. १३
चराचर—सृष्टि, जगत् ८२
चांग—चांगला. ६५
चाड—इच्छा. ३
चिन्ह—लक्षण. १८
चिळसी—किळस. १२१
चुंबणें—चोखणें, सेवन करणें. १०७
चेइणें—जागें होणें. ४७
चेतणें—जागें होणें. १४८
चेष्टा—कर्म. ५२
चेष्टित—कर्म. ५७
चोखट—शुद्ध. १०७
चोखाळणें—शुद्ध होणें. ६२

ज

जल्पणें—बडबडणें. ११५
जळचर—मत्स्यादिक. १२२
जाण—जाणता. १६
जाणतें—जाणणारें. १३५
जिव्हार—जीवन. १२२

झ

झकवणें—फसवणें. १०९
झणें—'नको' या अर्थी अव्यय. १२७

ठ

ठकणें–राहाणें. ८०
ठाकणें–प्राप्त होणें. १११

त

तत्त्वता–वस्तुतः १०४
तनु–शरीर. ३९
तुटणें–नाहींसें होणें. ८३
तुष–कोंडा, तूस. ११०
तृषा–तहान. १११
त्यजणें–टाकणें. ४३
त्रिमाळिक–तीन मजली. ११४

द

दंडणें–निग्रह करणें, शिक्षा करणें. ९७
दर्दुर–बेडूक. १२२
दवडणें–घालविणें. १५१
दळ–पाकळी, पान. १०७
दळवाडें–समुदाय. ७८
दक्षिण–उजवा. १५३
दादुला–समर्थ पुरुष. ८१
दिठी–दृष्टि. ११९
दिठें–पाहिलेलें, अनुभविलेलें. ११२
दिवाळी–दिव्यांची ओळ, झगझगीत प्रकाश, लखलखाट. ८६
दीप–दिवा. ४९
दैन्य–दारिद्य. ९०
दैव–भाग्य. ९०
दोष–पाप. १२५
द्विज–ब्राह्मण. ९३
द्व्यर्थ–दुटप्पी. ३

ध

धनुर्धर–अर्जुन. ५४
धरणें–निवारणें. ११४
धवळार–चुनेगची घर. ११४
धुरे–पुढें, अग्रभागीं. ६१
धेनु–गाय. ९४
ध्वनि–अभिप्राय. १७५
ध्वनित–संदिग्ध. ५

न

नवल–आश्चर्य. ४१
नातरी–अथवा. ९४
नाथिलें–नसलेलें, मिथ्या १२६
नाम–नांव. १०१
निकें–चांगलें. १०९
निखळ–संपूर्ण. १३७
निदसुरें–अज्ञान. ९८
निद्रा–झोंप. ४३
निपजणें–उत्पन्न होणें. ५५
निभ्रांत–निःसंशय. ११८
निमथा–शिखर. ३२
निमिषोन्निमिष–पापण्यांची उघडझांप. ४५
नियम–मनोनिग्रह. १५९
निरंतर–कायमचा. २०
निरर्थक–अर्थशून्य, निष्फळ. १२३
निराश–निरिच्छ. १२८
निराळ–आकाश. १४१
निराळीं–आधारावांचून. १४१

निरुतें—खरोखर, निश्चयात्मक चांगलें ( ७० ) ६०
निरूपिणें—सांगणें. २
निर्वाण—मोक्ष. १४९
निर्वाळा—शुद्ध. ७
निर्व्यापार—क्रियाशून्य. ७६
निर्लेप—शुद्ध, उपाधिरहित. १६०
निवडणें—वेगळें करणें. १५४
निश्चित—निश्चयानें. १४८
निःशेष—मुळींच. १३
निःसंगता—अलिप्तता. ९७
निःसंशय—विकल्परहित. १४७
निःसीम—अमर्याद. १४६
नेणता—अल्पज्ञ, अजाण. ३
नेत्र—डोळा. ४१
नैष्कर्म्य—कर्मरहित स्थितीस प्राप्त झालेला पुरुष. ६१
न्याहाळणें—पाहणें. ११९

**प**

पंक—चिखल. १२१
पट—पडदा. १५६
पडताळा—अनुवाद. १६७
पढियंता—आवडता. १७०
पद्मपत्र—कमलाचें पान. ५०
परम—श्रेष्ठ. १४६
परमार्थ—तत्त्वज्ञान, ब्रह्मज्ञान ५
परायण—तल्लीन, तत्पर. ८७
परिमळ—वास. ४२
परिसणें—ऐकणें. ६५
परिहरणें—टाळणें, टाकणें. ४३
पवन—वारा. १००
पव्हणें—पोहणें. १६५
पांग—पंगिस्तपणा. ६५
पांचभौतिक—पांच भूतांचें. ५३
पाठीमोरी—पाठीमागें, माघारीं. १५२
पांडुसुत—पांडूचा मुलगा ( अर्जुन ). १०४
पातणें—प्राप्त होणें. १०३
पात्र—( नदीचें ) पात्र, भांडें. ६४
पारुखणें—स्थिर करणें. थांबणें. ( १५५ ). १५२
पार्थ—अर्जुन. १
पासीं—जवळ. ८०
पाहणें—लक्ष देणें, विचार करणें, ऐकणें. १०२
पाहलें—उजाडलें ३१
पाळणें—पालन करणें. ८२
पिकणें—फलद्रूप होणें. १४७
पिशाच—भूत, भुतानें झपाटलेला मनुष्य. ५७
पीडित—त्रस्त, व्याकुळ. १११
पुढारीं—पुढें. १७९
पुरतें—सांग, संपूर्ण. ७०
पुसणें—विचारणें. १५०
पूय—पू. १२१
पोखवणें—वाढविणें. २
प्रगटणें—दिसणें. ८३
प्रतिभा—प्रतिबिंब. १५६

मीन–मासा. ११८
मुकुळणें–आवरून घेणें. १४२
मुद्दल–मुळांतच. १५७
मूर्ति–शरीर. ८१
मूषक–उंदीर. ११७
मृग–हरिण. १११
मृत्युकथा–मरणाची वार्ता. ९१
मेळ–संयोग (८१), संगति. १००
संबंध ( १३३ ).
मैळणें–मळणें. ८१
मोडणें–भग्न होणें. ७८
मोहित–भुललेला, वेडा झालेला. १७५

य

यम–इंद्रियदमन. १५९
येर–दुसरा. १४
योगनिद्रा–सहजस्वरूपस्थिति. ७८
योनि–( प्राण्यांच्या ) जाति. १२३

र

रंक–गरीब, दरिद्री. ११०
रचणें–उत्पन्न करणें. ७६
रंजणें–रंगणें. ११०
रतणें–रममाण होणें. १४१
रथ्योदक–रस्त्यावरील पाणी. १५४
राउळ–महाराज, देव. ( ५ )
राजवाडा. ( ८६ )
रावो–राजा. १६३
राहाटणें–आचरणें ( ४४ )
व्यापार करणें ( ५३ )
रिघणें–शिरणें, घुसणें. ७१
रिझणें–संतुष्ट होणें. ९
रोवणें–रोवून स्थिर करणें. ३४
रोहिणी–मृगजळ. ११६

ळ

लटिका–खोटा. १२५
लवण–मीठ. ३५
लक्षण–चिन्ह. १०२
लाग–अधिकार, योग्यता, ६५
संबंध ( ६६ )
लाहणें–मिळणें, प्राप्त होणें. १७
लिंपणें–माखणें, लिप्त होणें. ७७
लोकत्रय–तीन लोक ( स्वर्ग, मृत्यु,
पाताळ ) ३६
लोटणें–ढकलणें. १०३
लौकिक–लोकसंबंधी, व्यावहारिक. ९८

व

वर–पण, परंतु. १६६
वर्तणें–वागणें. ४०
वर्म–तत्त्व, रहस्य. ९६
वर्ष–पाऊस. ११४
वसणें–राहणें. १२५
वसौटा–वसतिस्थान, आश्रयस्थान. १२
वहिला–सत्वर, लौकर. ३२
वात–वारा. ११४
वानणें–वर्णन करणें. १४०
वानी–मासला, प्रकार } ९१
उणीव, कसर. } १६९
वाम–डावा. १५३
वायां–व्यर्थ. ३३

वाहणें–चालू ठेवणें. १२४
विकरणें–विकार पावणें. १०३
विकळ–विसंगत, अमेळ. ५७
विचारणें–विचार करणें. १५
विचित्र–आश्चर्य. १०५
विटणें–कंटाळणें. ७१
विद्युत्–वीज. ११३
विनोद–कौतुक. १७६
विवंचना– भेद, निवड. १५५
विवरणें–विचार करणें. १६४
विवळ–स्पष्ट. १६५
विवेक–विचार. ८५
विशेषणें–विशेष वर्णन करणें. ८८
विषम–भेदभाव. ९५
विषयी–विषयासक्त. १२५
विसुरा–आश्चर्य. १७४
विहार–क्रीडास्थान. १३८
वृष्टि–वर्षाव. १७१
वोखटा–वाईट. १२७
वोतले–ओतलेले (पुतळे). १३७
वोळखणें–जाणणें. ३०
व्यक्त–स्पष्ट. १८०
व्यापार–कर्म, व्यवहार. ४०
व्योम–चिदाकाश. १५३

श

शरीरी–देहधारी. ९९
शांति–मुक्ति, मोक्ष. ७१
शीतल–थंड. ११७
शुद्धि–वार्ता, खबर. ७९
शुभाशुभ–बरें–वाईट, (१०३) इष्टानिष्ट. ११७
श्रवण–कान. ४१
श्वपच–चांडाळ. ९३
श्वान–कुत्रें. ९४

स

संग–आसक्ति (२१) मैत्री, सख्य. १८०
संगति–संबंध. ५६
संचलें–बनलेलें. ५३
संताप–उष्णता, दाह. ९२
सदैव–भाग्यवान्. १०
संधि–सांधा, घटक. १५२
सनागर–फार चांगलें, रसाळ, अलंकारिक. १।
संन्यास–त्याग. क
संपूर्ण–समग्र. ङ
संभ्रमें–गोंधळून, भांबावून. १.
सम–एकरूप. १५:
समतादृष्टि–अभेदबुद्धि ८८
समदृष्टि–समवृत्ति, ऐक्य पाहणारा. १०२
समूळ–मुळासकट. ८३
सम्यक्–यथार्थ. २८
सरणें–कार्यभाग होणें, पुरें पडणें. ११४
सर्वथा–मुळींच. ४१
सर्वेश्वर–परमेश्वर. ७६
संवाद–संभाषण. ६९
सवेसा–स्वेच्छा. १३

**ह**



**क्ष**

# श्रीज्ञानेश्वरी अध्याय बारावा या पुस्तकावरील कांहीं निवडक अभिप्राय ( सारांश )

श्री. **न. र. फाटक, बी. ए., मुंबईच्या रा. रु. कॉलेजांतील मराठीचे प्राध्यापक, लिहितात—**

"१९२८–१९४० या बारा वर्षांच्या कालावधींत प्रा. शं. वा. दांडेकर, एम्. ए., यांचीं ज्ञानेश्वरीवर जीं प्रगट प्रवचनें पुण्यांत झालीं, त्यांतील कांहीं भाग निवडून त्याच्या आधारें हा १२ वा अध्याय श्री. कर्वे–रिसबूड यांनीं सिद्ध केला आहे. प्रथम ओव्या अन्वयार्थासह दिलेल्या असून, पुढें त्यावरील विस्तृत टीपांचें एक प्रकरण जोडलेलें आहे. परंतु एवढ्यानें सगळ्या खाचाखोंचा स्पष्ट होणाऱ्या नसल्यानें वेदांताची परिभाषा उलगडणारें हें स्वतंत्र प्रकरण देऊन श्री. कर्वे–रिसबूड यांनीं ज्ञानेश्वरींतला विषय सुगम केला आहे. हल्लींच्या अभ्यासकांचें शब्दार्थ कळून समाधान होत नाहीं; शब्दाचें रूप व वाक्यांत त्या रूपाचे होणारे फेरबदल, वगैरे तपशील समजणें हें चालू अभ्यासपद्धतीचें एक अंग आहे. त्यालाही श्री. गो. कृ. मोडक यांचें साह्य घेऊन श्री. कर्वे–रिसबूड यांनीं आपल्या पुस्तकांत योग्य स्थान दिलेलें आहे. ज्ञानेश्वरींतील विचार हा पुढील संत कवींच्या अध्यात्मज्ञानाचा उगम असल्यानें एकनाथ, तुकाराम यांनीं त्या विचाराचा कसा उपयोग करून घेतला हें दाखविल्यानें ज्ञानेश्वरीचा प्रभाव सहज गळीं उतरतो. श्री. कर्वे–रिसबूड यांनीं या संबंधांतील जिज्ञासा तृप्त करण्याचें साधन आपल्या या पुस्तकांत पुरविलें आहे. सारांश, केवळ परीक्षेसाठीं अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांपासून तो ज्ञानेश्वराच्या गीतार्थ-निरूपणाचें रहस्य कळण्याची इच्छा बाळगणाऱ्यांपर्यंत सर्वांच्या कामीं येईल, अशी श्री. कर्वे–रिसबूड यांनीं तयार केलेल्या १२ व्या अध्यायाच्या पुस्तकाची व्यवस्था आहे. इतक्या प्रकारानें ज्ञानेश्वरीचा परिष्कार जनतेला सादर करणारें दुसरें पुस्तक पाहण्यांत नाहीं.

श्री. कर्वे–रिसबूड यांनीं ज्या कोणाला इच्छा होईल त्याला ज्ञानेश्वरीचा प्रसाद सुलभतेनें चाखतां यावा व त्यानें ज्ञानेश्वरीच्या सेवनास प्रवृत्त व्हावें,

असा थोर हेतु पुढें ठेवून आपलें काम त्या हेतूला शोभण्यासारख्या पद्धतीनें बजावलें आहे. ज्ञानेश्वरीनिमित्तानें सुचणाऱ्या अनेक विषयांचा अधिकारानें ऊहापोह करणारें श्री. कर्वे–रिसबूड यांच्या तोलाचें दुसरें पुस्तक दाखविणें कठिण आहे."

मुंबई, ता. १६–११–४७. —न. र. फाटक

* * *

**ह. भ. प. रघुनाथ हणमंत कोटनीस, हे लिहितात—**

" हा अध्याय प्रसिद्ध करून श्री. कर्वे–रिसबूड यांनीं मराठी वाङ्मयांत मोठीच भर घातली यांत शंका नाहीं. प्रा. सोनोपंत दांडेकर, एम्. ए., यांची वाणी आपण जगाला कायमची ऐकावयास दिली याबद्दल सर्व महाराष्ट्र आपणां उभयतांचा ऋणी राहील यांत बिलकुल शंका नाहीं. या ग्रंथाची स्तुति करण्यास मजजवळ शब्द नाहींत."

कैवल्य–धाम, सांगली, ता. २४।७।४७. – रघुनाथ हणमंत कोटनीस

* * *

**डॉ. शं. दा. पेंडसे, एम्. ए., एम्. ओ. एल्., पीएच्. डी., नागपूरच्या मॉरिस कॉलेजांतील मराठीचे प्राध्यापक, लिहितात—**

" आपण हा अध्याय फार परिश्रमपूर्वक संपादिला असून, अन्वय, अर्थ, व्याकरण आणि विस्तृत विवरण यांच्या योगानें खरोखरच आबालवृद्ध सुबोध केला आहे. विस्तृत विवरणांतील आपल्या टीपा भरपूर माहिती देणाऱ्या असल्यामुळें वाचकांना अत्यंत उपयुक्त वाटतील. याच प्रकारें प्रि. दांडेकर यांच्या ज्ञानेश्वरीवरील प्रवचनांच्या टिपणींच्या आधारें आपण संपूर्ण ज्ञानेश्वरी संपादिल्यास तें एक मोठें कार्य होईल."

नागपूर, ता. ८।७।४७. —शं. दा. पेंडसे

* * *

**केसरी,** ता. २–९–४७— हा अध्याय श्री. कर्वे व श्री. रिसबूड या दोन भक्तिमार्गीयांनीं संपादिला आहे. त्यांना प्राचार्य सोनोपंत दांडेकर, एम्. ए., यांचें सान्निध्य लाभलें असून, त्यांचें ज्ञानेश्वरीचें श्रवण व अध्ययन त्यांच्याच

मार्गदर्शित्वाखालीं झालें आहे. श्रीयुत सोनोपंतांचा ज्ञानेश्वरादि महाराष्ट्रीय संतांच्या वाङ्मयाचा अभ्यास व पौर्वात्य वेदान्त व पाश्चिमात्य तत्त्वज्ञान ह्यांचा दृढ व्यासंग व त्यावर त्यांचें प्रभुत्व सर्वश्रुतच आहे. त्यांच्याच ज्ञानेश्वरीवरील प्रगट प्रवचनांच्या वेळीं घेतलेल्या टिपणीवरून प्रस्तुत ओव्यांवरील निरूपण या ग्रंथांत विस्तृतरीत्या ग्रथित केल्यामुळें सांप्रदायिकरीत्या ज्ञानेश्वरींतील ओव्यांचें विवेचन कसें केलें जातें, हें ज्ञानेश्वरीच्या वाचकांस घरबसल्या समजण्याची सोय प्रस्तुत पुस्तकाच्या योगानें चांगलीच झाली आहे. याशिवाय ह्या अध्यायाच्या अर्थापनामध्यें संस्कृत शिक्षक श्री. गो. कृ. मोडक यांनीं सहाय्य केलें आहे. श्री. मोडकांचाही व्याकरणाचा अभ्यास दीर्घकालीन व सखोल असाच आहे. या तिन्ही कारणांमुळें प्रस्तुत पुस्तक विशेष उपयुक्त झालें आहे. ह्या पुस्तकांतील अन्वय सर्वथा व्याकरणानुसारी व अर्थ अन्वयानुसारी झाला आहे.

प्रस्तुत अध्यायाचें संपूर्ण व्याकरण संपादकांनीं दिलें असून त्याजबरोबर ज्ञानेश्वरींतील नामांची व धातूंची संक्षिप्त रूपावलीही तयार करून दिली आहे. यामुळें ज्ञानेश्वरींतील कोणचाही भाग वाचणारासही अत्यंत उपयोगी होईल. अशा रीतीनें ही रूपावली देण्यांत संपादकांनीं याच अध्यायापुरती आपली दृष्टि मर्यादित न ठेवतां सर्व ज्ञानेश्वरीच्या व्याकरणशुद्ध अध्ययनास बहुमोल साहाय्य केलें आहे.

याप्रमाणें वारकरी व विश्वविद्यालयांतील विद्यार्थी या सर्वांना हा ग्रंथ सर्वतोपरि उपयुक्त करण्याचा प्रयत्न संपादकांनीं आटोकाट केला आहे. परिशिष्टांत दिलेला वेदान्ताचा भाग भक्तिमार्गाच्या लोकांस बहुमोल वाटेल; तर या ग्रंथांतील व्याकरण मराठी भाषाभ्यासी लोकांत विशेष मार्गदर्शक होईल. तात्पर्य, अनेकदृष्ट्या विविध लोकांना उपयुक्त असा हा ग्रंथ काढल्याबद्दल आम्ही संपादकांचें अभिनंदन करतों.

*　　*　　*

**सकाळ**, २७-७-१९४७ :— मूळ ओव्या, अन्वय, अर्थ, उपोद्घात, टीपा, विस्तृत निरूपण, ज्ञानेश्वरींतील नामांची व धातूंची रूपावली, वगैरे गुणांनीं परिपूर्ण केलेला आणि नटविलेला श्रीज्ञानेश्वरीचा हा बारावा अध्याय अभ्यासू माणसाला फारच उपयुक्त वाटेल. या अध्यायाची इतकी कांहीं बारीकसारीक

फोड करण्यांत आली आहे कीं, ज्याला इच्छा व बुद्धि असेल, त्याला नुसत्या या पुस्तकाच्या मदतीनें निरूपणसुद्धां सांगतां येईल. अध्यात्माची आवड असणाऱ्याला, ज्ञानाची लालसा असणाऱ्याला, भाषेची माहिती करून घेणाऱ्याला, तत्त्वज्ञानाची मराठींतून ओळख करून घेणाऱ्याला किंवा थोडक्यात म्हणजे ज्ञानेश्वरी समजून घेणाऱ्याला या पुस्तकाचा उपयोग होण्यासारखा आहे. हरिभक्तिपरायण सोनोपंत दांडेकर याच्या प्रवचनांतून बाराव्या अध्यायांतील विषयाला जेवढें जेवढें उपयोगी पडेल तेवढें संपादकानीं उचललें आहे. वेदान्तपरिशिष्टांत वेदान्तशास्त्रांतील विशिष्ट आणि पारिभाषिक शब्द व मूलतत्त्वें यांच्या व्याख्या आणि माहिती दिली आहे. ती ज्ञानेश्वरीच्या अभ्यासूंनीं पुनःपुन्हा मननपूर्वक वाचावी अशीच आहे. या बाराव्या अध्यायांत चर्चिलेल्या विषयावर जीं प्रश्नोत्तरें बसविलीं आहेत, तींही मोठीं अर्थपूर्ण आणि उद्‌बोधक आहेत. ओव्या व अभंग यांची सूची संदर्भ आणि संस्मरण या दृष्टीने फार महत्त्वाची आहे. असा हा एवंगुणविशिष्ट ग्रंथ आत्मनिरूपणाची ज्याला ज्याला गोडी आहे, त्यानें त्यानें संग्रहीं ठेवून नेहमीं वाचीत राहावा असाच आहे.

* * *

**लोकमान्य** ( ता. ६–८–४७ ) — श्री. कर्वे व श्री. रिसबूड यांनीं संपादिलेलें हें पुस्तक अभ्यसनीय आहे. गीतेंतील गहन विचारांची ज्ञानेश्वरांनीं मराठी भाषेत जी फोड करून सांगितली ती जास्त सुबोध करून दाखविणारें सांप्रदायिक विवेचन या ग्रंथांत भरपूर आहे. ‘ भाषाग्रंथ ’ म्हणून ज्ञानेश्वरीचा अभ्यास ज्यांना करावयाचा असेल त्यांच्याही अपेक्षा हे पुस्तक पूर्ण करील. त्या दृष्टीनें या पुस्तकांतील ३, ४ व ५ हीं प्रकरणें महत्त्वाचीं आहेत. श्रीज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायावरील या पुस्तकाचा विशेष गुण म्हणजे सदर ग्रंथाच्या अभ्यासाची नवी दिशा हे पुस्तक दर्शविते. ज्ञानेश्वरकालीं प्रचारांत असलेले मराठींतील शब्द व त्या वेळचें मराठी व्याकरण यांचा या पुस्तकांतील ऊहापोह मार्गदर्शक आहे. मराठी भाषेच्या अभ्यासकांना हें पुस्तक फार उपयुक्त वाटेल.

---